## महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने

मराठ्यांच्या इतिहासातील – प्रामुख्याने दक्षिण महाराष्ट्र, कोकण, उत्तर कर्नाटक प्रदेशात घडलेल्या इतिहासातील— अनेक महत्त्वपूर्ण घटनांवर नव्याने प्रकाश टाकणारे व त्या घटनांचा अर्थ व संदर्भ दाखविणारे काही प्रमुख इतिहास-ग्रंथ, कागदपत्रे, कैफियती—

( कव्हर पाहा )

# करवीर सरदारांच्या कैफियती



संपादक

खंडेराव आनंदराव गायकवाड
कोल्हापूर

प्रस्तावना

स. मा. गर्गे

किंमत आठ रुपये

प्रकाशक

खंडेराव आनंदराव गायकवाड
बंगला नंबर ८, न्यू पॅलेस पोस्ट
कोल्हापूर

पहिली आवृत्ती
जानेवारी १९७१

मुद्रक

चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
४६१।४ सदाशिव पेठ
टिळक रस्ता, पुणे ३०

## अनुक्रमणिका





# लेखकाचे मनोगत

'करवीर सरदारांच्या कैफियती', हा ग्रंथ वाचकांपुढे ठेवताना मला दोन प्रकारांनी आनंद होत आहे. एक तर, गेल्या दोन तीन वर्षांच्या प्रयत्नाने इतिहासाला उपयोगी पडतील अशी ही कागदपत्रे, कोल्हापूरच्या सरकारी दप्तरखान्यातून मला संशोधित करता आली. आणि दुसरे, या निमित्ताने कोल्हापूरच्या अनेक सरदारांचे, जहागिरदारांचे आणि इनामदारांचे, कैफियतींच्या स्वरूपातील हे इतिहास मी प्रकाशात आणू शकलो. कोल्हापूरच्या इतिहासात गाजलेल्या प्रमुख घराण्यांचे हे संक्षिप्त इतिहास सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी लिहिले गेले आहेत. श्री. स. मा. गर्गे व मी 'करवीर रियासतीची कागदपत्रे' शोधीत असताना या कैफियती माझ्या हाती पडल्या. त्यातील माहिती उपयुक्त आहे असे मला वाटले. म्हणून त्या प्रसिद्ध व्हाव्यात अशी श्रीछत्रपती शहाजी महाराज यांना मी विनंती केली. महाराज स्वतः इतिहासाचे मर्मज्ञ व जाणकार असल्यामुळे त्यांनी माझ्या विनंतीप्रमाणे या कैफियती प्रसिद्ध करण्यास सर्वतोपरी सहाय्य करण्याचे उदार अंतःकरणाने मान्य केले. त्यानंतर कैफियतींची निवड श्री. गर्गे यांच्या सल्ल्याने केली. कोल्हापूरातील जुना इतिहास चांगला परिचित असलेले श्री. शं. ह. वर्टीकर व श्री. र. मा. राजाज्ञा यांनी संपादनाच्या कामी सहकार्य केले. आणि अशा सर्व प्रकारच्या सहाय्यातून प्रस्तुत कैफियती ग्रंथरूपाने साकार झाल्या.

कोल्हापूरचे राज्य सुमारे अडीचशे वर्षे प्रस्थापित होते. थोरले राजाराम महाराजांच्या कारकीर्दीपासूनच या राज्याचे संरक्षण करण्याच्या कामी अनेक घराण्यांच्या पराक्रमी पुरुषांनी श्रमसायास केले. अशा घराण्यांच्या कर्तृत्वामुळे छत्रपतींचे हे राज्य, पेशवे, पोर्तुगीज, निजाम, हैदर इत्यादी आणि पटवर्धन, सावंतवाडीकर यांच्या आक्रमणापासून सुरक्षित राहिले. याचे श्रेय जितके करवीर छत्रपतींना आहे तितकेच त्यांच्या सरदारांच्या पराक्रमाला आणि कर्तबगारीलाही आहे. या कर्तबगारीचे दर्शन कैफियतीत घडते. वस्तुतः अशा अनेक कैफीयती सरकारी वा खाजगी दप्तरातून असल्या पाहिजेत. पण मला जेवढ्या मिळू शकल्या, त्यातील प्रमुख मी येथे प्रसिद्ध करीत आहे.

हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या कामी आरंभापासूनच मला छत्रपती शहाजी महाराज यांचे प्रोत्साहन लाभले. दोन वर्षांपूर्वी 'राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास,' मी लिहून प्रसिद्ध केला. त्यावेळीही महाराजांनीच मला

प्रोत्साहन दिले होते. प्रस्तुत ग्रंथाविषयीही त्यांनी अतिशय औत्सुक्य दाखविले. या दोन्ही ग्रंथांचे लेखन आणि संपादनाचे कामी छत्रपती शहाजी महाराजांनी मला सक्रीय उत्तेजन दिले नसते तर, माझ्या हातून ही पुस्तके तयार झाली असती की नाही याबद्दल मला शंकाच आहे. एकप्रकारे इतिहासाच्या अभ्यासाच्या क्षेत्रात त्यांनीच मला उत्तेजन देऊन उपकृत केले आहे. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

'करवीर रियासती 'चे लेखक व माझे मित्र श्री. स. मा. गर्गे यांनी माझ्या विनंतीला मान देऊन प्रस्तुत ग्रंथाला विस्तृत व विवेचक प्रस्तावना लिहिली आहे, त्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे.

'करवीर रियासती 'च्या निमित्ताने छत्रपती शहाजी महाराजांनी श्री. गर्गे यांचेसह, कोल्हापूरातील इतिहासाची आवड असलेल्या काही जाणकार मंडळींचे एक अनौपचारिक इतिहास मंडळच तयार केले आहे. त्या मंडळाच्या सहकार्याचा मला या कामी अतिशय उपयोग झाला. विशेषतः, श्री. शं. ह. वर्टीकर आणि श्री. राजाश यांचा उल्लेख साभार केला पाहिजे.

या संग्रहातील बहुतेक सर्व कैफीयती सरकारी दप्तरखान्यातून मला मिळाल्या. पण काही कैफीयती इतर खाजगी दप्तरातूनही मिळाल्या आहेत. ज्या कैफियती-खाली कैफियत नंबर घातला आहे, अशा कैफियती सरकारी दप्तरखान्यातील आहेत. इतर कैफियतींच्या दप्तरांचे उल्लेख त्या त्या ठिकाणी केलेले आहेत. दोनतीन कैफियती पूर्वी प्रकाशितही झालेल्या आहेत. त्यांचे पुनर्मुद्रण करण्याची अनुमती दिल्याबद्दल मी संबंधीत ग्रंथसंपादकांचा येथे कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतो.

कैफियतीच्या शेवटी वंशावळी प्रसिद्ध केल्या आहेत. तसेच, करवीर सरदारांचे किताब, सरंजाम, शिक्के व मोर्तब इत्यादि ऐतिहासिक स्वरूपाची माहितीही प्रसिद्ध करण्यात आली आहे.

करवीर छत्रपती शिवाजी महाराज ( चौथे ) यांच्या दत्तविधानाच्या वेळचा ( इ. स. १८७१ ) एक तक्ता उपलब्ध झाला, तोही मुद्दाम या पुस्तकात छापला आहे. त्यावरून त्यावेळी शंभर वर्षांपूर्वी सरदारांच्या बसण्याच्या जागा आणि एकंदर दरबाराचे स्वरूप वाचकांना समजू शकेल.

काही कैफियतीतील हिशोबाचे तपशील वगळले आहेत. इतिहासाच्या दृष्टिने त्यांचे महत्त्व नसल्यामुळे ते ठेवण्याची आवश्यकता वाटली नाही.

कोल्हापूर अभिलेख कार्यालयातील कागदपत्रे पहाण्याची परवानगी दिल्याबद्दल पुराभिलेख व पुरातत्व खात्याचे संचालक डॉ. वि. गो. खोबरेकर यांचा मी आभारी आहे.

प्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. य. न. केळकर यांनी माझ्या विनंतीवरून सर्व मजकूर बारकाईने वाचून शुद्धिपाठ तयार करून दिला. त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

कोल्हापूर अभिलेख कार्यालयाचे अधीक्षक श्री. य. रा ताम्हणे, सिनीअर क्लार्क श्री. शा. स. पाटील आणि मुलकी खात्यातील जुनी मोडी कागदपत्रे वाचणारे पेन्शनर क्लार्क श्री. नारायण नायकू जाधव यांचाही मी आभारी आहे. श्री. जाधव यांनी मोडी कागदपत्रे मराठीत नकलून दिली. कार्यालयातील मधुकर परशराम ठमके व इतर कर्मचाऱ्यांनीही माझ्या संशोधनकार्यात मोठ्या आपुलकीने मदत केली. त्यांचा मी आभारी आहे.

इतिहासाचे अभ्यासक माझ्या प्रयत्नांचे योग्य ते चीज करतील अशी मी आशा करतो.

कल्पना प्रेसचे चालक श्री. चिं. स. लाटकर यांनी पुस्तकाची छपाई आकर्षक करून दिल्याबद्दल मी त्यांचे आभार मानतो.

**खं. आ. गायकवाड**

# प्रस्तावना

१. ' करवीर सरदारांच्या कैफियती ' संपादित आणि प्रकाशित करून खंडेराव आनंदराव गायकवाड यांनी दक्षिण महाराष्ट्रातील अनेक ऐतिहासिक घराण्यांच्या पूर्वजांचे कर्तृत्व प्रकाशात आणले आहे. या कैफियती म्हणजे त्या त्या घराण्यांचे संक्षिप्त इतिहास तर आहेतच, शिवाय कोल्हापूर राज्याच्या इतिहासातील अनेक घटनांचे दुवे जोडण्यास उपयुक्त ठरतील अशा हकीकतीही आहेत. महाराणी ताराबाई यांनी स्थापन केलेल्या कोल्हापूर राज्याचा उदय आणि विकास, संवर्धन आणि संरक्षण करण्याचे काम अनेक घराण्यांनी केले. त्यांचा इतिहास आजवर यावा तेवढा प्रकाशात येऊ शकला नाही. त्यामुळे त्या घराण्यांच्या कांही प्रमुख पराक्रमी पुरुषांची नावे आणि त्यांच्या शौर्यासंबंधीच्या ऐकीव कथा, यांपेक्षा अधिक साधार माहिती मिळणे दुरापास्त होते. पण गेली कांही वर्षे त्या दिशेने नेटाने प्रयत्न चालू झाले. त्या प्रयत्नांतून कोल्हापूर राज्याचा इतिहास, त्या इतिहासाशी निगडीत असलेल्या व्यक्ती आणि ऐतिहासिक घटना यांच्या संबंधीची साधने प्रसिद्ध होऊ लागली आहेत. या प्रयत्नांमागे विद्यमान छत्रपती शहाजी महाराज यांची प्रेरणा आणि सक्रीय प्रोत्साहन आहे ही गोष्ट आता सर्वपरिचीत झाली आहे. प्रस्तुत कैफियतींचे प्रकाशनही त्याच प्रयत्नातील एक भाग आहे.

२. अशाच स्वरूपाच्या कैफियती सुमारे साठ वर्षांपूर्वी कै. रावबहादूर गणेश चिमणाजी वाड यांनी पुण्याच्या सरकारी दफ्तरखान्यातून निवडल्या व पुरुषोत्तम विश्राम मावजी आणि रावबहादूर दत्तात्रय बळवंत पारसनीस यांनी संपादन करून प्रकाशित केल्या होत्या. ‘ काव्येतिहास संग्रह ’ आणि ‘ भारतवर्ष ’ या मासिकांतूनही होळकर, गोविंदपंत बुंदेले, पंत अमात्य बावडेकर, सरदार पानसे इत्यादींच्या कैफियती प्रसिद्ध झाल्या होत्या. पण या सर्व कैफियती प्रामुख्याने सातारा छत्रपतींच्या राज्याशी संबंधीत असलेल्या सरदारांच्या होत्या. कोल्हापूर राज्याशी संबंधीत असलेल्या घराण्यांच्या कैफियतींचा त्यात समावेश झालेला दिसत नाही. दोनचार अपवाद वगळता, कोल्हापूर सरदारांच्या कैफियती या संग्रहात प्रथमच प्रकाशित होत आहेत, हे या ग्रंथाचे एक वैशिष्ट्य म्हणून सांगता येईल.

३. या संग्रहात सेनापती आणि सेनाखासकील. सरनौबत आणि सरलष्कर, राजाज्ञा आणि राजोपाध्ये, हिम्मत बहाद्दर आणि भीमबहाद्दर, जफ्तनमुलूख आणि राव विश्वासराव, बाजी घाटगे आणि झुंजारराव घाटगे, सुमंत आणि पंडितराव, तसेच मुजुमदार, पानसे, विचारे, खानवटकर, पाटणकर, जोशीराव; अमीर उल् उमराव व हिंदुराव ही घोरपडे यांची दोन घराणी अशा किती तरी नावाजलेल्या घराण्यांच्याहकीकतींचा समावेश करून संपादकांनी त्यांच्या पूर्व स्मृतीला उजाळा दिला आहे, त्याबरोबरच इतिहासांच्या अभ्यासकांचीही सोय केली आहे.

४. ऐतिहासिक साधनांच्या क्रमात कैफियती, बखरी इत्यादींना दुय्यम स्थान द्यावे लागेल हे खरे; अस्सल पत्रव्यवहाराची विश्वसनीयता कैफियतींना प्राप्त होऊ शकत नाही. काही प्रसंगी त्यात अतिशयोक्त व संदिग्ध माहिती असते, तर काही वर्णने सैल भाषेत लिहिलेली असतात. काही घटनांचा क्रम सुसंगत नसतो तर, काही नावांची गल्लत झालेली आढळते. पण हे सर्व गृहीत धरूनही कैफियतींना इतिहास-साधनांच्या संदर्भात महत्त्व नसते, असे म्हणणे तितकेसे बरोबर ठरणार नाही. कैफियतीत त्या त्या घराण्यांच्या वंशजांनी विशिष्ट प्रसंगी आपल्या पूर्वजांसंबंधी लिहिलेल्या माहितीपूर्ण हकीकती असतात. घराण्याची काही कागदपत्रे, वयोवृद्ध व्यक्तींनी पुरवलेली माहिती, परंपरेने सांगितले गेलेले प्रसंग, कुलधर्म आणि कुलाचार यांच्याद्वारे मिळणारी माहिती, काही कथा, दंतकथा इत्यादींचा या कैफियतींना आधार असतो. हे सर्व आधार लिहून ठेवलेले नसले तरी, त्यात बराच तथ्यांश असतो, हे नाकारून चालणार नाही. किंबहुना अस्सल पत्रव्यवहारात काही ठिकाणी जी तुटक आणि त्रोटक माहिती मिळते तिची भरपाई कैफियतीतील माहितीवरून करणे शक्य असते. कैफियतीत सर्व माहिती काहीश

कथानकाच्या स्वरुपात एका सूत्रात गोवलेली सापडते. ही माहिती अस्सल पत्रातील मजकूरांच्या आधाराने पारखून घेणे अशक्य नाही. ऐतिहासिक कागद पत्रांची विश्वसनीयताही, ती कागदपत्रे लिहिणाऱ्या व्यक्तींचा सामाजिक दर्जा, सत्ता क्षेत्रातील स्थान, पत्र लिहिण्याचा हेतू, प्रसंग, परिणामाविषयी गृहीत धरलेला अंदाज इत्यादीवरूनच निश्चित करावी लागते. कैफियतींच्या बाबतीतही अशा काही कसोट्या लावून त्या तपासण्याचा प्रयत्न झाला तर त्यातून निश्चितपणे ऐतिहासिक घटनांवर प्रकाश पडण्यास मदत होईल. उदाहरणार्थ दोन समकालीन कर्तबगार व्यक्तींचा उल्लेख दोन किंवा अधिक निरनिराळ्या कैफियतीत आलेला असेल तर, त्यातून अतिशयोक्ती वगैरे उणी करून वस्तुस्थिती शोधून काढणे अवघड पडू नये. म्हणूनच ऐतिहासिक साधनांच्या संदर्भात कैफियतींचे दुय्यम स्थान मान्य करूनही त्यातून इतिहासाला उपयुक्त ठरेल अशी कितीतरी माहिती मिळू शकते.

कैफियतीत अतिशयोक्त वर्णने केलेली असतील तर ती त्यातील स्त्री-पुरुषांच्या पराक्रमासंबंधाने असू शकतात. पण कैफियतींचे हे राजकीय अंग बाजूला ठेवले तरी, त्यातील समाजस्थिती, जमाखर्चांच्या तक्त्यावरून मिळणारी आर्थिक माहिती, धार्मिक प्रथा आणि परंपरा, लोकमानसातील प्रचलित समजुती, ग्रामनामे आणि घटनास्थळे, हुद्दे आणि सरंजाम, भाऊबंदकीचे प्रकार, वारसाहक्काचे तंटे, नातीगोती, समाजाच्या रीतीभाती, अशी कितीतरी विविध स्वरूपाची माहिती अभ्यासू वाचकांना मिळू शकते. विशेषतः, ज्या प्रदेशाचा, राज्याचा, समाजाचा वा घराण्याचा फारच थोडा इतिहास ज्ञात आहे, अशांची सुसूत्र माहिती कैफियती, यादी, बखरी, करीने या खेरीज इतरत्र कुठे आणि कशी मिळेल ?

मराठ्यांच्या इतिहासाचे संशोधन करणाऱ्या थोर संशोधकांनाही प्रथम अशा कैफियती व बखरी यांचाच फार मोठा आधार मिळाला होता. नंतर सापडलेल्या कागदपत्रामुळे कैफियती व बखरीतील माहिती पारखून घेण्यास फार मोठा उपयोग झाला हे जितके खरे, तितकेच, या कागदपत्रातील उल्लेखांचा संदर्भ जुळविण्यासाठी कैफियती व बखरीतील हकीकतींचा उपयोग झाला हेही खरे. कैफयती व बखरीमुळे अस्सल कागदपत्रांतील माहितीची संगती लक्षात येणे कितीतरी सुलभ होते हे इतिहासाच्या अभ्यासकाना निराळे सांगण्याची गरज नाही. कोल्हापूरच्या इतिहासाच्या संदर्भात तर अस्सल पत्रव्यवहार आणि कैफियती यांचे परस्परावलंबीत्व मुद्दाम विचारात घ्यावे लागते. कारण, या इतिहासाची अस्सल आणि दुय्यम साधने जवळ जवळ एकाचवेळी प्रसिद्ध होत आहेत. या साऱ्या विवेचनाच्या संदर्भात प्रस्तुत ग्रंथांतील कैफियतींचा विचार

केला म्हणजे इतिहासाचा अभ्यास करणारांना आणि इतिहास लेखकांना या कैफियतींचे महत्त्व जाणवल्याशिवाय राहणार नाही.

५. मावजी – पारसनीस यांनी संपादित व प्रकाशित केलेल्या कैफियतींच्या प्रस्तावनेत, त्या कैफियती लिहिण्यामागचे कारण सांगताना म्हटले आहे, " पेशवाई नाहिशी होऊन ब्रिटिश सरकारचा अंमल झाल्यानंतर दक्षिणेतील जहागीरदार, सरदार, इनामदार, यांच्या घराण्यांचा इतिहास व खानदानीची माहिती लिहून घेण्याचा प्रयत्न दक्षिणेतील पोलिटिकल एजंट यांच्याकडून वेळोवेळी करण्यात आला आहे. " त्यातून त्या कैफियतींची निर्मिती झाली. त्या प्रसिद्ध करण्याचे कारण देताना संपादकानी म्हटले आहे, " या कैफियतींतील एकंदर माहिती अनेक दृष्टींनी उपयुक्त असल्यामुळे त्यांची गणना इतिहासाच्या साधनामध्ये दुय्यम प्रतीत करण्यास काहीच हरकत नाही. ह्यावरून दक्षिणेतील सरदारांच्या बहुतेक घराण्यांची थोडीबहुत माहिती प्रसिद्ध होऊन ब्रिटिश सरकारचा अमल झाल्यानंतर त्यांची स्थिती कशी होती त्याचेही अल्प दिग्दर्शन होते. या माहितीचा इतिहास संशोधकांस व सर्वसाधारण लोकांस सारखाच उपयोग होईल अशी आम्हास उमेद आहे. "

६. अशी उमेद बाळगूनच श्री. खंडेराव उर्फ नानासाहेब गायकवाड यांनी ' करवीर सरदारांच्या कैफियती ' प्रसिद्ध करण्याची जबाबदारी पार पाडली आहे यात शंका नाही. पण या संग्रहातील कैफियती लिहून घेण्यामागची कारणे मात्र वरील कारणांपेक्षा काही बाबतीत निराळी आहेत. त्या वेळचे प्रसंगही निराळे होते.

७. या कैफियतींची पार्श्वभूमी समजण्यासाठी कोल्हापूरच्या इतिहासाचा थोडा मागोवा घ्यावा लागेल. कोल्हापूरचे छत्रपती आणि इंग्रज यांचा इ. स. १८१२ मध्ये झालेला तह विशेष महत्त्वाचा होता. त्या तहामुळे, शंभर वर्षे चाललेली करवीर छत्रपतींची उज्ज्वल परंपरा उतरणीला लागली. त्यानंतरच्या काळात कोल्हापूर हे स्वतंत्र राज्य राहिले नाही. ते कमीअधिक प्रमाणात इंग्रजी सत्तेच्या संरक्षणाखाली एक संस्थान बनले. पण तरीही पुढे वीस बावीस वर्षे पर्यंत छत्रपतींना स्वतःचे सैन्य ठेवण्याची सत्ता होती. पण ती सत्ताही बुवासाहेब महाराजांच्या काळात इंग्रजानी काढून घेतली. त्यामुळे कोल्हापुरच्या राजकीय आणि सामाजिक जीवनावर दूरगामी परिणाम घडून आले. बुवासाहेब महाराजांच्या कारकीर्दीत इंग्रजी सत्तेची पकड घट्ट बनत गेली. बुवासाहेबांचे निधन इ. स. १८३८ साली झाले, तेव्हा कोल्हापूर राज्याची आर्थिक स्थिती डबघाईला आली होती. त्यावेळी राज्याचे महसुली ऊत्पन्न तीस बत्तीस लाखाच्या आसपास होते. त्यातील पंधरा सोळा लाख रुपये महसूल येणाऱ्या जमिनी लोकांकडे इनाम

म्हणून दिलेल्या होत्या. राज्याची अस्थिर परिस्थिती लक्षात घेऊन इनामी जमिनीचे नवे नवे प्रकार अनेकांच्या सुपीक डोक्यातून निघत होते. देवस्थान, धर्मादाय, देसाई देशपांडे यांच्या सारखे महाली हक्कदार, पाटील, कुलकर्णी, खोत, नाईक, चौगुला, रामोशो, सरशेट्या, यां सारखे गाव हक्कदार, सुतार, कुंभार, चांभार, जोशी, न्हावी, मुलाणी इत्यादी बलुतेदार, लढाईत ठार झालेल्यांच्या विधवांना दिलेली रांडरोटी, भालदार, चोपदार, हुजरे, बारगीर, गावसनदी, जासूद, फरास, मानकरी, कोटकरी, गडकरी अशा अनेक प्रकारांच्या इनामदारांची गर्दी झाली होती. आपली जमीन इनामी असल्याचे दडपेगिरोने सांगणारेही असंख्य होते. सनदा पत्रे नसतानाच त्यांनी जमिनीचा इनामी म्हणून भोगवटा चालू ठेवला होता. त्याखेरीज, अठरा कारखाने आणि त्यावरील लहान मोठे अधिकारी आणि कारूनारू, कलावंत, बुरुड, गंधवाले, शिंपी, तेली, कासार, आत्तार, तांबोळी, बैरागी, गोंधळी, फकीर, पीरजादे, दिवटे, शिंगे यांसारखे लहान मोठे सेवेकरी आणि तत्सम मंडळीकडूनही इनाम जमिनीबद्दल दावे सांगितले जात होते ते निराळेच. कोणेकाळी समाजातील सर्व थरांतील प्रजेचा परामर्ष घेण्याच्या सदिच्छेने छत्रपतींनी या मंडळींना इनामे दिली असतीलही, पण त्यातील खरे किती आणि बनावट किती याचा मेळ लावणे अवघड होऊन बसले होते.

८. छत्रपतींची सत्ता ओसरण्याच्या आणि नवी इंग्रजी सत्ता अमलात येण्याच्या संधीकाळात अनेक तथाकथित इनामदारांनी महसूल टाळण्यासाठी, डळमळीत परिस्थीतीचा फायदा पदरात पाडून घेण्याची खटपट चालविली होती. त्यातूनच समाजात संघर्ष वाढू लागले. कोणीही बडी असामी नजराणे घेऊन इनाम जमिनी देऊ लागले. इनामे जप्त झाली असल्यास नजराण्याच्या रकमा उकळून इनामे सोडवून देऊ लागले. अशा सर्व गदारोळामुळे महसूल, जमाबंदी, शिबंदी, किल्ल्यांचा कारभार, पैशाचे व्यवहार इत्यांदीमध्ये कमालीचा गोंधळ उत्पन्न झाला. त्याचा पहिला परिणाम म्हणून महाल मामले मक्त्याने देण्याची वहिवाट बंद करण्याचे धोरण अमलात आले. त्यामुळे चिडाचीडी उत्पन्न होऊ लागली. शेवटी त्यातून गडकिल्ले आणि महल-मामले यात सर्वत्र उठाव होऊ लागले ( करवीर रियासत, पृष्ठ २८२–२८३ ). या उठावांचा प्रचंड उद्रेक जुलै १८४४ मध्ये भडकला. सामानगड, भूदरगड आणि खुद्द कोल्हापूर येथे उठाव झाले. परिस्थिती आटोक्याबाहेर जाण्याची चिन्हे दिसताच इंग्रजांनी कोल्हापूर येथे पोलिटिकल एजंट म्हणून १८४५ मध्ये कॅ. ग्रॅहमची नेमणूक केली.

कारभारात सुसूत्रता आणण्यासाठी सर्व इनामांची चौकशी करण्याचे ठरले त्यासाठी इनाम चौकशी कमिशनची नेमणूक झाली. ज्या उत्पन्नाबद्दल सनदा

असतील अशी इनाम उत्पन्ने पूर्ववत अबाधित ठेवण्याचे ठरले. तसेच ज्या उत्पन्नाबद्दल सनदा नाहीत, पण त्या उत्पन्नाचा इ. स. १८३८ पूर्वी किमान तीस वर्षे भोगवटा चालू असेल, तर नजराणा घेऊत ते उत्पन्न चालू ठेवण्याचेही ठरले. पण या दोन्ही अटी ज्या उत्पन्नाला पूर्ण करता येत नव्हत्या अशी इनाम उत्पन्ने काढून घेण्याचे धोरण ठरविण्यात आले. इनामांची चौकशी इ. स. १८४४ नंतर पस्तीस चाळीस वर्षे चालू होती. दरम्यानच्या काळात इनाम धारकांकडून पुराव्यादाखल माहिती मागविण्यात येत होती. याच संदर्भात आणखी एक गुंतागुंत लक्षात घेण्यासारखी आहे. इंग्रजांनी कोल्हापूरचे लष्कर बरखास्त केले होते. त्यामुळे स्वाभाविकच लष्करी नोकरीकरता दिलेल्या जहागिरींचे आणि सरंजामींचे काय करावे असा प्रश्न उपस्थित झाला होता. जहागिरदार आणि सरंजामदार यांची गरज उरली नव्हती. पण समाजातील त्यांचे स्थान लक्षात घेता त्यांना पूर्णपणे बाजूलाही सारता येत नव्हते. शेवटी त्यांच्याकडून नोकरीबद्दल पंधरा टक्के रक्कम ध्यावयांचे ठरवून त्यांचे सरंजाम चालू ठेवण्यात आले. या सेटलमेंटच्या वेळी जहागिरदार आणि सरंजामदार यांचेकडून त्यांच्या घराण्याची आणि त्यांना जहागीर व सरंजाम मिळालेल्या कारणांची सविस्तर माहिती मागविण्यात आली होती. प्रस्तुत ग्रंथातील बहुसंख्य कैफियतींचा जन्म त्यातून झाला.

९. या कैफियतींचा प्रारंभीचा परिच्छेद वाचला म्हणजे वरील विधान पटू शकेल. त्या परिच्छेदात म्हटले आहे, " पोलिटिकल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आंख ६६ सन १८४५ इसवीची याद आली. त्यात इनामे सरंजाम, देवस्थान, धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळची सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर व त्या खालील मुख्य कारभारी यांचे नावे डायरी ५५० सन १८४५ चा शेरा जाहला. त्याजवरून सनदा पत्रे असतील ती दाखवावी म्हणून आज्ञा जाहली. " या आज्ञेप्रमाणे, कैफियती सादर करण्यासाठी सरकारने सर्वांनाच ठराविक सहा प्रश्न विचारण्यात आले होते. पहिल्या कलमात उत्पन्नाचा तपशील, दुसऱ्या कलमात हे उत्पन्न कोणी, केव्हा, कसे, संपादन केले याची माहिती, तिसऱ्या कलमांत उत्पन्नाचे भागीदार असल्यास त्यांचा तपशील, चौथ्या कलमात त्या उत्पन्नाबाबत मिळालेल्या सनदा पत्रांची नोंद, पाचव्या कलमात इतर काही उत्पन्ने असल्यास त्याची माहिती, आणि सहाव्या कलमात, कैफियतीत लिहिलेला मजकूर खरा असल्याबद्दल प्रतिज्ञापत्र अशा पद्धतीने सर्व इनामदारांकडून माहिती मिळविण्यात आली होती. त्यापैकी ऐतिहासिक घटना समजण्याच्या दृष्टीने दुसरे कलम विशेष महत्त्वाचे आहे. त्यात

कैफियत लिहून देणाऱ्यांनी आपल्या पूर्वजांच्या कर्तृत्वासंबंधी माहिती नोंदविली आहे. चौथ्या कलमातही सनदा पत्रांच्या अनुषंगाने कांही इतिहासपर माहिती नमूद झाली आहे.

१०. कैफियती सादर करण्यामागे आणखी एक कारणही इतरत्र सापडते. कॅ. ग्रॅहमने ६ जुलै १८४८ रोजी हिंदूराव गायकवाड यांना एक पत्र पाठविलेले उपलब्ध आहे. त्या पत्रात म्हटले आहे, "मेहेरबान हिंदूराव गायकवाड सरखवास—. वारणेचा तह झाल्याअलीकडे या राज्यात महाराजांनी कोणा-बरोबर लढाया दिल्या, त्यात लढाऊ लोक पराक्रमी कोण कोण होते वगैरे सर्व हकिकती कळणे आहे. त्यात आपले घराणे पूर्वीपासून पराक्रमी. हैबतरावदादा यांची किर्ती या राज्यात आज दिवसपर्येत चालत असोन त्यानी कोणकोणते समयास महाराजास उपयोग कसा केला हे वृत्तांत काही लेखणी आढळत नाही. तसेच आपले पूर्वजातून प्रथमतः हल्ली चालत आली ती योग्यता कोणी मिळवली, त्या अलीकडे सरंजाम काय काय जाजती प्राप्त जाहले, किताब कोणते मिळविले वगैरे सर्व माहिती आपले घराण्यात पुरातन लेख असतील त्यावरून, तसेच दंतकथेवरून इतर प्रत्यंतराविषयी सप्रमाण असल्या गोष्टी आपले निसबतीचे कारकून यांजकडून थोडक्यात लेखन करून एकंदर घराण्यातील अगर पुरातन लेखाचे नकलासहीत इकडे पाठविल्यास आम्हास फार खुषी होईल. कारण हल्ली हुजूर कोल्हापूर संस्थानची बखर करण्याचे काम चालले आहे. त्या ग्रंथात ज्यानी पराक्रम करून कीर्ती मिळविली, त्या पुरुषांचे नाव चिरकाल राहण्यास ग्रंथात दाखल केले पाहिजे. मालूम व्हावे. ता. ६ माहे जुलई सन १८४८ इसवी" (राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास, पृष्ठ ११८) अशाच प्रका-रची विचारणा इतर सरदार घरण्यांकडेही करण्यात आली असावी. या माहितीचा उपयोग करून कॅ. ग्रॅहॅमने आपल्या रिपोर्टात तत्कालीन इनामदार आणि जहागिरदार यांचे त्रोटक इतिहास लिहिले आहेत आणि त्यातूनच एका स्वतंत्र प्रकरणात कोल्हापूरचा सुसंगत असा इतिहासवजा लेखही लिहिला आहे. ग्रॅहॅमचा रिपोर्ट इ. स. १८५३ साली पूर्ण झाला. कोल्हापूरच्या राजकीय, सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीच्या संदर्भात या रिपोर्टला फार महत्त्वाचे स्थान आहे. त्यात ऐतिहासिक माहिती शिवाय, त्यावेळची शेतीची साधने, उपजिवीकेचे व्यवसाय, जातीजातींचे संबंध, दरबारी रीतीरिवाज, प्रसिद्ध स्थळे, देवस्थाने, लोकसंख्या, लोकगीते, हस्तव्यवसाय, नाणी, वजने-मापे, जमिनीचे प्रकार, हवामान, पिके, धान्याचे भाव इत्यादी कितीतरी उपयुक्त माहिती समाविष्ट केलेली आहे. या रिपोर्टच्या परिपूर्तीचा एक भाग म्हणून करवीर सरदार आणि प्रमुख जहागिर-

दार यांच्या कैफियती ग्रॅहॅमने मागविल्या होत्या. अशातऱ्हेच्या कैफियती बऱ्याच विस्तृत होत्या आणि त्यात ऐतिहासिक माहितीचा भागही अधिक होता.

प्रस्तुत कैफियतींच्या ग्रंथातील हिंमतबहादर चव्हाण घराण्याची कैफियत वाचली म्हणजे इतर कैफियतीपेक्षा तिचे निराळेपण सहज लक्षात येऊ शकेल. याच संग्रहातील सेनापती घोरपडे कापशीकर यांनी १८६७ साली सादर केलेली कैफियतही अतिशय माहितीपूर्ण आहे. त्याच धर्तीवर घोरपडे हिंदूराव गजेंद्र-गडकर यांनी इ. स. १८३२ साली लिहिलेली कैफियतही ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीने महत्वाची वाटते. घोरपडे घराण्याच्या या दोन्ही कैफियती आणि त्यांच्याच जोडीला घोरपडे अमीरुल उमराव यांनी इ. स. १८५१ मध्ये लिहिलेली कैफियत ठेवली म्हणजे घोरपड्यांच्या तिन्ही घराण्यांचा संक्षिप्त इतिहास नजरेसमोर उभा रहातो. ( पृ. १७, ६९, १५८, २४१, २४९ )

*

११. या संग्रहातील कैफियतींचे वैशिष्टय केवळ त्या केव्हा आणि कोणत्या कारणासाठी लिहिल्या गेल्या एवढ्यावरच थांबत नाही. त्यात नमूद झालेली ऐतिहासिक माहिती बारकाईने तपासली म्हणजे त्या घराण्यांच्या इतिहासाबरो-बरच त्यावेळच्या समाजस्थितीचेही दर्शन घडते. वानगीदाखल पुढील उद्‌बोधक माहिती पहा :

सेनापती घोरपडे घराण्याचा वारसाहक्कासंबंधी इ. स. १७८१ साली वाद उत्पन्न झाला. राणोजी घोरपडे यांच्या दोन स्त्रियांनी आपापल्या मुलाचा सेनापती पदासाठी दावा मांडला. शेवटी हे प्रकरण, ‘ पेशवे सरकारचे संमतीने निकाल व्हावा याकरिता तासगावास परशरामभाऊ पटवर्धन यांजकडे पंचायती नेमली.’ त्यांनी पुण्यास न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांजकडे हे प्रकरण सोपविले. त्यांनी असा न्याय दिला की, ‘ प्रथम पुत्रमुख संताजीराव यांचे पाहिले म्हणून ते वडील. त्यांनाच सेनापतिपद द्यावे. ’ राणोजीरावाचे पहिले लग्न लक्ष्मीबाईशी झाले होते, तेव्हा तिचा मुलगा सुबराव याला सेनापतिपद मिळावे अशी या वादाची एक बाजू होती. राणोजीची धाकटी बायको अंबिकाबाई हिला प्रथमपुत्र संताजी झाला. अंबिकाबाई धाकटी असली तरी तिला अगोदर मुलगा झाला म्हणून तोच सेनापतिपदाचा हक्कदार, अशी वादाची दुसरी बाजू.. त्यावर राम-शास्त्रींनी निर्णय दिला. त्याचा आशय असा की, राणोजीच्या बायकांपैकी थोरली कोण आणि धाकटी कोण याला महत्त्व नाही. ‘ प्रथम पुत्रमुख संताजीराव यांचे पाहिले, ’ म्हणून त्यालाच सेनापतिपदाचा अधिकार पोचतो. ( पृ. २५ )

हिंमतबहादूर चव्हाणांच्या कैफियतीत अनेक उल्लेख महत्त्वाचे आहेत. ही कैफियत मुळात संपूर्ण वाचली पाहिजे. त्यातील प्रीतीराव चव्हाण यांच्या स्वामीनिष्ठेचे उल्लेख कोल्हापूरच्या इतिहासाला भूषणावह ठरावेत असे आहेत. निपाणीकर आणि प्रीतीराव चव्हाण यांची निकराची लढाई झाली. त्यात प्रीती-रावचा घोडा ठार झाला आणि ते स्वतः जखमी झाले. ' तेच समयी निपाणीकर जवळ येऊन, काकासाहेब आता कसे, म्हणोन बोलले. त्यावर बापूसाहेब यांनी उत्तर केले की तू जर मला सापडला असतास तर ठार मारला असता. ' असे उत्तर ऐकल्यावरही निपाणीकर यांनी आपली पालखी आणून बापूसाहेबांस कोगनाळीत नेऊन ठेवले. लढाईतील पराभव बापूसाहेबांच्या जिव्हारी एवढा लागून राहीला की त्यातच ते पुढे निधन पावले. ( पृ. ५० )

सेना खासकील शिंदे यांच्या कैफियतीत सरदार आणि मानकऱ्यांना दिलेल्या इनामांचा मनोरंजक तपशील आहे. कोणाला सोन्याचा तोडा. तर कोणाला सोन्याचे कडे देऊन गौरव केला आहे. जवमाळ, मोहनमाळ, रुप्याची साखळी, तरवारी आणि बंदुकी यांच्या आवरणावर जडविण्यासाठी रुपे आणि चांदी अशी बक्षीसे दिली आहेत. ( पृ. ६० )

याच कैफियतीतील आणखी एक उल्लेख पहा. सावगावच्या लढाईच्या खर्चामुळे सरकारी खजिना रिकामा झाला. तेव्हा महाराजांनी महालक्ष्मी देवीचे अंगावरील दागिने व रत्नजडित मुकुट सुद्धा एकंदर अदमासे ५० हजार रुप-याचा ऐवज तोरगलकराकडे खर्चाच्या तजविजीसाठी पाठविला. पण तोरगल-करांनी ते देवीचे दागिने परत देवीला पोचतेतर केलेच, शिवाय श्री देवीस अभि-षेक करवून शंभर रुपयांची साडी अर्पण केली. ( पृ. ६७ )

गजेंद्रगडकर हिंदूराव घोरपडे यांच्या घराण्यात पराक्रमी पुरुष तर होतेच, पण भुजंगराव आप्पासाहेब घोरपडे यांनी मराठी व कानडी भाषेत कविता केल्या-चेही अवर्जून उल्लेख झाला आहे. ( पृ. ७० ) याच कैफियतीत नवकस आणि सातकस यांची माहिती आणि हिंदुराव घोरपडे यांचे दैवत सुब्रह्मण्य यासंबंधी माहिती सापडते. शिदोजीराव घोरपडे यांनी महालक्ष्मीची देवालयात पुनः प्रतिष्ठा केल्याचा ऐतिहासिक उल्लेख महत्त्वाचा आहे. यवनाचे धांदलीमुळे देवळातून प्रतिमा काढून कपिलतीर्थाजवळ देवालयात गुप्त ठेविली होती. ( पृ. ७२ )

जत्पनमुल्ख जाधव यांनी सावगावच्या लढाईत छत्रपती शिवाजी महा-राजांना पाठीशी घेऊन एका घोड्यावरून मोठ्या हिमतीने सुरक्षित ठिकाणी नेले. ( पृ. ७८ )

पंडितराव घराण्याच्या मूळ पुरुषाने आपली विद्वत्ता पटवून देऊन राज-

घराण्यास धार्मिक बाबतीत भासणारी अडचण दूर केली. घराण्याची विद्यासंपन्नता कायम ठेवण्यासाठी महाराजांनी इनाम देऊन मदत केली. ( पृ. ९१ )

वैद्यकीय कामगिरी केल्याबद्दल हकीम घराण्याला शिवाजी महाराजानी गांव इनाम दिला. राजवैद्याचा हा इनामगाव पिढ्यान् पिढ्या चालू होता. ( पृ. ९८ )

घाटगे बाजीराव व पाटणकर हे तर छत्रपतींचे जामात. कन्यादान, विहिणीला चोळी काकण आणि नंतर बहिणीला दिवाळीची ओवाळणी अशा विविध स्वरूपात इनामे दिलेली आहेत. ( पृ. १०४, १०५, १३५, १४१. )

शिवाजी महाराज ( दूसरे ) मूळ खानवटकर घराण्यातून आलेले होते. त्यांनी नंतर खानवटकर घराण्यातील लोकांना इनामे दिली होती. ( १०८, १०९, ११६ )

मानसिंगराव घोरपडे यांच्या कैफियतीत दसरा, रामनवमी, शिमगा इत्यादी सणांच्या खर्चाबरोबर मोहरमच्या सणासाठीही काही रक्कम खर्ची पडल्याचा उल्लेख सापडतो. ( पृ. १२३ )

पाटणकर, गायकवाड, घाटगे झुंजारराव इत्यादींना लढाईत केलेल्या पराक्रमाबद्दल उत्पन्न दिले होते. या लढायांचे उल्लेख करवीरच्या इतिहासात महत्त्वाचे ठरतात. ( पृ. ११३, ११९, १२६ )

चिमाबाई आक्का पाटणकर या आबासाहेब महाराजांच्या भगिनी. त्यांना आबासाहेबांनी इनाम जमिनी दिल्या आणि त्यापुढे चालू ठेवल्या गेल्या. ( पृ. १३५ )

रेणावीकरांचे घराणे शिवछत्रपतींच्या कामकाजी .पडले. कैफियत देणारांचे वडील बाजीराव रेणावीकर हे लष्करात प्रमुख होते. कापशीकर सेनापती घोरपडे यांनी महाराजांविरुद्ध लढण्याचा बेत केला. त्यावेळी महाराजांनी बाजीराव रेणावीकराच्या प्रमुखत्वाखाली सैन्य पाठविले. त्या:लढाईतच रेणावीकर ठार झाले. ( पृ. १३९ )

मुजुमदाराची कैफियत देणाराचे पणजेसासरे बाळकोबा यांनी एका माजलेल्या हत्तीला सरकार समक्ष धरले आणि वठणीवर आणले. या पराक्रमाचा संभाजी महाराजांनी......साली एक गाव इनाम देऊन गौरव केला. बाळकोबाचे चिरंजीव दौलतराव हे लढाईत ठार झाले. जिजाबाईंनी त्याबद्दल आणखी एक गाव इनाम दिला. ( पृ. १४७ )

पानशे घराण्याच्या कैफियतीत शंभुराजे छत्रपती महाराज यांचा उल्लेख असून किल्ले पन्हाळयास ‘ बादशहाचा वेढा पडला होता ’ असा उल्लेख आहे. त्या वेढ्याच्यावेळी श्यामजी रुद्र पानसे सरकारकामास उपयोगी पडले म्हणून त्यांना

गांवे इनाम दिली. यातील 'बादशहाचा वेढा' हा उल्लेख कोणत्या संदर्भात केलेला आहे ते लक्षात येत नाही. संभाजी महाराजांच्या (करवीर) वेळी कोणत्या बादशहाचा वेढा पडला होता? थोरले संभाजी महाराजांचा उल्लेख असेल काय? कैफियतीवरून काहीच स्पष्ट होत नाही. (पृ. १५१)

हिंदूराव घोरपडे गजेंद्रगडकर यांच्या कैफियतीतील ऐतिहासिक उल्लेखासंबंधी इतरत्र लिहिलेलेच आहे. पण या कैफियतीत बलुतेदारासंबंधी दिलेली माहिती त्यावेळच्या समाजस्थितीवर प्रकाश टाकणारी आहे. बलुतेदाराकडून जहागिरदाराला किती प्रकारांनी मिळकत होत होती? चांभाराकडून जोडा, महाराकडून राबणूक, गुरवाकडून पत्रावळी, कुंभाराकडून मातीची भांडी, तांबोळ्यापासून विड्याची पाने, शिवाय सुतार, लोहार आणि इतर कसबदार यांच्याकडूनही लागेल तसे काम करून घेतले जाई. त्याशिवाय गावात कोठे गुऱ्हाळ लागले तर, दर मोळीस २५ ऊस, रसाची घागर आणि गुळाची साय हे सर्व घेण्याचा हक्क. यात्रेच्या वेळी दर दुकानातून चुरमुरे, खारीक, मिठाई, काकण, नारळ हे मिळत असत. नवरात्रात महालक्ष्मीच्या मंदिरातून दररोज ताट आणि पूर्णाहुतीचा नारळ, तसेच गावातील लग्नकार्याच्या वेळी मानाचा पहिला विडा आणि इतर मानपान मिळत असे (पृ. १५९, १६०)

पन्हाळ्याचे देशपांडे फार पुरातन घराणे. शककर्ते शिवाजी महाराजांच्या काळापूर्वीपासून हे घराणे चालत आले असावे. कैफियतीत म्हटले आहे, 'विजापूरहून आमचे मूळ पुरुष या इलाख्यात आले त्याला अकरा पिढ्या झाल्या' रामचंद्रपंत अमात्य यांच्या कारकिर्दीतही कांही इनामे या घराण्याला मिळाली आहेत. (पृ. १६८)

एका दर्ग्याच्या देखभालीसाठी आणि तेथे येणाऱ्या फकिरांना रोटी पाणी देण्यासाठी मुजावरला इनाम जमीन मिळाली आहे. तेथे भरणाऱ्या उरसाच्या खर्चाबद्दल दरवर्षी काही रक्कमही देण्यात येत होती. हा दर्गा पन्हाळ्यावर असून मुजावरच्या म्हणण्याप्रमाणे, त्याचे इनाम विजापूरच्या बादशहापासून चालत आले होते. कोल्हापूरच्या छत्रपतींनी ते पुढे चालू ठेवले. (पृ. १७२, १७३)

जाधव हवालदार यांच्या घराण्यातील दोन तीन पिढ्यांचे पुरुष निरनिराळ्या लढायात मारले गेले होते. जीजाबाईंनी खूनकाटाबद्दल मौजे लिंगनूर हा गाव इनाम दिला. त्या वेळी, किल्ले प्रसिद्धगड येथे लढाई झाल्याचा उल्लेख कैफियतीत केलेला आहे. त्यानंतर निपाणीकरांबरोबर छत्रपतींच्या झालेल्या लढायात हवालदार घराण्याचे वंशज लढले होते. त्याना नंतर बुवासाहेब महाराजांनी इनाम जमीन आणि आबदागिरीबद्दल काही रोख रक्कम देण्या-

संबंधी सनद करून दिली. ( पृ. १७६. १७७ )

या कैफियतीत एक गंमतीदार उल्लेख आढळतो. हवालदार घराण्याच्या एका वंशजाकडे पर्णशाळेचे काम पाहण्याची जबाबदारी सोपविली गेली. कैफियत देणारे नारायणराव जाधव आणि त्यांचे वडील दौलतराव यांच्या कामगिरीचा उल्लेख करताना म्हटले आहे, 'पर्णशाळेचे दरखाबद्दल सरकारचे विड्याचा डबा घेऊन विडे कचेरीत देते समयी सरकार सेवेत असावे लागते, शिवाय कोट करवीरचे सरदारकी बद्दल गंगावेशीचे दरवाजेच्या रखवालीस बारगीर घेऊन पहाऱ्यावर राहण्याची वहिवाट आहे.' ( पृष्ठ १८०-१८१ )

राजोपाध्यांची कैफियत बरीच मोठी आहे. त्यात वर्षभरातील अनेक व्रत वैकल्यांचा उल्लेख केलेला आहे. 'आपण स्वामीचे कुलगुरू यास्तव स्वामी कृपाळू होऊन .. ......गावाच्या सनदा करून दिल्या.' हे घराणे कोल्हापूरचे पहिले संभाजी महाराज यांच्या कारकिर्दीपासून राजवाड्यातील धार्मिक विधी पार पाडीत होते. त्यांना मिळालेल्या इनामात 'हुजूर ज्योतिषाचे वतन' असाही एक उल्लेख आहे. त्याशिवाय कोट करवीर, प्रसिद्ध गड, पावन गड, सामान गड, सोनगड इत्यादी ठिकाणची फडणीशी या घराण्याकडे होती. पर्व-काळ, चंद्रग्रहण, अग्निहोत्र यांच्या संदर्भातही राजोपाध्यांना कांही इनामे मिळाली होती. ( पृष्ठ १८३ ते १८५ )

निपाणीकराबरोबर झालेल्या लढाया कोल्हापूरच्या इतिहासात एक प्रकारे प्राणघातक ठरल्या. विशेषतः सावगावच्या लढाईने कोल्हापूर राज्याच्या प्रतिष्ठेवर फार मोठा आघात केला. म्हणूनच की काय त्या लढायांत ज्यांनी निकराने आणि प्राणपणाने कामगिरी केली, अशा अनेक घराण्यातील पुरूषांना गावे आणि जमीन इनाम देण्यात आली होती. बहिरजी भोसल्यांच्या कैफियतीत असाच एक उल्लेख आहे. बहिरजीचे बंधू बळवंतराव भोसले निपाणीकर यांच्या लढायाच्या वेळी, 'हुजूर स्वारी समागमे लष्कराबरोबर होते. तेव्हा नेज मुक्कामी तोफेचा गोळा लागून ठार झाले.' त्याबद्दल बहिरजीना काही गावे इनामे मिळाली. ( पृष्ठ १९१ )

आप्पाजीराव गायकवाड यांच्या कैफियतीतही सावगांवच्या लढाईचा उल्लेख करून म्हटले आहे 'लढाईत कैलासवासी शिवछत्रपती महाराज घोड्यावरून पडून गाळात रुतले. तेव्हा आमचे वडिलांनी बहुत कस्त करून काढून आणिले.' हा उल्लेख इतरत्र कोठे आढळत नाही, आप्पाजीराव गायकवाडांच्या कैफियतीत तो आवर्जून केलेला आहे ( पृष्ठ १९६ )

बापूजी शिंदे यांच्या कैफियतीत आळत्याच्या लढाईचा महत्त्वाचा उल्लेख

आहे. बळवंतराव शिंदे यानी आप्पासाहेब पटवर्धनांना धरून आणले होते. त्यानंतर पट्टणकुडीच्या लढाईत याच बळवंतरावाला भाल्याची जबर जखम झाली. निपाणीकरांच्या लढाईतही बळवंतराव जखमी झाला होता. एवढा प्रदीर्घ काळ अनेक लढायात भाग घेणाऱ्या फार थोड्या लोकांत बळवंतरावाचा समावेश करावा लागेल ( पृष्ठ २०० ).

खेडकरांचे घराणे फार पुरातन. शककर्ते शिवाजीमहाराजांनी सिंहासनारूढ होण्यापूर्वी खेडकरांच्या पूर्वजांना रत्नागिरीहून स्वारीबरोबर आणले होते. त्यानंतर या घराण्याचा उर्जितकाळ होत गेला आणि पुढे पन्हाळ्याची फडणिशी मिळाली. पुढच्या काळात, म्हणजे इ. स. १८०० मध्ये शिंद्यांच्या कंपूने कोल्हापुरला वेढा दिला त्यावेळी नारायण आबाजी खेडकर लढाईत उपयोगी पडला ( पृष्ठ २१० ).

राजघराण्यांतील दिवंगत स्त्री-पुरुषांच्या अस्थी काशीक्षेत्री गंगार्पण करण्याच्या कामगिरीबद्दल रत्नाजी चव्हाण हुजरे यांना इनाम जमिन मिळाली. ' मातोश्री आईसाहेब देवाज्ञा पावली त्याच्या अर्धेबद्दल महायात्रेस रवाना केले. ' या उल्लेखातील मातोश्री म्हणजे संभाजी महाराजांची आई राजसबाई असावी असे संदर्भावरून दिसते. त्यानंतर रत्नाजीने खुद्द संभाजी महाराजांच्या अस्थी नेल्या व गंगोदकाच्या कावडी आणल्या म्हणोन १७६२ साली सनदा करून दिल्या ( पृष्ठ २१२ )

रामचंद्रभट प्रधानाच्या पूर्वजांना करवीर निवासिनीचा साक्षात्कार झाला व तिने पुन्हा देवालयात आपली स्थापना करावी अशी आज्ञा केली. परचक्राच्या भयाने श्रीमहालक्ष्मीची मूर्ती पूजाऱ्याचे घरी ठेविली होती. हिंदुराव घोरपडे यांच्या कैफियतीत या संदर्भाचा अधिक तपशील आढळतो. ( पृ. ७२ ) याच भट प्रधानाच्या पूर्वजांनी, ' श्रीचे आवारात दुकाने बांधून श्रीकडे उत्पन्न केले. ' ( पृ. २१६ )

निंबाळकर सरलष्कर घराण्यात शिवाजी महाराजांची मुलगी बाळाबाईआक्का ही दिलेली होती. या घराण्याला सरलष्करी दिली तेव्हा चार गांवे इनाम दिली. शिवाय, जामात म्हणून, दररोज शिधा, विड्याची पाने, सुपारी, मशालीचे तेल, न्याहारीचे सामान, मसाला, दसऱ्याची सनगे, बकरी, कुटुंबांतील बायकांना चीट लुगडी ' आणि इतर बरीच खर्ची दिली जात असे. ( पृष्ठ २२० ).

संस्थान मठ करवीरची इतिहासपर माहिती पौराणिक पद्धतीने दिली आहे. ' जैन आणि बुद्ध धर्माच्या विचाराचा प्रचार थांबवून वैदिक धर्माचा प्रभाव कायम ठेवण्यासाठी ' या मठाची स्थापना झाली. नंतरच्या काळात या

धर्मपीठावर बरेच आचार्य येऊन गेले. मठाचा योगक्षेम चालविण्यासाठी छत्रपतीबरोबरच, नेसरीकर शिंदे, लक्ष्मीबाई घोरपडे इत्यादींनीही इनाम जमिनी दिल्या होत्या. (पृ. २२५)

जोशीराव घराण्यात 'सरज्योतीषेपणाची वृत्ती' आणि त्यानिमित्त दिलेले वतन यांचा तपशीलाने उल्लेख केला आहे. त्याशिवाय चैत्र महिन्यापासून बारा महिन्यांची व्रतवैकल्ये, सणवार, धार्मिक विधी, श्राद्धपक्ष, हव्यकव्य, ग्रहजप, अनुष्ठान अभिषेक, इत्यादी अनेक धर्मकृत्यांसाठी नक्त नेमणूक केली होती. त्याखेरीज पंचाग श्रवण, रामनवमी, गोकुळाअष्टमी, श्रावणी, गणपती उत्सव, संक्रांत इत्यादी सण आणि उत्सव याबद्दलही जोशीराव घराण्याला वार्षिक नक्त रकमा मिळत होत्या. बाळजोशीराव यांनी लढाईवर जाण्यासाठी मूहुर्त काढून दिल्याचे शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीतील उल्लेख कोल्हापूरच्या इतिहासात सापडतात (पृ. २२९.)

राव विश्वासराव गायकवाड घराणे स्वामिनिष्ठेसाठी प्रसिद्ध होते. त्यातील पराक्रमी पुरुषांनी लढायात प्राणार्पणही केले. या घराण्याची कैफियत मात्र अपूर्ण आहे. ती पूर्ण स्वरूपात सांपडली असती तर, कोल्हापूरच्या इतिहासातील काही महत्त्वांचे उल्लेख मिळाले असते. या कैफियतीतील एक मनोरंजक उल्लेख, 'शत्रूकडील मानकरी रणनवरा घोड्यास व आपल्या कपाळास बाशिंग बांधून आलेला, त्यास ठार करून पुढे चालून घेतले' असा आहे. (पृ. २४०)

सेनापती घोरपडे आणि हिंदूराव घोरपडे या दोन घराण्यांच्या कैफियतींचे उल्लेख इतरत्र दिलेले आहेत. घोरपड्यांचे तिसरे घराणे अमीरुल उमराव हे ही तितकेच प्रसिद्ध होते. या घराण्यातील पुरुषांनी पेशवाईच्या काळात विशेष कामगिरी बजावली. त्यामुळे त्यावेळचे उल्लेख कैफियतीत सापडतात. गुत्ती संस्थानची स्थापना आणि शिदोजीराव व मुराराव यांचे उल्लेख ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहेत. (पृ. २४१)

पंडितांचे घराणे म्हणजे छत्रपतींचे गुरुघराणे. सिद्धेश्वरबोवांचा शिवाजी महाराजांनी गुरुमंत्र घेतला. त्यांनीच नंतर निपाणीकरांच्या हल्ल्यापासून राज्याचे रक्षण करण्यासाठी, 'इंग्रज सरकारचा स्नेह करावा म्हणजेच बंदोबस्त होईल,' अशी महाराजांना सूचना केली होती.

कैफियतींचे विशिष्ट स्वरूप, त्यातील महत्त्वाचे उल्लेख आणि त्या त्या घराण्यांनी केलेली कामे, यांचे त्रोटक वर्णन वरील माहितीवरून लक्षात येईल. या कैफियती सादर करणारांपैकी अनेकांनी आपल्या सनदा दग्ध झाल्या, गहाळ झाल्या, लुटीत गेल्या, असे म्हटलेले आहे. त्यामुळे मूळ सनदात नमूद केलेली इतिहासपर माहिती मिळू शकली नाही. सनद देताना तीत कोणत्या कारणांसाठी

ती दिली गेली, या उल्लेखा बरोबरच, त्या घराण्याचा त्रोटक इतिहास लिहिण्याची प्रथा होती. पण अनेकांच्या सनदा नष्ट झाल्यामुळे तो इतिहासही समजू शकत नाही.

कैफियतीत आलेल्या काही शब्दांचे अर्थ मात्र उलगडत नाहीत. उदाहरणार्थ पालालंती ( पृ. १११ ) पडीद ( पृ. ७३ ) मुग्धप्रश्न ( पृ. २३७ ) पितारखर्च ( पृ. २०४ ) हुटावली ( पृ. २९ ) किनाळ ( पृ. २३ ) तटफणसी ( पृ. १९५ ) इत्यादी.

कैफियतींतील वर्णनाच्या ओघात काही शब्द सहजगत्या पण अत्यंत समर्पक आलेले आहेत. उदा. वसनागर, हरहर वाजविणे, शिव झाले, पर्णशाळा इत्यादी.

कैफियती प्रसिद्ध केल्याबद्दल श्री. नानासाहेब गायकवाड यांना धन्यवाद.

छत्रपती शहाजी महाराज यांनी गेली अनेक वर्षे इतिहासविषयक साहित्य आणि साधने प्रसिद्ध करण्यासाठी सक्रीय प्रोत्साहन देण्याचे बहुमोल कार्य हाती घेतले आहे. त्याची फलनिष्पत्ती म्हणून प्रथम देवासच्या पवार घराण्याची आणि अलीकडे करवीरच्या छत्रपती घराण्याची इतिहास साधने प्रकाशात येऊ शकली. महाराजांची इतिहासविषयक आवड त्या क्षेत्रातील सर्वांना चांगली माहीत आहे. त्यांच्या प्रोत्साहनाने इतिहासातील अनेक अज्ञात दालने खुली होतील अशी आशा आहे.

जानेवारी १९७१

‘ ज्ञानेश ’ १२०५/४ शिवाजीनगर, पुणे ४

स. मा. गर्गे



‘ करवीर सरदारांच्या कैफियती ’ हा ग्रंथ
क्षत्रिय कुलावतंस मेजर जनरल हिजहायनेस सर
**श्रीमान् महाराज शहाजी छत्रपती,** जी. सी., एस्. आय्.
महाराज सरकार करवीर यांचे पूज्य चरणी सादर समर्पण

— खंडेराव आनंदराव गायकवाड

## सेनापती घोरपडे कापशीकर घराण्याची कैफियत

सेनापती दप्तर / इ. स. १८६७

यादी संस्थान कापशी येथील घोरपडे सेनापती यांचे घराणेचे पराक्रमाची वगैरे प्राचीन माहीती खुदावंत अण्डरसन साहेब बहाद्दूर पोलीटीकल एजंट करवीर यांनी मागविल्यावरून संस्थानचे जुने कागद नागनूरचे दप्तरातून हुजूर नेले आहेत ते माहीती करिता पाहीले. त्यात पारशी लिपीचे कागद वगैरे पूर्वीचे फेरिस्तात लागले असून पहाण्यास मिळाले नाहीत. जे कागद पाहिले त्यांजवरून व आणखी माहीतीवरून वगैरे हकीगत कलमवार—

(१) कापसीकर सेनापती, गजेंद्रगडकर हिंदुराव, दत्तवाडकर अमीरुल उमराव या तीन घराण्यांचे मूळ पुरुष म्हाळोजीराजे घोरपडे व शककर्ते शिवाजी महाराज यांचे वडील शहाजीराजे भोसले बादशाहीत सरदार होते. हिंदू धर्माचे कामात पादशाहीत विकल्प आलेवरून म्हाळोजीराजे व शककर्ते शिवाजीराजे यांचे हिंदुधर्म संस्थापन करणेबद्दल एकमत होऊन बेलभंडार परस्पर देऊन तह जाहाला. तेथून पादशाहाचे हुकुमतीत न चालता राज्याची वृद्धीस आरंभ करून प्रांत काबीज करित चालले तेव्हा मराठी फौजेचा बंदोबस्त करण्याबद्दल पादशाहाकडून मुसलमान सरदार येऊन त्याजबराबर कितीएक युद्धप्रसंग जाहले. त्यात दिवसोदिवस मराठी फौजेस जय प्राप्त जाहला. देश दुर्ग हस्तगत केले. कितीएक नवीन किल्ले बांधीले व जीर्णोद्धार केले. नंतर शके १५९६ आनंदनाम संवत्सरे जेष्ठ शुद्ध १३ इ. सन १७७४ या साली रायगड येथे शिवाजी राजे यांस हिंदुपदपातशाहा छत्रपती म्हणोन राज्याभिषेक केला. तेथोन राजशकास आरंभ. पुढे बादशहाकडिल मुसलमान फौज प्रांतात येऊन त्यांनी घेतलेले अंमल उठवित. पुन्हा मराठे यांनी बसवावे, असे चालत होते. इतक्यात शके १६०२ म्हणजे

इ. सन १६८० या साली शिवाजी महाराज हे रायगडास कैलासवासी झाले. त्यांस पुत्र दोन. वडील संभाजी, दुसरे राजाराम.

संभाजी महाराज किल्लेवर होते ते शिवाजी निवर्तल्यावर रायगडास जाऊन राज्य चालवू लागले. ते कबजी कनोजा ब्राम्हण याचे नादी लागोन राज्यात अव्यवस्था जाहली. तेव्हा औरंगजेब बादशाहा हिंदू धर्माचे देवस्थान वगैरेचा नाश करित पुढे मलकापुरास आले. तेथून संभाजी महाराज यांचा बंदोबस्त करणेबद्दल फौज ठेविली. तेव्हा संभाजी महाराज संगमेश्वर मुक्कामी होते. हे वर्तमान म्हाळोजी घोरपडे यांस समजल्यावरून ते महाराजांकडे संगमेश्वरी गेले. तेथे लढाई जाहली. शके १६१० म्हणजे इसवीसन १६८८ सालात म्हाळोजी घोरपडे[1] ठार पडलेवर संभाजी महाराज यांस धरून नेले. नंतर बादशाहाची स्वारी औरंगाबादेस जाताना तुळापूरचे मुक्कामी संभाजी महाराज यांचे डोळे काढले. त्यावरून ते तेथेच कैलासवासी जाहले.

( २ ) संभाजी महाराज निर्वतल्यावर राजाराम महाराज यांचे नावे राज्य चालविले तेव्हा म्हाळोजी घोरपडे यांचे पुत्र तीन : वडिल संताजी, दुसरे बहिर्जी, तिसरे मालोजी असे तीन व विठोजी चव्हाण, म्हाळोजी घोरपडे यांजकडे होते. यांनी आपले वडील मारल्याचा सूड उगवावा म्हणून द्वेष धरून फौज जमावानिशी बादशाह यांजवर तुळापूरास जाऊन, बहुत तसनस करून, बादशहाचा मोड करून, डेऱ्याचे सोन्याचे कळस, शिक्के कट्यार पाडाव करून राजाराम महाराज यांजकडे विशालगडी आणिले. तेव्हा संताजी घोरपडे यांस ममलकत मदार, बहिर्जी यांस हिंदूराव, मालोजी घोरपडे यास अमीरूल उमराव असे किताब देऊन विठोजी चव्हाण यांस हिंमतबहाद्दरी दिली. तेव्हा सेनापतीपद धनाजी जाधव माळेगांवकर यांजकडे होते. त्यांची मुसलमान सरदार शाहीस्तेखान यांशी लढाई जाहली. धनाजी उधळले जाऊन संताजी घोरपडे यांनी त्या प्रसंगात मर्दुमी केल्यावरून शके १६१० या सालीच सेनापतीपदाचा अधिकार देऊन, ममलकतमदार किताब बहिर्जी घोरपडे हिंदूराव यांस दिला. नंतर आणखी औरंगजेबाकडिल मुसलमानी फौजा लक्षावधी राज्यात फिरू लागल्या. राजाराम महाराज विशाळगडी आहेत, त्यासमयी किल्ल्यास शत्रुकडील वेढा पडल्यास अडकून पडावे लागेल, असे मनात येऊन राज्याचे संरक्षण रामचंद्र नीळकंठ अमात्य व संताजी घोरपडे सेनापती यांस सांगून आपण चंदीस गुप्तरूपे हरजिनसी

वेश धरून शके १६११ इसवी सन १६८९ साली कर्नाटक प्रांतात निघोन गेले. या प्रांती गनिमाची धामधूम बहोत होऊन कुल मराठे यांनी इमानास खता करून गनिमाकडे मिळाले. देश दुर्ग गनिमांनी हस्तगत केले. राज्यात काही अर्थ उरला नव्हता. ते प्रसंगी संताजी घोरपडे यांनी हिम्मत धरून आपले जमावानिशी शत्रुवर जाऊन मुसलमान सरदार शेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व ज्यानिसारखान ऐसे कितीएक उमदे वजीर युद्धप्रसंग करून बुडविले. जागा जागा गनिमास कोटगा म्हणजे वेढा घालोन नेस्तनाबूत केले. तेव्हा संताजी घोरपडे सेनापती यांची फौज आज आगाडी, तेथे दुसरे दिवशी पिछाडी, असा जमाव होता, कूच करीत होते. लष्करच्या अनेक तुकड्या प्रसंगा-प्रमाणे करून शत्रूवर छापा घालावा, स्वतः राज्यसंरक्षण व काबीज करण्यास असाधारण काम केले. त्यावरून मुसलमान फौजेचा मारा होऊन औरंगजेबास दहशत लाविली. जागृती, स्वप्नात संताजी घोरपडे त्यांस भासू लागले. असे जाहल्यावर शके १६१४ इसवी सन १६९२ या साली इकडील राज्याचा बंदोबस्त होऊन स्वतंत्र राज्य चालवू लागले. ते विषयी रामचंद्र नीलकंठ यानी चंदीस राजाराम महाराज यांसी विनंती पत्र पाठविलेवरून चंदीचे मुक्कामाहून संताजी घोरपडे यांस सरदेशमुखीचे वतन अजरामरामत करून प्रांत मिरज, पन्हाळा, कोल्हापूर, नांदेर, विटे, भालवणी, खटाव अशा प्रांताच्या सनदा पाठविल्या. तिकडे चंदीस महाराज गेल्यानंतर औरंगजेब बादशहाकडून झुलपूकार-खान सरदार चंदीस जावून युद्धप्रसंग चालला. तेथे धनाजी जाधव यास सेनापती-पद मिळाले होते. झुलपुकारखान यांस चंदीस वेढा दिल्यावरून तेथून तजवीजीने निघोन महाराज या देशी आले. ते सिंहगड मुक्कामी शके १६२१ इसवीसन १६९९ साली कैलासवासी जाहले[१].

राजाराम महाराज यांची राणी ताराबाईसाहेब यांनी आपले ज्येष्ठ पुत्र शिवाजी महाराज यांचे नावे राज्य चालविले. पुढे शके १६२९ म्हणजे इसवी-सन १७०७ सालात, जे संभाजी महाराज बादशहाने धरून नेले होते त्यांचे पुत्र शाहूमहाराज फौज घेऊन या प्रांती आले तेव्हा ताराबाईसाहेब यांनी मनात विकल्प आणोन धनाजी जाधव यांस त्यांजवर पाठविले. ते तिकडेच मिळाले[२]. तेव्हा सेनापतीपद पूर्ववत प्रमाणे संताजी घोरपडे यांस शके १६३१ इ. स. १७०२ या साली दिले[४]. यानंतर मोगलाई फौज भूदरगडास येऊन वेढा दिला

होता तो पराजय करून पूर्वदिशेस कामकाजास जात असता शके १६३६ इ. स. १७१४ साली म्हसवडकर माने यांनी दंगा करून मारले. याप्रमाणे संताजी घोरपडे यांचे वर्णन असोन, दुसरे बहिर्जी घोरपडे हिंदूराव ममलकत मदार यांनी व त्यांचे घराण्यात सिधोजी घोरपडे व मुरारराव घोरपडे असेच महान पराक्रमी झाले. त्यांनी पराक्रम केलेचा वगैरे तपशील गजेंद्रगड व सोंडूर संस्थानात आहे. तिसरे मालोजी घोरपडे अमीरुल उमराव यांचे घराण्याची हकीकत दत्तवाडास आहे.

(३) संताजी घोरपडे सेनापती यांस पुत्र दोन. पैकी राणोजी घोरपडे लढाईत ठार पडले. पिराजी घोरपडे यांस सेनापती अधिकार शके १६३७ मन्मथनाम संवत्सरे इ. सन १७१५ या सालात जाहला. ते मोठे पराक्रमी तलवार बहाद्दर कर्नाटक वगैरे प्रांतात स्वाऱ्या करीत असत. ते स्वारीस जात असता नागनूर कर्यात नूल येथेच देशमुख यांच्याशी झुंज जाहले. त्या प्रसंगात पिराजी घोरपडे सेनापती शके १६५१ इ. सन १७२९ साली ठार पडले. या कारकिर्दीत कुरुंदवाडचे पटवर्धन यांचे मूळपुरुष त्रिंबक हरि यांस मिरज प्रांत देशमुखी व सरदेशमुखीची मुतालकी व सरंजामी तालुकेचे काम शके १६४२ इ. स. १७२० या सालात सांगितले होते. या समयी नागनूर गाव खूनकाटे वंशपरंपरेचे कराराने दिला.

(४) सदर पिराजीचे चिरंजीव राणोजी घोरपडे याचे वय लहान पांच वर्षाचे होते. तेव्हा श्री द्वारकाबाई आईसाहेब, म्हणजे संताजी घोरपडे सेनापती यांची स्त्री, लग्न करून घेतलेचे तिसरे दिवशी संताजी घोरपडे म्हसवड मुक्कामी पडलेपासून पातीव्रत्यपणा, आच्यारसंपन्न ब्राह्मणास गांव व जमीन वगैरे धर्म करून सत्पुरुषाचा आनुग्रह घेवून महान् समर्थ होत्या. कोणी व्याधीग्रस्त जिव्हादी अवयव रहीत मनुष्यास या बाईचा आशिर्वाद मिळेल तर मनःकामना पूर्ण होत असे. यानी श्रीराम ऊपासना करून रामनवमी उत्सव आरंभिला. आशा द्वारकाबाई साहेब संस्थानचे काम चालवीत होत्या.

राणोजी घोरपडे यांस सेनापतीपद देणे असता उदाजी चव्हाण यानी सेनापती आपणास मिळावी म्हणोन खटपट केली. तेव्हा घोरपडे मोठे फौजबंद सबब चव्हाण यांस, तुम्ही याजबरोबर लढाई करावी, तुम्हांस जय येईल तर, सेनापतीपद देवू असे राजमंडळात विचार होऊन सांगितले. त्यावरून युद्ध

प्रसंग व्हावा असे ठरले. तेव्हा घोरपडे यांजकडे मोठमोठे नामांकित सरदार होते. त्यांचा तपशील—

१ नारायणराव घोरपडे, ईचलकरंजी
१ शाहाजी बागुल यलगुडकर
१ बाबाजी शिंगाडे तंलदगे
१ लिंब्राजी भांडवल नसलापुर
१ गिरजोजी जाधव सिरगुजी
१ खंडोजी पीसाळ कैंप नेज
१ सुलतानजी गायकवाड हुपरी
१ जानोजी खैरात, रांगोळी
१ कानोजी काळे, सदलगे
१ सयाजी सावंत दानवाड येकसंबे
१ सयाजी पुणेवन कारदगे
१ येडाजी सावंत टाकली
१ आप्पाजी शितोळे आंकली
१ संताजी मोहीते रेंदाळ
१ आनंद बाबुराव शिरदवले
१ हुसेनखान यमगरणी भविसी
१ शाहाजी गायकवाड अबदुललाट

ही नावे समजताच, याशिवाय आणखी असेच असून एकंदर फौज जमाव होवून उदाजी चव्हाण यांजबरोबर लढाई जाहली. त्यात द्वारकाबाईसाहेब यानी पालखीत राणोजी घोरपडे यांस बसवून आपण घोड्यावर बसून एकदम हरहर वाजविल्याबरोबर उदाजी चव्हाण यांचा मोड होवून कृष्णा पार करून दिलेवर आपजय पावल्यामुळे मोंगलाईत निघोन गेले. सेनापतीपदाची वस्त्रे राणोजी घोरपडे यांस शंभु छत्रपती यांनी शके १६६२ इसवी सन १७३० सालात दिली.

त्यानंतर शके १६५७ नलनाम संवत्सरे, राजशके ६२, इसवी सन १७३५ साली राणोजी घोरपडे सेनापती यांचे नांवे पत्र आले त्यात, तुमची सेनापती तुम्हांस सरंजाम आम्ही करून पेशजी प्रमाणे करार करून दिली असे, तरी स्वामी सेवा कुल यकत्यारीपणे करून असेत. स्वामी तुमचे विशेषेत्कारे उर्जीत करून चालवीतील, म्हणोन जेष्ठ श्रु॥ २ ईंदुवासरी होवून या काल-किर्दीत सेनापतीपदाखाली सरंजाम पूर्ववत प्रमाणे चालणेबद्दल महाराज सरकार कारभारातून व बाळाजी बाजीराव मुख्य प्रधान याजकडून ताकीदी झाल्या. त्यावरून सरंजाम चालत असलेला समजतो तो—

१ मुजमी दप्तरची हुजूरने मनोळीचे मुक्कामी सरंजाम नीवडून यादी करून दिली. त्यात प्रांतवार ४०१ गांव लागले आहेत. शके १६५३ इसवी-सन १७३१ साली.

१ देशमुखी व सरदेशमुखीचे वतनाचे प्रांत मिरज,—पन्हाळा,—कोल्हापूर, हवेली,—नांदेर,—विटे,— भालवणी, ईंदापूर, एकूण प्रांत व या वतनास उमळी ईनाम गांव इचलकरंजी—शिरढोण,—कुरुंदवाड,—आलास,—चंदुर, येकूण गांव पाच मिळोन —

१ संरजामी परगणे—

| | |
|---|---|
| १ प्रांत रायबाग | १ प्रांत पाच्छापूर |
| १ प्रांत ढवलेश्वर | १ प्रांत दलबुरगे |
| १ प्रांत हुक्केरी | १ प्रांत होनबुंद |
| १ प्रांत गलगले | १ प्रांत मुधोळ |
| १ प्रांत आरगळ | १ प्रांत तेरदाळं |
| १ जमखंडी | १ गोकाक |
| १ जमगीर | १ काकती तर्फ कार्डोली |
| १ माचनुर | १ तर्फे चंदगडे |
| १ हवेली मुदगल | १ परगणे करुर सलाबत |
| १ कुपटगी | १ हणमसागर |
| १ कारड | १ मुदलावी. |
| १ बागलकोट | १ लोकापूर |
| १ यादवाड | १ अनवल |
| १ रुलीवगरिसागू (?) | १ प्रांत मीरज |
| | १ कागल प्रांतापैकी देह २६ |

सरंजामापूर्वी वहिवाटीस असून जमींदार मार्फत रसदी अैवज घेणेची चाल होती. जेथे जमींदाराकडून अगर दुसरे कोणाकडून पुंडाई जाहल्यास तेवढ्यापूर्ते बंदोबस्तास फौज जावून आंमल चालवीत असत. आशा कामांत आंताजी नरसिंह पटणकुडीकर दक्षिणेत नेमले होते.

पदरचे जहागिरदार लोक: यांनी चाकरीस पूर्वोक्त प्रमाणे येणेविषयी बाळाजी बाजीराव पेशवे यांच्याकडून ताकीदी जाहल्या ते—

महादजी शितोळे आंकलीकर, १ यमाजी रुद्र नेरलीकर

बाबाजी सावंत दानवाडकर, १ लिंबाजी भांडवल नसलापूर
रघुनाथ देसाई निपाणीकर

याप्रमाणे ताकीदी झाल्या आहेत. त्याप्रमाणे स्वास्थ असून या कारकिर्दीत पदरचे लोकास देणे दिले त्यातील लोक उदयास आले त्यांचा तपशील—

१ ईचलकरंजीकर नारो महादेव जोशी म्हणोन कोकणस्थ ब्राह्मण, कापशीचे मुळ पुरुष संताजी घोरपडे सेनापती याजपाशी येवून राहिले त्याजवर मर्जी बसोन काजकामात वागू लागले. पुढे त्याजकडून इचलकरंजी वगैरे गावे संरजामात चालोन सरदेशमुखी व देशमुखी अंमल मुतालकी सांगितली होती. नंतर संस्थानातील कागदपत्रे इचलकरंजीस सुबराव घोरपडे यांनी नेवून ठेविल्यावरून राणोजी घोरपडे सेनापती यांचे सिक्केही त्यांजकडे राहीले होते. त्यावरून गफलतीने कागदपत्राची साधणुक करून वतन व गांव वगैरे अनुभवितात. पेशवे सरकारचे आप्तपणामुळे नाईलाज होवून पेशवे पराभव पावल्यावर राजमंडळात वागण्यास तक्रार चालविली.

इचलकरंजीकर ब्राम्हण जोशी उपनावाचे. सेनापती मराठे असून चिरंजीव म्हणोन घोरपडे आडनावाने इकडून पत्रे जावून त्याजकडून तीर्थरूप राजेश्री म्हणोन पत्रे येतात. नी।।· आफ्तागिरी डंका घोरपडे किनाळीचा आहे.

२ कुरुंदवाड : त्र्यंबक हरी यास पूर्वी देशमुखी वतन मुतालकी व सरंजामी प्रांताची वहीवाट सांगीतली होती. त्यातील वतनी गाव कुरुंदवाड त्याजकडे राहून घोरपडी नी।। दिले ते हालीपर्यंत वागवितात. पुढे पेशवाईतून सरंजाम मिळविला. कुरुंदवाडकरानी सेनापतीसाहेब यास पत्र लिहिणे जाहाल्यास पदरचे लोकाप्रमाणे लिहितात व इकडून त्यास तशीच जाणेची वहिवाट आहे. त्या गावी शेरी जमीन व कुरण इकडचे आहे.

३ हेरवाडकर : मूळ पुरुष हरीराम. कामकाजात होते त्यास हेरवाड मिळोन घोरपडी नी।। आफ्तागिरी दिली. या गावी शेरी जमीन इकडे आहे.

खेरीज आणखी लहान मोठे लोकांस सरंजामी व इनामी धर्मादाय वगैरे स्वास्थ्य दिलेचा तपशील लिहिण्यास विस्तार होईल म्हणोन लिहिले नाही.

याप्रमाणे चालत असून पुढे पेशवाई जाहाल्यावर किती एक स्वास्थ तिकडे गेले व काही हुजूर राहून राणोजी घोरपडे सेनापती अखेर साल....गाव

लाट ६, कापशी २४, आजरे ३, नूल ६, सोलापूर १, या कर्यातीत मिळून ४० गाव राहून खेरीज दुमाला अमल असता, राणोजी घोरपडे सेनापती शके १७०३ ई. सन १७८१ या सालात कैलासवासी जाहाले.

(५) सदर राणोजी यास स्त्रीया दोन. पैकी आंबिकाबाई मिसाळाची कन्या. लग्न करावयाचा ठराव द्वारकाबाई आईसाहेब यानी करून मराठी रीती-प्रमाणे तीलक लाविला असून श्रीमन्त आईसाहेब माहाराज यानी आपली भाची शिंदे यांची कन्या करावी म्हणून आग्रहाने लग्न करवीले. मागाहून आंबिकाबाईचे लग्न झाले. आंबिकाबाई वयाने जास्तच असून प्रथम पुत्र संताजीराव आबासाहेब जाहाले. मागाहून लक्ष्मीबाईस सुबराव बापूसाहेब जाहाले. यापुढे उभयतास संतती जाहाल्याचा तपशील—

आंबिकाबाईसाहेब यासी—

१ संताजीराव जेष्ठ, २ म्हालोजी घोरपडे, ३ पीराजी घोरपडे, ४ जयराम घोरपडे, ५ राघोजी घोरपडे,

लक्ष्मीबाईसाहेब यासी—

१ सुबराव, २ सखारामराव (नष्ट) ३ नारायणराव, ४ द्वारकोजीराव.

या प्रमाणे नऊ पुत्र झाले. तेव्हा प्रथम पुत्र जाहाले म्हणून संताजीराव व ज्येष्ठ स्त्रीयेचे म्हणोन सुबराब यात, परस्परे आपग वडील, सेनापतीच अधिकार आपणास असावा म्हणोन तंटा सुरू जाहला.

राणोजी घोरपडे यांचे क्रीयाकर्मांतर संताजीराव यानी केले. दुखोठ्याची वस्त्रे संताजीराव यास आली. तेव्हा लक्ष्मीबाईनी वडीलपणाचा तंटा करणार यक संताजीराव यांचा हरतजवीजीने घात करावा म्हणोन मनात आणोन पदरचे सर्व कामदार अनुकूल करून घेऊन सनदा पत्रे दस्ताऐवजी कागद व जीन जीनगीचा बंदोबस्त केला. तेव्हा आंबीकाबाई साहेब याजकडे द्वारकाबाई साहेब यानी आपले खाजगीतील दिवाणाचे घराणेचे मल्हार माहादेव म्हणोन होते, त्यास आपले परिणाम काळी नेमले होते. त्यापासून ते तिकडे होते. त्यांचे चिरंजीव येसो मल्हार यांचे विचारे संताजीराव यांनी मसलत करून पट्टणकुडी येथील गावकर कमावीसदार आनुकूल करून घेऊन रात्रौ कुणबी लोकांचे वेषाने येसा मल्हार सहीत कापशीहून निघोत गावाबाहेर घोड्यावर बसोन पट्टणकुडीस

पावले. ते ठाणे स्वाधीन जाहाले. मागे मल्हार महादेव यास लक्ष्मीबाईनी कद करून बुरजात घातले. घर जिनगी लुटून नेली. संताजीराव यानी पट्टणकुडीहून करवीरास बोलणे चालविले. तेव्हा मोठा तंटा, पेशवे सरकारचे संमतीने निकाल व्हावा याकरिता तासगावास परशरामभाऊ पटवर्धन याजकडे पंचायती नेमली. त्यानी पुण्यास रामशास्त्री याजकडून संमत आणवून, प्रथम पुत्रमुख संताजीराव यांचे पाहिलेने वडील, त्याजला सेनापती द्यावी म्हणोन ठरवून लिहिल्यावरून सेनापतीपदाची वस्त्रे संताजीरावास शके १७०३, ई. सन १७८१ या सालात जाहाली. तालुका लाट वगैरे गाव पेशवे सरकारचे मदतीने स्वाधीन झाला. बाकी पाच भावांस संस्थानपैकी खर्चाबद्दल गाव वगैरे देऊन सेनापती आधीकार चालवीत असता शके १७१५ या साली संताजीराव कैलासवासी जाहाले.

(६) सदर संताजीराव यास पुत्र दोन. वडील रामचंद्रराव दाजीसाहेब, दुसरे राणोजीराव बापूसाहेब वडील रामचंद्रराव यांस सेनापती आधिकार शके १७१६ ई. सन १७९४ साली मिळोन तीन वर्षे वहीवाट केली. नंतर नारायणराव घोरपडे यानी हिंदुस्तानातून येवून शके १७१९ ई. सन १७९७, राजशके १२४, या सालात महाराज सरकारचे मनात सेनापती (पद) देणे नसता आडचण लावून सेनापती वस्त्रे जबरदस्तीने घेतली. तेव्हा त्यांचे वडील बंधू सुबराव हयात असोन गैर रीतीने वस्त्रे घेतली. ती बराबर न झाल्याने शके १७२४ ई. सन १८०३ साली येसा मल्हार यानी प्रीतीराव चव्हाण हिंमत बहाद्दर यांचे विद्यमाने रामचंद्रराव याल सेनापती अधिकार मिळोन नंतर शके १७२८ साली नारायणराव यानी येसा मल्हार यास मुठीचा प्रयोग केल्यावरून ते कैलासवासी झालेनंतर सहा महिन्यांचे सुमारात सन १८०६ साली प्रांतात निपाणीकर यांचा दंगा झाला. नारायणराव व निपाणीकर आप्त असल्याने ते व हे मिळून राज्याचा बखेडा करून तशात कापशी संस्थान जबरीने घेतले. पुढे शके १७३० साली महाराज सरकार व निपाणीकर यांचा युद्धप्रसंग सावगाव मुक्कामी जाहाला. ई. सन १८०८. तेथे माहराज सरकारचा मोड होवून रामचंद्रराव लढाईत ठार जहाले.

(७) सदर रामचंद्रराव यास पुत्र दोन. वडील संताजीराव. दुसरे लक्ष्मणराव. पैकी लक्ष्मणराव याजला जयरामराव याजकडे नवनिहालास दत्तक दिले. वडील संताजीराव यास सेनापती मिळावयाची. परंतु निपाणकर यांचा

राज्यात दंगा. निपाणकर व नारायणराव आप्त असल्याने उभयता मिळोन राज्याची खराबी केली. महाराज सरकारचा नाईलाज. सबब संताजीराव हरली तर्फ आजरे येथे होते. तेथे चुलते राणोजीराव यात जमून न येई. खर्चाची अडचण. सबब संताजीराव व राघो मल्हार सांगलीस येवून चिंतामणराव आप्पासाहेब पटवर्धन याजकडे संताजीराव राहिले. आणि राघो मल्हार पुण्यास संस्थानच्या विचाराबद्दल जावून पेशवे सरकारात बापू गोखले मार्फत नारायणराव याजकडील सरंजाम परत घेण्याचा ठराव केला. ईतके संधीत बाजीरावसाहेब व इंग्रज सरकारचा युद्ध प्रसंग चालोन बाजीरावसाहेब पराभव पावले. सबब राघो मल्हार करवीरी येवून निपाणीकरांचा बंदोबस्त ई. सन १८१८ साली जाहाल्यावर शके १७४१ ई. सन १८१९ सालात श्री मन्माहाराज छत्रपती आबासाहेब यानी सेनापती अधिकार संताजीराव यास देवून सनद दिली की सेनापतीचे वडील घराणे तुमचे व तुमचे घराण्यात सेनापतीचा अधिकार वडीलोपार्जीत चालत आला व तुमचे वडील स्वामी कार्यावर खर्च जाहाले. सबब पूर्ववत प्रमाणे सेनापतीचा सरंजाम देवून वस्त्रे दिली आहे. तर अनुभव करावा–म्हणोन देवून आबासाहेब व बुवा-साहेब माहाराज यांची स्वारी कापशीस येवून ठाणी स्वाधीन करून निकाल जाहला. पुढे शके १७५६, सन १८३४ साली ज्येष्ठ शु।। ८ स संताजीराव घोरपडे सेनापती कैलासवासी जहले.

(८) सदर संताजीराव यास पुत्र ४ पैकी वडील रामचंद्रराव आप्पा-साहेब यास इसवी सन १८३५ साली सेनापतीपदाची वस्त्रे बुवासाहेब महाराज यानी दिली. पुढे सन १८३८ साली तुळजापुरास जाताना मार्गात बुवसाहेब माहराज कैलासवासी जाहाले. नंतर दरबारचे कामात अव्यवस्था जाहाल्यावरून इंग्रज सरकारातून दाजीकृष्ण पंडित यासी कारभारी नेमले. या वहिवाटीत संस्था-नचे कामात नुकसान जाहले. त्याविषयी रामचंद्रसाहेब यांनी थैल्या वगैरे देवून काम चालविलेचे निकाल जाहले नाहीत ती कलमे—

(१) भाऊबंदास मूळ संस्थानातील खर्चास गाव दिले ते मूळ संस्थानात परत यावयाचे असून जप्त केले ते—

राणोजीराव घोरपडे यांची स्त्री लक्ष्मीबाई घोरपडे मयत झाल्या-वरून वडीलार्जीत सनदा जीन जीनगी गाव खुनकाटे संबंध ईनामी नागनूर, १ व सरंजामी जेनाल, बेलावी व हूसूर खुर्द ३ ऐकूण ४

सुबराव घोरपडे यांचे दत्तकपुत्र संकराजीव मयत कारणाने- चिखलगाव, फेगर, नंदवाळ, बामणे, एकूण ४

आकुबाई वाठारकर यास कन्या म्हणोन दत्तक आंदण दिलेला मौजे हसूर बु॥. १ गाव

येकूण नऊगाव मूळ पुरुषाचे संपादित भावबंदाकडे चालत असलेस संस्थानात येणेबद्दल काम चालले असून इ. स. १८५६ ज्येष्ठ शु॥ ४ रोजी रामचंद्र रावसाहेब हक जाहाले. त्यांचे चिरंजीव हाल्लीचे संताजीराव घोरपडे सेनापतीसाहेब यांचे वय लहान सबब मातोश्री येशोदाबाईसाहेब यानी कौंसलास थैली पाठविली. तिकडून सुपरिंटेंडेंट साहेब बहादूर इलाखा करवीर याजकडील निकाल दाखला घ्यावा म्हणोन लिहून आलेस सबब साहेब बहादूर याजकडे लिहिले असता संस्थानास मर्द वारस आहेत. करिता आपण काम चालवू नये असा जबाब देऊन संस्थानास सरकारतर्फे कारभारी सन १८६१ इसवी सालात नेमले.

( २ ) संस्थानातून दुमाले लोकास गाव दिले आहेत. त्याचा दिवाणी फौजदारी अमल संस्थानी चालणे असून हुजूरची दुमालपत्रे आली म्हणोन त्या गावावरील संस्थानचा हक कमी होत नसून दुमालपत्र हुजूरने हरकत न होणे बाबतीत आहे व असे दुमालपत्रे असोन ज्या त्या मूळ संस्थानात ती स्वास्थे बहुतेक चालू असून आमचे संस्थानचे गाव सरकारात ठेविले त्या विषयी ईनसाफ मागीतला असून निकाल जाहला नाही.

( ३ ) कापशी संस्थान........संस्थानचा तालुका प्राचीन बाद- शाहीतून संपादन केले पैकी हे गाव तेव्हापासून ईकडे सर्वजण अधिकार पूर्वीपासून चालत आला. अलीकडे वतनदार लोकांची नजर हुजूर यावी म्हणतात. बावडे, विशाळगड, कागल, इचलकरंजी येथील अधिकारी त्या त्या संस्थानात आहे. प्राचीन वजईचे गांव व जमीनसुद्धा तिकडे असून........गांवची सरकारात म्हणतात.

एकुण तीन कलमी इन्साफ होण्याचे त्याविषयी आता सेनापतीसाहेब यांचे वय प्रौढ जाहले असून खावंद दयाळू विचार करणार समर्थ आहेत.

एकुण आठ कलमी हकीकत आहेत. संस्थानच्या नुकसानी विषयी कलम आठ यांत प्रकार लिहीला तो एकंदर जाहले वहिवाटीतील हकीकतीत असलेला मजकूर लिहीणे प्राप्त म्हणोन लिहीला आहे. तारीख १६ माहे ऑक्टोबर सन १८६७ इसवी.

बाळकृष्ण मल्हार दिवाण, संस्थान कापशी



---

१ काव्येतिहास संग्रह, लेखांक ४३५

२ राजाराम महाराजांचे निधन २ मार्च १७०० रोजी झाले.

३ ताराबाई व शाहू महाराज यांची खेड येथे लढाई. आक्टोबर १७०७ (करवीर रियासत, पृ. ६७ : गर्गे)

४ संताजी घोरपडे इ. स. १६९७ मध्ये मारले गेले. इ. स. १७०२ मध्ये त्यांचे पुत्र राणोजी मोगलाशी लढत असता ठार झाले.

५ संभाजी महाराजांची राणी जिजांबाई

## पंडित सुमंत घराण्याची कैफियत

कैफियत नं. ५१/ इ. स. १८४६

कैफीयत गणपतराव श्रीनिवास पंडित सुमंत उमर वर्ष ३८ जात ब्राह्मण राहाणार करवीर सुरु सन सबा आरबेन मयातेन व आलफे. मे. पोलिटिकल येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून अंक ६६ सन १८४५ इसवीची यादी आली. त्यांत इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाये चालत आहे त्याजबद्दल त्या लोकाजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डे. र. अंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला. त्यावरुन सनदा पत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा, त्यांस आम्हाकडे वतनी इनाम वगैरे चालत त्याच्या सनदा पत्रे मिळाली ती हजर केला त्याजबद्दल माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहीले प्रमाणे —

(१) हल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील ३१ मजरे जनार्धन वाडी करता रुपये ५५ पैकीं हल्ली खंड येतो तो. रुपये ३३ पैकीं खर्च सर देशकुलकर्णी बाब रुपये २ जाता बाकी रुपये ५८७०।।।· मौजे कोथली तर्फ हवेली येथील सन सीत आरबेन

सालची हुटावली करुन लावणी बरहुकूम

१२३९।।।–।। नक्त आकार बा।। लावणी पत्रकी

३३८।। ≡।· गला कैली दसरी माप १६।।।०।।३।·

यासी आकार दरमनी रकम १ रु. प्रमाणे येकूण आकार १३।– दुसर वनले ०२ गावात लावणी बरहुकूम घेणेचा रिवाज आसोन हीसाबी दाखल करणेचे मामुल पासून रिवाज नाहीं. हल्ली येकंदर

उत्पन्न यादीस दाखल करणे विशी आज्ञा करावे म्हणून चहूमाही देता करु नये.

१५९१।।।-।।।·

पैकीं वजा साल बाकी खर्च वजा जातां खर्चाची बेरीज खाली लिहील्या आन्वये तपशील

५९६।।- सरकारी बाब देणे असोन पावत होत आहे त्याप्रमाणें नक्त व गल्ला

५५० नक्त रुपये

४६।।- गल्ला भात कैली दसरी मापे २। १।। १ यांस येकंदर मणी रुपये १ प्रमाणें

५९६।।- ऐकूण गलेचे खर्च

१३८-।।· हक्कदार महाली वगैरे परभारे पावते आहे त्यप्रा

६९।।।- नक्त रुपये

६८०≡।।गलेबद्दल केली

१३८-।।· ३।३०३।।·

यासी आकार दरमणी रु. १

प्रमाणे एकूण रु.

२७००=।।· गांव निसव ।। हकदार देवस्थान धर्मादाय दर साल सादील वार वगैरे येकंदर साल खेरीज

१९४।।।= नक्तरुपये

७५।·।। गला कैली

२७००=।।·

यासी तपशील

७४ हक्कदार

२९०=।।।· देवस्थान

३५ कामावीसदार नेमनुकी

८९।।≡।।।· सादीलवार खर्च दरसाल

३४।।।·।। हुटभाडे सरकारात गला पाटवणेबद्दल कसर व भाडे

| | |
|---|---|
| ७।≡॥· | धर्मादाय गला केली |
| २७००=॥· | |
| १८।।।· | वतनी सबनीसी आसामी काटे करवीर चालत आहे त्याजवर कारकून देऊन चाकरी चालवित आहे. त्याबाबत |
| ६३६।।।–।।।· | |
| | तपशील |
| ३७४।।।=॥· | ऐन जप्ती आकाराबाबरीतील जमा |
| १४८॥=।· | गले बाबरी रुपये कैली |
| १३।– | तुपाबाबत वजन ०= दर कळले नाही. |
| मापी ००६ | प्रमाणे येकूण खर्च |
| ६३६।।।–।।।· | |
| | येकूण रुपये सहाशे छत्तीस पावणे चवदा आणे एकूण देह १ व मजरवाडी १ अशी दोनी व सबनीसी असामी सुद्धा उत्पन्न येत आहे ते सदरी लिहीले प्रमाणे. |

(२) सदरी लिहिले उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशाकरिता कधी दिले व दिल्यापासून वहीवाट कशी चालत आहे त्याचा तपशील

१ मौजे जनार्दनवाडी व नारायणवाडी येकूण मजरे दोन तीमाजी पंडीत म्हणजे आमचे नीपणजे यासी कैलासवासी शिवछत्रपती यांनी इनाम करार करून राजशके ३८ म्हणजे इंग्रजी सन १७११ इसवी साली सनदा करून दिल्या. त्यास वर्षे १३४ जहाली, त्यापैकी नारायणवाडी सुमार २५ पंचवीस वर्ष चालत नाही. मजरे जनार्दनवाडीची वहीवाट संपादन केल्या तागायत आज-पर्यंत सतत चालली आहे.

१ मौजे कोथळी तर्फ हवेली हा गाव आमचे निपणजेची मातुश्री म्हणजे रघुनाथ नारायण यांची पत्नी नागराबाई इजला क्षेत्र वसांबद्दल इनाम सर्वमान्य करार करून सनद दिली ती राजशक ४१ म्हणजे इंग्रजी सन १७१४ इसवी साली शिवछत्रपती यांनी दिल्ही त्यास वर्षे १३१ जाहाली. तेव्हापासून सतत अनभवीत आहो.

१ कोट कोल्हापूर येथील सबनीसी आसामी वतनी आमचे नीपणजे तिमाजी रघुनाथ पंडीत यांसी कैलासवासी संभु छत्रपती स्वामींनी राजशक ४९ म्हणजे इंग्रजी सन १७२२ इसवी साली करून देऊन सनद दिल्ही त्यांस वर्ष १२३ जाहाली तीथपासून आजपर्यंत चालत आहे.

येणे प्रमाणे उत्पन्न संपादन केले. तागायत सतत आजपर्यंत अनभवीत आहे.

( ३ ) सदरहु उत्पन्न संपादन करणार निपणजे व त्यांची मातुश्री असोन हली वहिवाट आम्ही सतत करीत आहो. उत्पन्नास हिस्येदार वडीलकी आम्ही सबब वडीलकी संबंध येकंदर उत्पन्न वजा जाता राहतात त्या पैकी बाब बद्दल रुपये १७५ पावणे दोनशे तीसरे तक्षीमेस हिस्सा जात नाही. सबब आजी खर्च जाऊन राहीले पैकी वजा करून बाबी राहीले पैकी तीन हिश्ये होऊन वडीलकी संबंध एक हिस्सा आम्ही घेतो. त्यात वाटणी भाऊबंदाची नाही. दुसरा हिस्सा नरसिंगराव रामचंद्र यास जाणेचा त्यापैकी दत्तकाबद्दल आमची समजूत बाबे रुपये ५० पन्नास आम्हांकडे येत तो बाकीचा ऐवज नरसिंगराव दत्तक मातुश्री बाईनाबाई डबीर यांजकडे जातो.

बाकी तिसरा हिसा राहीला त्यांत आम्हीसुद्धा हिश्येदार आणि खुद्द १ दुसरे सखारामराव, तीसरे आत्मारामराव, चवथे त्रिंबकराव, येकूण चार आसामी वाटणीप्रमाणे घेत आहो. शिवाय बाबेबदल सदरी लिहीले त्यांत दत्तकाचा हिस्सा नाही. सबब सदरचे रुपये १७५ आम्ही चार वाटणीनेच घेत आहो. सदरहु सरकारी बाब घेणे ते पैले कलमी लिहीले अन्वये सरकारात रु. ५५० साडे पांचशे पोहचून बाकी राहीले ऐवजांत सदरी लिहीलेप्रमाणे हिश्येवार घेत आहो. शिवाय कोट कोल्हापूर येथील आसामी सबनीसीचे आहे. त्याचे चाकरीबदल निशान मोर्तब कागदपत्रावर मोर्तब सुद असे करावयाचे होते ते काम मुतालिक यांचे हातून घेण्याची वहीवाट होती. हाली चाकरीवर कारकून नाही. कारण असामीबदल नेमनुक होऊन त्या नेमनुकीवर कारकून राहात नाही. ती बाब पदरातून करावे लागते. या कारणाने हल्ली चाकरीवर कारकून नाही.

( ४ ) सदरी पैले कलमा बाबत उत्पन्न लिहीले त्या बाबे सनदा हजर केल्या त्या —

१ मजरे जनार्दनवाडी बाबद राजशक ३८ खारनाम संवत्छरे फाल्गुन बहूल पंचमी रवीवार देशाधीकारी व लेखन वर्तमान बजावील प्रांत पन्हाळा यांचे नांवे नंबर २६३

१ मौजे कोथली बाबद राजशक ४१ जयनाम संवत्छरे आधीक आषाढ बहुल ११ मंदवासरे पुन्यशिल नागराबाई यांचे नांवे इनाम पत्रक ३ नंबर २६४

१ कोट कोल्हापूर येथील सबनीसी आसामी बद्दल राजशक ४९ शुभकृत नाम संवत्छरे मार्गशिर्ष शुद्ध १ प्रतीपदा सौम्यवासरेची राजश्री रखमाजी साळोखे सुभेदार कोट कोल्हापूर यांचे नांवे नंबर २६५

एकूण तीन सनदा सादर केल्या आहेत.

(५) सदरी लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी उत्पन्न नाही. चवथे कलमी लिहीले सनदपत्राशिवाय आणखी सनदपत्रे आम्हाजवळ नाही.

(६) येकून पाच कलमी उत्पन्न.

लिहून दिले हे खरे आहे यांत कमीजास्ती जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकून कलमे साहा लिहून दिल्ही सही तारीख १६ मार्च शक १७६८ पराजयनाम संवत्छरे मु॥ ८ आकटंबर सन १८४६ इसवी दस्तुर आत्माराम डबीर

साक्ष

१ बाळाजीराव राणोजी ममलकत मदार दस्तूर खुद्द

१ गणेश आबाजी कारकून दस्तूर खुद्द

सही गणपतराव श्रीनिवास पंडीत सुमे॥ दस्तूर खुद

मालकाने आमचे समक्ष कैफीयत लिहून दिली आहे. आबाजी लक्ष्मण जोशी सनदापत्रे कामगार



१ सुमंत घराण्याचे मूळ पुरुष जनार्दन हणमंत याना शककर्ते शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक प्रसंगी सुमंतपद दिले. या घराण्यात नंतर नारायणराव, रघुनाथ नारायण, तिमाजी रघुनाथ, गंगाधर तिमाजी, नरसिंग गंगाधर, श्रीनिवास नरसिंग अशा क्रमाने पदाधिकारी झाले. कैफियत देणारे गणपतराव पंडित सुमंत हे श्रीनिवास नरसिंग यांचे पुत्र. (करवीर रियासतीची कागदपत्रे, पहिला खंड. पृ. २७४, २८३ : सं. स. मा. गर्गे).

## हिंमत बहाद्दर चव्हाण घराण्याची कैफियत

हिं. ब. च. घ. इ. / इ. स. १८५०

यादी राजश्री राव हिंमत बहादर व ममलकतमदार व उमदे तुल् उमराव बहादर यांचे वंशात पुरुष जाहले त्याणी काय काय कामे केली व ते कोणते पुरुष कधी कधी जाहले त्यांच्या शके मित्या सुद्धा खाली लिहिले प्रमाणे—

१. मूळ पुरुष वालोजी चवाण हे शाहाजी माहाराज म्हणजे शककर्ते सिवाजी माहाराज यांचे तीर्थरूप याजपासी दौलताबादचे मुकामी चाकरीस राहिले. त्याची शक मिती लागत नसोन शाहाजी माहाराज यांजपासी शेवा करून होते. पुढे शाहाजी राजे हे शके १५४८ म्हणजे शालिवाहन शके मजकुरी विज्यापूरचे पादशाहापासी चाकरीस राहिले. पादशहानी बहुमान देऊन कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त कर्ण्यास सांगितला. त्याचबरोबर चवाणराव असोन त्यास पुत्र राणोजी चवाण म्हणोन जाहले असोन त्याच्या जन्माची शक मिती लागत नसोन वालोजी चवाण हे शूर व पराक्रमी असत. त्या योगाने शाहाजी राजे यांची मर्जी संतोष असोन नेहेमी लढाईचे प्रसंगात काजकाम करून नगदीने खर्चास घेऊन होते. पुढे काही दिवसाने कैलासवासी विज्यापूर मुकामी जाहले. त्यांची शक मिती लागत नसोन अमुक वर्ष शेवा केलेचे लागत नाही.

१. राणोजी चवाण यांचे तीर्थरूप मृत्यू पावल्यावर काही दिवस शाहाजी राजे याणी चवाणराव यांसी आपलेपासी ठेऊन घेऊन नंतर आपले पुत्र सिवाजी माहाराज शककर्ते याजपासी पुणे प्रांती जाऊन राहण्याची आज्ञा जाहलेवरून शककर्ते सिवाजी माहाराज याजकडे पुणे प्रांती जाऊन माहाराज याजपासी राहिले. तेथे माहाराज याणी ठेऊन घेऊन खर्चाचा नगदी ठराव करून देऊन पुढे काही दिवसानी मावळे लोकांची सरदारी दिल्ही. त्यात कामकाजे लढाईचे प्रसंगात

नेहमी केली. पुढे सिवाजी माहाराज याची स्वारी सुरतेवर होऊन मागारी आले-नंतर कोकणात गोवलकोटवर स्वारी केली. तेथे लढाईचे प्रसंगात राणोजीराव चवाण ठार जाहले. शके सुमारे १५९७. त्यास दोन पुत्र. एक विठोजी चवाण व दुसरे मालजी चवाण म्हणोन होत. त्या पौ। मालजी चवाण यांचा नष्टांश जाहला. विठोजी चवाण हे लहान वयात असोन याचे तीर्थरूप सरकार कामावर ठार पडले जाणोन माहाराज याणी सदर उभयता चवाण याचे मुलास माहाळोजी-राव घोरपडे याचे हवाली करून सांगितले की याचे संरक्षण तुम्ही आपले पुत्राप्रमाणे करावे, आसी आज्ञा होऊन खर्चीचा बंदोबस्त करून देऊन घोरपडे याचे हवाली केले. विठोजी व मालजी चवाण या उभयताच्या जन्माची शक मिती लागत नाही. कलम.

१. विठोजी चवाण हे थोर जाहलेवर माहाळोजी घोरपडे याणी सिवाजी माहाराज यास आर्ज करून सरदारी काही स्वाराची करून देवऊन कामाकाजात वागवीत आसे. ते पुढे आष्टप्रधान वगैरे राज्य व्यवसाय करून शके १६०२ रौद्रनाम संवत्सरी वारले.[1] पुढे राजाराम माहाराज यांचे[2] कारकीर्दीस अवरंगजेब पादशाहा दिलीपती हे भारी फौज घेऊन दक्षण देशाच्या बंदोबस्ताकरिता तुळापूर मुक्कामी आले होते आणि या देशात सिवशाईचा बंदोबस्त आहे तो दूर करून मुल्लक घ्यावा म्हणोन इकडील मुलकात तमाम फौजा रवाना केल्या. त्या योगाने नेहमी किले कोटानी वगैरे लढाईचा प्रसंग असता माहाराजानी पादशाहा याचे तोंडावर फौज देऊन धनसिंग जाधवराव यासी पाठविले होते. ते फलटण देशात होते. माहाराज यांची स्वारी विशालगड मुकामी असोन पादशाचे तोंडावर जाधव-राव गेले. त्याचे कुमकेस जाणे म्हणोन विठोजीराव चवाण व संताजीराव घोरपडे व बहिरजी घोरपडे व मालोजी घोरपडे यासी आज्ञा जाहलेवरून संताजीराव घोरपडे त्रिवर्ग बंधुसुद्धा आपले पतक व विठोजीराव चवाण यांचे पतक बरोबर चवाणराव सुद्धा फलटण देशांत जाऊन काही स्वार जाधवराव याजकडून घेऊन, आम्ही पादशाहांचे फौजेवर जातो, असे जाधवराव यास सांगून तुळापूर मुकामी पादशाहाच्या लस्करावर चालून जाऊन तेथे लढाई केली. त्याचे लस्कराचा नाश करून पादशाहाचे डेऱ्याचे तनावे कापून डेऱ्यांस सोन्याचे कलस होते ते आणोन जाधवराव यास भेटून जुलपुकारखान रायगडास वेढा घालून बसले होते तो वेढा उठऊन नंतर तसेच निघोन घोरपडे व चवाणराव मिलोन चौघे फौजसुद्धा

विशालगड मुकामी येऊन सोन्याचे कलस माहाराजाचे सन्मुख ठेऊन मुजरे केले.

ते समई माहाराज यांची मर्जी प्रसन्न होऊन मोठा पराक्रम के( ला ) असे समजून संताजीराव घोरपडे यासी ममलकत मदार हा किताब देऊन विठोजीराव चवाणयासी हिंमत बहादर[३] हा किताब दिल्हे. बहिरजी घोरपडे यासी हिंदुराव हा किताब दिल्हे. मालोजीराव घोरपडे यासी अमीरुल उमराव हा किताब दिल्हे. शालिवाहन शके १६०९ इसवी सन १६८७. पुढे एक वर्षाचे सुमारे रामचंद्र-पंत अमात्य याणी माहाराजासी विनंती करून संताजीराव घोरपडे ममलकत मदार यासी सेनापती पदाची वस्त्रे दिल्ही. पुढे या देशी पादशाहाच्या फौजा लांब फिरू लागल्या. विशालगडास वेढा पडल्यास आडकूंन पडाव लागल आस समजून राजाराम माहाराज खुद वगैरे असामी ३२ सरदार सुध्दा जातिनिसी नाना प्रकारचे वेष धारण करून चंदीस जावे या हेतूने निघोन गेले. तेथे जाऊन आष्ट प्रधान वगैरे करून राज्य काही दिवस केले. तेथेही पादशाहाकडील फौजा जाऊन दोन-तीन वर्ष लढाई होत असता तेथून निघोन पुन्हा या देशी यावयाबदल निघोन येताना मार्गात बेगराळ ( बेंगळूर ) तालुक्यात लडाई जाहली. तेथे विठोजीराव चवाण हिमत बहादर हे ठार पडले शके सुमारे १६१८-१९. पुढे मार्गातच त्याचे पुत्र उदाजीराव चवाण सोला वर्षाचे वय होते, त्यानी मार्गी येताना माहाराजांच्या समक्ष लढाईत काजकामे केली जाणोन माहाराज यानी फार संतुष्टतेने कृपाळू होऊन उदाजी चवाण यासी हिंमत बहादर हा किताब देऊन मरातब प्रमाणे वस्त्रे भूषणे व सिके जरीपटका व साहेब नोबत वगैरे देऊन तुम्ही दौलतीतील उमराव आसे म्हणोन संनिध्य वागवीत आसेत ते आष्टप्रधानाचे मानाप्रमाणे.[४] कलम.

१. उदाजी चवाण हिंमत बहादर हे राजाराम माहाराजापासी असता माहाराज यांची स्वारी विशालगडास दाखल होऊन नंतर सातारेयास जाऊन फौज जमा करून उत्तरेकडे निघाले. बरोबर अमात्य वगैरे सरदार हिंमत बहादर आदीकरून सरदार येऊन फौज सुध्दा वाटेने जातांना जुलपुकारखान याणी येऊन माहाराजाचे लष्करावर मार्गात छापा घातला. तेथे तसनस बहुत जाहली. नंतर त्या देसी चौथाईचा आमल बसऊन स्वारी सिंहगडास दाखल जाहली. नंतर शके सुमारे १६२१ सन १६९९ इसवीत राजाराम माहाराज याणी स्वर्गवास केला. इकडे राजाराम माहाराज याचे पुत्र संभाजी माहाराज पनाला, कलापूर [ कोल्हापूर ] वगैरेकडे आसोन रामचंद्रपंत अमात्य व धनसिंग जाधवराव व हिंमत

बहादर वगैरे अष्टप्रधान पैकी काही व अष्टउमराव असे सरदार घेऊन मातुश्री ताराआईसाहेब सुध्दा येक विच्यार असेत. त्या संधित शाहू माहाराज हे पादशाहाचे लस्करात होते ते देशमुखी व चवथाई वगैरे घेऊन देशी आले. हे वर्तमान ताराआईसाहेब यासी समजताच मनात विकल्प आणोन धनसिंग जाधवराव यासी फौज देऊन माहाराजावर पाठविले. ते तिकडेच मिळाले व प्रतिनिधी वगैरे सरदार काही काही शाहू माहाराज याजकडे जाऊन मिळोन इकडे पंत अमात्य, संताजीराव घोरपडे सेनापति व उदाजीराव चवाण हिंमत बहादर वगैरे काही सरदार इकडे राहिले. संभाजी माहाराज व ताराआईसाहेब एक विच्यार असोन हिंमत बहादर यास सरंजाम इनामी करून दिल्हे त्याचा तपसील खाली लिहिल्याप्रमाणे सुमारे १६३५ सात दिल्हा.

| | |
|---|---|
| १ कसबा करवीर केसापूर सुध्दा | १ अळते कर्यात |
| १ सिरोल माहाल सिरोल | १ तारळे महाल |
| १ बतीस सिराळे तालोका | १ डिगरज मणेराजुरी करनाल |
| १ अथणी तालोका वगैरे गावे | वगैरे सोनी सुध्दा. |
| ४ | ३ |

७

येणे प्रमाणे तीन लक्षाचा मुलूख सरंजामात देऊन काही दिवस करवीरी, काही दिवस सिरोलात राहून संभाजी माहाराज यांचे आज्ञेवरून शाहू माहाराज यांचे राज्यात स्वाऱ्या करून 'चवाण चवथाई' घेऊन सिरोल मुकामी राहात असत. नंतर शाहू माहाराज याजकडून सिरोळावर पन्नास हजार फौज घेऊन भारी तोफासुध्दा श्रीपतराव प्रतिनिधी येऊन दोन अडीच महिने हिमत बहादर लढाई देत असता संभाजी माहाराज यासी विनंतिपत्र पनाले मुकामी पाठविले-वरून त्यानी आपण स्वता फौज घेऊत कुमकेबदल सिरोळास दाखल जाहले. नंतर त्यांच्या म्हणजे शाहू महाराज याजकडील फौजेच्या व यांच्या लडाया पाच च्यार जाहल्यानंतर इकडील मोड जाहला. सबब माहाराज व हिमत बहादर आसे मिळोन पनाल्यास आले. ठाणे सिरोळ प्रतिनिधीनी घेतले. ते समई शाहू माहाराज येऊन सिरोळ मुकामी दाखल जाहले. तेथे संभाजी माहाराज याचा जनानखाना व तारा आईसाहेब होते त्यास सातार्‍यास घेऊन गेले. बाकीचे

येसूबाईसाहेब (?) वगैरे यास वस्त्र भूषण देऊन पनाल्यास पाठविले आणि संभाजी माहाराज व शाहू माहाराज यांचा तह तिकडील श्रीपतराव प्रतिनिधी व इकडील रामचंद्रपंत अमात्य व संताजीराव घोरपडे[४] शेनापति व हिमत बहादर याचे त्रिद्यमाने जाहला की वारणे कृष्णेच्या संगमामासून राज्य करावे असा ठराव जाहला. वारणेच्या पलीकडे हिमत बहादर यांचा सरंजाम इनामी चालत असे तो शाहू माहाराज याचे हादीत पलीकडे होता तो डिगरज व सोनी व मणेराजोरी व करनाल हे गाव हिमत बहादर याजकडे चालतात तसी चालावी आसे ठरले हे शके १६५३ सन १७३१ इसवीत आसा प्रकार जाहला. नंतर शाहू माहाराज यांच्या राज्यात बतीससिराळे वगैरे तालुक्यात चवाण चवथाईचा वसूल हिंमत बहादर हे काही काही घेत असता नेहमी शाहू महाराज याजकडील अंमलदारीची व याची कटकट होत होती. इतक्यात शाहू माहाराज यांची स्वारी सिकारीप्रील्यर्थ गणेशखिंडीलगत नदीकिनारेस उतरली होती, तेथे चालोन जावे असी तयारी हिमत बहादर याही करून जवळ कोसाचे सुमार जाऊ (न) कळविले की हिमत बहादर हे पाच हजार फौजेनिसी आपगावर येत आहेत. असे समजताच माहाराजानी स्वाराबरोबर निरोप पाठविला की तुम्ही आमचे इमानी चाकर आसल्यास मजवर येऊ नये. आसी आज्ञा दिलेवरून तीन कोशाचे सुमारे जाऊन उतरले. हे वर्तमान माहाराज यास कळलेवरून, आमची आज्ञा मान्य केली म्हणोन फार संतोष होऊन सातान्यास जाऊन आज्ञापत्र व स्वार कारकून पाठऊन बोलाऊन नेऊन सामोरे खुद माहाराज जाऊन चादर घालोन अष्टप्रधानाचे सांप्रदायाप्रमाणे घेऊन गेले आणि आज्ञा केली की तुमचा खर्च संभाजी माहाराज यांचे राज्यात निभावणार नाही, आम्हापासी येऊन राहावे. आसी आज्ञा केल्यावरून, संभाजी महाराज यांची आज्ञा जाहलेस राहातो, असे सांगून येकंदर आपली फौज सातारवर ठेऊन आपण पाच पनास स्वारानिसी संभाजी माहाराज याजकडे येऊन विनंती करून आज्ञा घेऊन सातारेस गेले. तेथे माहाराजानी सरंजामात मुलूख लाऊन देऊन अष्टप्रधानाचे मरातबा प्रमाणे चिन्हे व जरीपटका वगैरे साहेब नोबत सिके असे देऊन ठेऊन घेतले. सरंजामात सतावीस लक्षाचे बेरजेस माहाल लावून दिल्हे त्याचा तपसील खाली लि॥ प्रो।

माहाल दिल्हे व त्या वेळेस ममलकत मदार हा किताब दिल्हे आहे.

| | |
|---|---|
| १ देशमुख व देशपांडे सरकार रामगिरी | १ सुभा बेदर |
| १ परगणे अमरचिता | १ ठाणे कालतीकलार |
| १ परगणे फुणसंगी | १ परगणे कोडोली |
| १ ठाणे निडगुंदी | १ परगणे ठहणसंगी |
| १ परगणे चिंचोली | १ परगणे चिमलगी |
| १ समत काकटनूर | १ समत व्हरगी |
| १ परगणे चितापूर | १ परगणे वडमहाल |
| १ परगणे साबे | १ ठाणे सिदनाथ |
| १ परगणे सिदोनी | १ परगणे मडचूर |
| १ ठाणे बालोती | १ परगणे तांबे |
| १ परगणे मडलगी | १ माहांकाल कवठे |
| १ परगणे चांदकवठे | १ नालतवाड |
| १ माहालकोटे | १ पो हिपरगी |
| १ परगणे उटकर | १ ठाणे रोहली |
| १ बसवंत बागेवाडी | १ कसबे कौलगी |
| १ पो मगदल | |

येणे प्रमाणे माहाल व ठाणे व परगणे येथे चवथाई व निमे सरकार अमल होता, त्या प्रमाणे तो अंमल याजकडे सरंजामात नेमून देऊन सनदा करून दिल्ह्या. त्याचा राजशके ७३ शालिवाहन शक १६६९ सन इसवी १७४७ इ॥ सालच्या आहेत. तो मुल्लख याचे जिमा केला आणि जरी पटका वगैरे दिल्हे. हे वर्तमान प्रतिनिधीस समजल्यावरून प्रतिनिधीनी आपली फौज हिंमत बहादर याजवर पाठविली. त्याची व हिंमत बहादर यांची लढाई होऊन प्रतिनिधीचा मोड जाहला. ते वर्तमान शाहू महाराज यास विदित जाहलेवरून उभयतासी बोलावणी पाठऊन मावोलीचे मोकामाहून साताऱ्यास आणऊन परस्पर कलह करू नये म्हणोन आज्ञा देऊन सनदा दिल्ह्या होत्या त्याजवर अष्टप्रधानाची चिन्हे करून देऊन स्नेहाने उभयतानी चालावे अस ठरऊन आपलेले तालोकेत जाऊन राहावे असी आज्ञा जाहलीवरून आपलेले जागेस जाऊन हिमत बहादर यासी सनदा दिल्ह्याप्रमाणे अमल बसऊन घेऊन आथणी येथे बहुतकरून राहात असेत. पुढे शाहू महाराज यांची स्वदस्तूरची पत्रे व सनदा वगैरे आहेत सदरहू

सरंजाम आनभऊन हिंमत बहादर याणी आग्रहार ब्राह्मणास धर्मादाय गाव व जमिनी व नगदी व्हान करून जिल्हे ते अद्याप चालत आहेत. मुल्लक आमदानी-बदल नातवानी गावास बिघा येक तोब्राभर धान्य देणेचे कौलही दिल्हे होते.

याप्रमाणे सुरक्षित मुल्लक चालत असता शके १६७१ सन १७४९ इसवी साली शाहू माहाराज याणी स्वर्गवास केला. पुढे राज्य बालाजी बाजीराव पेशवा म्हणजे ऊर्फ नानासाहेब व सदाशिवराव चिमणाजी ऊर्फ भाऊसाहेब पेशवे हे राज्य करीत असता शके १६८२ सन इहिदे सितैन मया व अलफ इसवी सन १७६० साली गिलज्याकडील येवनाचे पारपत्य करण्यास जावे असा ठराव होऊन भाऊसाहेब पेशवे व त्यांचे पुतणे विश्वासराव आसे भारी फौज जमा करून पुण्याहून निघते समई उदाजीराव चवाण हिमत बहादर व ममलकत मदार यासी आणोन फौज सुध्धा बरोबर चलावे म्हणौन सांगितलेवर हिमत बहादर व ममलकत मदार याणी सांगितले की आपण जाणे न करून आम्हासच फौज सुध्धा रवाना करावे. असे म्हणताच मनात विकल्प आणौन, काकासाहेब आपण येऊ नये, असे बोलून यास बराबर न घेताच चालते जाहले. त्याबद्दल याणी इकडील सरंजामाचा तिरस्कार करून हैदराबादेस मोगलाकडे वकील पाठऊन तिकडील पत्र आणऊन दाहा हाजार जमेतीनिसी हैदराबादेस जाऊन असबज्याहा निज्यामन्मुल्लख याची भेट[१] घेऊन त्याचकडून फौजेच्या वगैरे खर्चाबदल मुल्लख लाऊन दिल्हे तो घेऊन तेथून नलदुर्ग किल्यास येऊन राहिले. त्या मुलकाचा तपसील खाली लिहले प्रमाणे :—

| | | |
|---|---|---|
| १ मुख्य राहाणची जागा पा। नलदुर्ग तालुकेसुध्धा | .... | १ पो। आफजलपूर |
| | .... | १ परगणे सिवोले |
| १ परगणे च्यापनूर | .... | १ परगणे गिजोली |
| १ परगणे अलंद | .... | १ परगणे सिहोर |
| १ परगणे मुधोल | .... | १ परगणे थटा |
| १ परगणे तेरदल | .... | १ परगणे भोस प्रांत नांदेड |
| १ परगणे मारडी | .... | १ परगणे काटी |
| १ परगणे गुंजोटी | .... | १ परगणे चितापूर |
| १ परगणे मुदगल | | |

येणे प्रमाणे तीस लक्षाच्या आजमासीच्या बेरजेचा मुल्लक सरंजामात

लावून देऊन सनदा करून दिल्ह्या. त्या सनदा चिरंजीवाचे म्हणजे त्यांचे पुत्र विठोजीराव चव्हाण व प्रतीराव (प्रीतीराव) चवाण उभयता होत. त्या पौ। वडील पुत्र विठोजीराव चवाण यांचे नावच्या करून घेतल्या. त्या आता हाली आहेत त्या प्रमाणे अमल बसऊन नेहेमी नलदुर्ग येथे राहात असोन लाऊन दिल्हेला मुल्क अनभव करीत असत. सनदा दिल्ह्या त्याचा सन हिजरी ११७३.

नंतर काही दिवसांनी गोपाळराव पटवर्धन मिरजकर याचे व पेशवे याचे वाकडे पडले. सबब पटवर्धन हे रुसून नलदुर्गास आले. त्यास ठेऊन घेऊन बडदास्त करून नबाब साहेब याचे कानावर घाळून भेट करविली. नंतर मोगलाची स्वारी पुण्यावर मिरजकर याणी नेहली शके १६८६. पुढे पेशव्यानी पटवर्धन याची समजूत करून गोपाळराव यास पुण्यास नेहले. हा मजकूर मोगल यास कळला. इतकेत अकलकोटकर याचे व हिमत बहादर यांचे एका हदीचे गावाबदल कलह चालला होता तेथे हिमत बहादर फौज सुध्धा जाऊन आकलकोटकर याची व हिमत बहादर याची लढाई जाहली. तेथे उदाजीराव चवाण हिमत बहादर व ममलकत मदार ठार जाहले. त्याचा पुत्र जेष्ठ विठोजीराव चवाण व कनिष्ट प्रीतीराव चवाण हे उभयता नलदुर्गास होते. त्याणी उदाजीराव चवाण याची समाधी श्री खंडोबा देव आडिरीचा आहे त्या देवाचे समोर समाधी बांधली आहे. इकडे मिरजकर न पुसतां लाऊन दिल्हे म्हणौन नबाब साहेब मोंगल याची मर्जी रुष्ट जाहलीच होती. तशा संधीत उदाजीराव चवाण याचा कालही जाहला. अशा कारणाबदल मोंगल याजकडून काही दिवसानी उभयता चवाणराव यांजकडील मुल्क जप्ती करण्यास फौजा रवाणा जाहल्या. नंतर त्याची याची लढाई झाहली. मुगल याजकडे वकीलही पाठविला होता. तेथे विठोजी चवाण याणी भेटीस यावे असा हुकूम जाहला असोन भेटीस गेले नाहीत. यामुळे मर्जी फारच रुष्ट जाहली. तशात वकिलानी यत्न केला त्यामुळे, त्याचे वडील सरकार कामावर ठार जाहले. मुले लहान, सबब त्यास त्याचे चालवणेबदल दूध पिणेस तीन लक्षाच्या आजमासीच्या बेरजेचा माहाल चालावा आसे ठरून काटी व मारडी वगेरे परगणे तीन लक्षाचे येऊन उभयता चवाणराव याजकडे चालवीत होते. त्या प्रांती फौज सुध्धा राहून निभाव न पडे, सबब या देशी जावे असे योजून होते. इतकेत पनाल्याहून जिजा आईसाहेब माहाराज, संभाजी माहाराज याची पत्नी राज्य करीत होती. त्याजकडून आज्ञापत्रे नेहेमी येण्याजाण्याचा प्रवर्त

असोन त्या संधीत येणेविसी आज्ञापत्र आलेवरून डिगरज येथे येऊन दाखल जाहले. हे उभयता चवाणराव इकडे आलेले पाहून जाधवराव याणी निजाम अलीखान याजकडील फौज ठेऊन राहिलेले महालही घेतले. सदर उभयता चवाणराव पौ। विठोजी चवाण याचा वंश डिगरजकडे आहे.

१ प्रीतीराव चवाण हे नलदुर्गाहून येंऊन डिगरजेस राहिले असोन इकडे संभाजी महाराज यास शके १६८२ साली सन १७६० इसवीस संभापूर या स्थली देहावसान होऊन स्वर्गवास जाहले. नंतर काही दिवस जिजा आईसाहेब महाराज याणी राज्य करीत असता खानवटकर भोसले याच्या घराण्यातील येक पुरुष आणौन त्यास दत्तक पुत्र करून घेऊन त्याचे नाव शिवाजी माहाराज असे ठेऊन पनाले मुकामी माता पुत्र उभयता आसेत. त्याचा शके १६८४ सन १७६२ इसवी साली दतविधान जाहले आसोन पुढे विज्यादशमीस माहाराज सिंहासनारूढ जाहले. पुढे त्याचे दुसरे आगर तिसरे साली प्रीतीराव यास डिगरजेस बोलावणे पाठऊन चवाण यासी पनाले मुकामी आणविले. त्या वेळेस राज्यकारभार येसाजी सिंदे करीत होते. त्यास सुभेदार आसे म्हणत. पुढे कोनेरराव पटवर्धन याणी येऊन राज शक १०१ शालिवाहन शके १६९६ सन १७७४ इसवीत करवीरास वेढा दिल्हे. त्यात प्रीतीराव चवाण ऊर्फ बापूसाहेब याणी लढाई देऊन कामकाज केले. त्यावेळेस बापूसाहेब यासी नगदी खर्चास पोचत असे. आपला पेशजी सरंजाम सोडोन म्हणौन आईसाहेब यासी वरचेवर विंनती करीत असता शके १६९९ राज शके १०४ सन १७७७ इसवीचे सुमारे म्हादजी सिंदे ऊर्फ पाटीलबावा याणी भारी फौज घेऊन येऊन करवीरास वेढा घातला. त्यात नेहमी लढाईचे प्रसंगात मर्दुमी फार हे शिवाजी माहाराज छत्रपती याणी जाणौन आपले संनिध ठेऊन कामकाजात वाडऊ लागले. तुमचा सरंजाम पेशजीचा आहे तो सोडून देतो असी आज्ञा जाहली. ते समई येसाजी सिंदे सुभेदार हा कारभारी होता. त्याचे मनात विकल्प प्राप्त जाहला आणि बापूसाहेब याजबरोबर आकस करू लागले. तेव्हा चवाणराव याणी माहाराजास विंनती केली की आम्हाविषई सुभेदार याच्या मनात विकल्प आला आहे. त्यास्तव तूर्त आम्हास डिगरजेस जाणेस आज्ञा जाहली पाहिजे म्हणौन विंनती करून डिगरजेस गेले. नंतर येसाजी सिंदे सुभेदार याचा काल शके १७०४–०५ च सुमार जाहलेवर सांहा मैनानी सुमारे, प्रीतीराव चवाण

यास शिवाजी माहाराज याणी डिगरजहून पनाळे मुक्कामी बोलाऊन आणविले आणि आपले सनिधचे ठेऊन घेऊन माहाराज याही जनानखानेसुधा करवीरी जाऊन राहावे असा ठराव करून करवीरास आले. नंतर शके १७०६ राज शके १११ क्रोधीनाम संवछर सन १७८४ इसवीत प्रीतीराव चवाण ऊर्फ बापूसाहेब यासी पूर्ववत प्रमाणे हिमत बहादर हा किताब देऊन जरीपटका व साहेब व सिके हत्ती वगैरे आष्टप्रधानाचे सांप्रदायाप्रमाणे मान मराबत देऊन अष्ट उब्र ( म ) रावातील तुम्ही उमराव आसे म्हणौन मराबताप्रमाणे वस्त्रभूषणे देऊन संस्थानाकडे पुत्र पौत्रादि वंशपरंपरा इनाम सरंजाम नेमून देऊन सनदा करून दिल्ह्या. त्या सरंजामाचा तपसील खाली लिा प्रो गाव वगैरे

१ ठाणे हलकर्णी नि॥ गाव नूल कर्यांत पौा गावे व ठाणे कस्बली तालोकेतील दुतर्फ गाव अजरे तर्फेतील सुधा गाव १३ येकंदर येकून कलम.

१ नूल कर्यातीतील देसाई व देशपांडे वगैरे माहाली वतनदार याजकडून ठाणे हलकर्णीकडे सिबंदी पटीची बाब यावयाची ती.

२ तपे हर तालोकेचे रागवगडच्या गावननानी सावोत्रा पंचोत्रा येक मणीची बाब येणे ती.

१ तेरोत्रा व साहोत्रा व पंचोत्रा व नाडगौड म्हणौन बाबतीचा ऐवज सालाबाद ध्यावयाचा ठराव करून दिल्हे ते माहाल.

| | | |
|---|---|---|
| १ तर्फ अजरे | १ काा कापसी | १ काा मनोली |
| १ काा नुल | १ काा नेसरी | १ काा सोलापूर |
| १ काा मनेती | १ का आडगल | १ काा गोकाक |
| १ परगणे पाछापूर | १ काा कबूर | १ काा हुकेरी |
| १ ताा पाा चंदगड | | |
| ५ | ४ | ४ |

१३

१ चवथाई माहाल—

| | | |
|---|---|---|
| १ का। कापसी | १ तर्फ आजरे | १ तर्फ चंदगड |
| १ का। नेसरी | १ का। नूल | १ मनेती |
| १ का। मनोली | १ का। सोलापूर | १ परगणे गोकाक |
| ३ | ३ | ३ |

१ सरकारात खजिन्याकडे ऐवज येत होता तो हिमत बहादर नेमून दिल्हे तपशील

१ बिदनूर १,००० १ सौंदे १,००० १ सावनूर २,०००

१ मामले हुबळी पौ। संमगाव हा हिंदुराव याजकडे ऐवज चालत होता तो इकडे म्हणजे हिमत बहादरीकडे

किता गावे.

| | | |
|---|---|---|
| १ मौजे तळगदे | १ प्रांत रायबाग देहे १ | १ मौजे गोकुल सिरगांव |
| १ मौजे गौडवाड | १ मौजे बस्तवाड | १ मौजे निगवे |
| १ मौजे किणी | १ मौजे हलदी | १ मौजे हरलीबुद्रुक |
| १ मौजे वाटंगी | १ ठाणे सवदलगे | १ मौजे मनपाडले |
| ४ | ४ | ४ |

येणे प्रमाणे गाव ठाणी व बाबती वगैरे येकच सालात दिल्ही नसोन वरचेवर माहाराज याणी कृपाळू होऊन सरासरीस हिमत बहादरी दिल्हे साला-पासून दाहा सालात सनदा करून दिल्हे प्रमाणे गाव वगैरे अमल जिमा जाहला असौन चौथाईचे माहाल व साहोत्रा व पंचेत्रा वगैरे माहालचा वसूल काही येऊन काही काही येत नसे. सदरहू इनामी सरंजामाखेरीज देशमुखीचे वतन वरुण व तर्फचे करून देऊन उमळीस गावे इनाम करून देऊन गावगनाची कमत व हक व कारसाई वगैरे वतनदाराच्या सांप्रदायाप्रमाणे करून देऊन सनदा करून दिल्ह्याप्रमाणे चालत आसे ते गाव व गावगनाची किमत वगैरे खाली लिहिले प्रो।

१ उमळीस गावे सुमार चार

१ रेटरे ता। वरुण १ मालेवाडी ता। मार १ सिवारे ता। मार
१ कोतोली ता। मार

[1]यासिवाय वरुण तर्फेतील व मलकापूर तालोकेतील गांवगनानी देशमुखीचे कमत व हक व कानु कायदे व जकायत वगैरेवर हक करून साठ गावची वृत्ती करून दिल्ही.

येणे प्रो।। वतनदारी व सदरी लिहिला तो इनामी सरंजाम व सदरहूत लिहिले आहे ते मौजे निगवे हा इनाम गाव येणे प्रा। करून दिल्हे प्रो। अनभव करून बापूसाहेब हिमत बहादर हे फार गुणवान असोन माहाराज यांची मर्जी संपाद ( न ) करून त्यांच्या आज्ञेने राहिले असेत. गुणवान असे की घोड्यावर बसणार फार चांगले व चतुर व मसलतवान व मोठे धूर्त व शूर व शुचिर्भूत-पणाने परम धार्मिक व माहाराजाचे पायासी परम दक्ष आसे. त्याचे उत्तम गुणावर नजर देऊन माहाराज याही त्याजकडून राज्यकारभार घेत आसेत. त्या काली रत्नाकर राजा ( राजाज्ञा ) हे खजिना पोत्याकडील कारकून असोन माहाराजांचा लोभही त्याजवर होता व कामकाजात बापूसाहेब हे त्याजला वागवीत आसेत. याप्रमाणे असता शके १७१५ साली परशराम रामचंद्र ऊर्फ भाऊसाहेब पटवर्धन याचे चिरंजीव रामचंद्रराव आपासाहेब पटवर्धन हे फौज घेऊन आळतेस येऊन गावास वेढा दिल्हा. हे वर्तमान करवीर मु।। हुजूर विदित जाहलेवर हुजूरची खासा स्वारी लस्कर सुध्या जाऊन मार्गशीर्ष शु।। १० शके १७१५ इसवी सन १७९२ रोजी लढाईत पटवर्धन यासी धरून आणिले. त्याचे फौजेचा मोड जाहला. आपासाहेब यासी जखमा लागल्या. तैसेच जखमी करवीरास आणौन काही दिवस ठेऊन घेऊन जखमा बऱ्या करून वस्त्रे देऊन सन्मानाने रवानगी करून देते समई आपासाहेब पटवर्धन याणी आत:पर माहाराज याचे पायास येकनिष्ठपणे वागू, स्वामीचे पायास अंतर करणार नाही असी शफत म्हणजे पायावर हात मारून निघोन गेले.

दुसरे साली परशरामपंत भाऊ पटवर्धन याणी फौजेसुद्धा येऊन करवीरास शाहा दिल्हे. त्या शहत लढाई वरचेवर होत होती. पुढे तीन लक्ष रुपये खंडणी द्यावी असा ठराव जाहला. त्या खंडणीच्या ऐवजात वोलीस बापूसाहेब हिमत बहादर यांचे जेष्ठ पुत्र उदाजीराव चवाण ऊर्फ आबासाहेब याचे वय सत्रा १७

वर्षाचे होते व दुसरे पुत्र नारायणराव चवाण ऊर्फ नानासाहेब हे होते. त्या पौ। उदाजीराव चवाण व राजाज्ञा याचे चिरंजीव नारायणराव व दौलतराव गाईकवाड वगैरे आसामी बोलीबदल[४] दिल्हे आणि वेढा उठविला. ते बोलीबदल चार आसाम्या घेऊन पटवर्धन कूच करून निघोन गेले. बोलीच्या आसामीसी काही दिवस तासगावात ठेऊन नंतर मिरजेस नेहले. तेच साली नऊ दाहा महिन्याचे सुमार बोली सोडवून आणिल्या.

पूर्वानुसंधान शके १७१८—१७१९ साल्चे सुमार माहाराजाची स्वारी कर्नाटक प्रांती जाऊन हूबलीची वगैरे प्रांतातील गावाची खंडणी घेतली. तेच सालीम हाराज यासी विनंती करून बापूसाहेब हिंमतबहदर याणी रामचंद्रराव घोरपडे यास पूर्व ( व ) त प्रमाणे सेनापती पदाची वस्त्रे देविली. नंतर तुंगभद्रा तीरापर्यंत हुजूरचा आंमल बसऊन स्वारी जमखंडीच्या मुकामी येऊन मुकाम केला. तेथे त्याच साली बापूसाहेब हिंमत बहादर याणी हुजूर विनंती करून रत्नाकरपंत यास राजाज्ञा पदाची वस्त्रे दिल्ही. नंतर हिमत बहादर यास व राजाज्ञा यासी लस्कर सुध्धा मुलकाचे बंदोबस्ताबदल ठेऊन स्वारी करवीरास दाखल जाहली. स्वारी मागारी आलेनंतर हिमत बहादर व राजाज्ञा हे तेथून निघोन फौज सुध्धा सावनुरावर जाऊन उतरले, तेथे धोंडोपंत गोखले फौज घेऊन आले. त्यांच्या दोन लढाया जाहल्या. त्यात गोखले याचा मोड जाहला. तेव्हा सावनुरात जाऊन उतरले, नंतर चार दोन रोजानी पुन्हा जम बांधून इकडील फौजेवर चाल्डून येऊन त्यांची यांची लढाई भारी जाहाली. त्यात हिमत बहादर याचे डोईवर तरवारीची जखम लागली असोन इकडील फौजेचा मोड जाहला.

तेच साली म्हणजे शके १७२० वीस वर्षी हिमत बहादर हा किताब बापूसाहेब याचे वडील पुत्र आबासाहेब यास देऊन सिके व जरीपटका साहेब नोबत व हती व वस्त्रे भूषणे वगैरे अष्ट प्रधानाच्या मरातबाप्रमाणे देऊन बापूसाहेब यास नवा किताब उमदे तुल उमराव बहादर हा किताब देऊन सिके व वस्त्रे दिल्ही. त्या दिवसापासून बापूसाहेब यासी उमदे तुल उमराव बहादर म्हणोन आज्ञापत्रे होत असोन आबासाहेब यासी हिमत बहादर याचे आज्ञापत्र होत आसत. तेच साली महाराजांची स्वारी मौजे काले येथे मुकाम होऊन कराड येथे लडाया दोन अडीच महिने जाहल्या. पुण्याहून सिंदे यांच्या बाया कराड प्रांती येऊन खंडण्या घेतल्या. नरसिंगपुरास पठाण लोकाचा जमाव येऊन श्री बाबा

माहाराज यांचा वाडा वेढून बसले ते समई इकडून फौज जाऊन वेढा उठवून बाबा महाराज यास करविरास आणिले. माहाराज याची स्वारी गोकाक ताल्लोक्यात जाऊन येकोडीचे बारीने उतरून रामदुर्गाचे बारीने जथवाड पल्लापूर परगण्यात खंडण्या घेतल्या. आणि निघोन करवीरास आले. सदरी लिहिले प्रकार बापूसाहेब उमदेतुल उमराव बहादर व राजाज्ञा उभयतानी फार मेहनत घेऊन राज्य चालवीत आसेत. येणे प्रमाणे मजकूर शके १७१९ पासून वीस पर्यंत जाहला.

१७२१ सन १७९९ इसवीत वैशाख मासी भाऊसाहेब पटवर्धन म्हणजे परशराम रामचंद्र हे फौज घेऊन पटणकुडीवर येऊन उतरले. हे वर्तमान कळलेवर हुजूरची स्वारी व उमदेतुल उमराव बहादर व हिमत बहादर व सेनापती व राजाज्ञा वगैरे सरदार येकंदर फौज सुध्दा हमीदवाड मुकाम करून पटवर्धन यांचे फौजेवर चालोन घेतले. तेथे पटनकुडीवर त्याची याची लडाई जाहली. भाऊसाहेब पटवर्धन यास काहरी जखमा लागून पाडाव जाहले आसोन मृत्यू पावले. आणि पटवर्धन यांच्या फौजेचा मोड होऊन फौज जिकडे तिकडे पळाली. हे महाराजांनी पटवर्धन यास हमीदवाड मुकामी ब्राह्मणाच्या हातोन आणऊन सार्थक करविले. त्याचे पुत्र रामचंद्र परशराम हेही निघोन गेले होते. नंतर सहा महिन्याचे सुमार आपासाहेब पटवर्धन म्हणजे रामचंद्र परशराम हे आपली फौज व सिंद्याकडील पलटण घेऊन बारफडल येथे येऊन लस्करचा मुकाम जाहला. तेथे इकडील राजमंडलची फौज जाऊन लढाई जाहली.

नंतर मौजे सिरोली येथे येऊन उतरले आणि छ ५ रमजान माघ शु॥ ७ रविवारी फौज पलटणे सुद्धा तयारी करून करवीरास वेढा घातला. प्रथम रोजी जितीच्या वढ्यावर लढाई जाहली. त्यात नारायणराव घोरपडे[१] इकडील फौजेतून गेले होते, ते पाडाव जाहले. त्यामुळे ईकडील फौजेचा मोड जाहला. ते समई माहाराज याणी पनाल्यास जाऊन राहावे असे ठरोन कोलापुरास बापूसाहेब उमदेतुल उमराव बहादर व रत्नाकरपंत राजाज्ञा उभयता कारभारी यास आज्ञा केली की कोलापूर सांभाळून राज्य रक्षण करणे तुम्हाकडे आहे. आसे बोलोन आपले मस्तकाचे बांधलेले सबंध पागोटे हाताने काढून बापूसाहेब याचे मस्तकास घातले आणि आज्ञा केली की आमचे चिरंजीव आपण उमरावातील पूर्वापार वंशपरंपरा राज्याचे शरीक आहा. राज्य राखणे तुम्हाकडे आहे. असे बहुत येक प्रकार बोलणे बोलले. त्या समई बापूसाहेब याणी विनंती केली जे सरकारानी मस्तकीचे तिवट देऊन

आज्ञा जाहली त्यास स्वामीच्या पायाचे कृपेकरून या समयास यश घेऊन शत्रू पराभव करून स्वामी चरणासंनिध येऊ. नाही पेक्षां आमचे चिरंजीव उदाजीराव चवाण याचे संरक्षण करण्यास माहाराज समर्थ आहा. आसी विनंती करून चिरंजीव म्हणजे आबासाहेब हिंमत बहादर यासी माहाराजाच्या पायावर घालोन स्वाधीन केले. सदरी माहारा(जा) नी पागोटे दिल्हेले ते सबंध आद्यपि आहे.

नंतर माहाराजाची स्वारी हिंमत बहादर यासी घेऊन पनालेचे खाली राक्षसवाडीनजीक मुकाम केला. सूर्योदयाचे सुमारे पटवर्धन याजकडील फौज येऊन छपा घालोन माहाराजाकडील तोफा पाडाव करून घेऊन व लस्करावर बाण सोडून तोफा मारू लागले. तेंव्हा शिवाजी माहाराज यांची स्वारी रेडे घाटीच्या रस्त्याने किलेवर जात असता शत्रुकडील स्वार येऊन मिसळले. ते समई हैबतराव गाईकवाड वगैरे त्याच्या तोंडावर जाऊन लढाई चालली होती. इकडे आबासाहेब हिंमत बहादर याणी घोड्याचा इलाज चालेना, सबब घोड्यावरून उरूतन घोडा सोडून देऊन महाराज संनित्ध पाय उताराने चालले ते डोंगर कटोरीने चडोन व क्रिल्याच्या आश्रयास स्वारी सांभाळून नेहऊन जेथे शत्रूच्या स्वाराचा लांबर न चाले अशा स्थली स्वारी उतरोन आपण पुढे आगाढीस होते. येताना शत्रूकडील पायेचे लोकाची व पेंडार वगैरे टोळी आली. त्याचे निवारण करून स्वारी सांभाळून होते. इतक्यात विश्वासराव घाटगे सरज्याराव कागलकर हे मागाहून आले. ते समई पाय उताराने असोन त्याच्या मस्तकी पागोटे नव्हते. त्यावेळेस आदम शाल जामेचा रुमाल घाटगे यास हिंमत बहादर याणी दिल्हे. इकडे हैबतराव गाईकवाड शत्रूसी लढाई देत होते. त्यास जखमा लागल्या व त्याचे बंधु दौलतराव याजवर पेंढारी याणी गर्दी करून भाला मारला.[८] ती जखम मोठी लागली. त्यास किलेवर घेऊन गेले. तेथे काल जाहाला. इकडे विश्वासराव गायकवाड आश्रालेच्या मुकामी शत्रूसी लढाई देत होते. ते जखमा लागून पाडाव जाहले-नंतर शत्रूनी आपले गोटात नेहऊन जिवे मारले. हुजूरची खासा स्वारी आस्तमा-नच्या सुमारास हिंमत बहादर यासह वर्तमान किलेवर दाखल जाहले. नंतर माहाराज याणी हिंमत बहादर यास बोलले की तुमचा घोडा गेला सबब आमचा कोतवाल तुम्हास बसावयास घ्यावा म्हणोन घोडा दिल्हे. व शालुकराकहून नजर आला होता तो हतीही दिल्हे. येणे प्रमाणे बक्षीस दिल्हे. तुम्ही फार श्रम करून आम्हास सांभाळून आणिले म्हणोन हिंमत बहादर याची स्वमुखे प्रशंसा फार

केली. इकडे करवीरी कंपूचे वाड्यात पलटणाबरोबर बापूसाहेब व राजाज्ञा या उभयतानी लढाया देत असता शत्रूनी तीन हल्ले केले व तोफेनी उत्तरेकडील काही तटही पाडला. पुन्हा तट घालोन हल्लाही मोडून काडला. करवीर हस्तगत होऊ न देता लढाई चालली होती. इकडे पनाळे मुकामाहून स्वामीनी सरजेराव घाटगे विश्वासराव कागलकर व रामचंद्र जोशीराव उभयतासी पुण्यास —सखाराम घाटगे कागलकर, दौलतराव सिंदे आलिज्याबहादर याजकडून कारभारी होते– त्याजकडे पाठऊन करवीरची हवाल सर्व सांगितली. त्याणी सिंदे याचे कानावर मजकूर घातला. तेणे करून सिंदे याची मर्जी फार रुष्ट होऊन आपासाहेब पटवर्धन यासी कैद करून पाठवणे म्हणोन सिंदे याणी पत्र आपले कंपूच्या सरदार यासी लिहिली. ती पत्रे कंपूकडे न येता पटवर्धन याचे गोटात आली. ती पटवर्धन याणी लखोटे फोडून पाहून परदेशाहून आपल्या फौजेसुद्धा कूच करून निघोन चालते होऊन ती पत्रे कंपूच्या गोटात पावती केली. ती पत्रे पाहून पटवर्धन यास कैद करावे तर पूर्वीच ते निघोन गेले होते. सबब पलटण उठून निघोन सिंदे याजकडे गेली. पुढे काही दिवसात हुजूरची खासा स्वारी करवीरास येऊन दाखल जाहली. शके १७२२ सन १८०० इसवीत येणे प्रमाणे मजकूर जाहला.

महाराज करवीरास येऊन बापूसाहेब यासी आज्ञा दिले की तुमचे चिरंजीव हिंमत बहादर याणी आमचे समक्ष राक्षसवाडी मुकामी कामकाज करून आम्हास संभाळून पनाल्यास घेऊन गेले. असे बोलोन बागेवाडी तालुका पंचवीस हजाराचा आजमासाचा व नूल कर्यातीचे दसकाकडील बाब येक साल म्हणौन दर साल येणे तो ऐवज दाहा हजाराचा लाऊन हिमत बहादरीच्या संस्थानाकडे चालवीत असेत. नंतर महाराजांची स्वारी कोकणात सावंताच्या वाडीवर म्हणजे सुंदरवाडीवर फौजसुधा जाणेचे योजून पाटगावावर मुकाम केला. बरोबर बापूसाहेब व राजाज्ञा व सेनापति म्हणजे रामचंद्रराव घोरपडे वगैरे सरदार होते ते वेळीं राजाज्ञा यांचे व बापूसाहेब यांच्या बोलण्यात काही कलाफ वाढला. तेव्हा राजाज्ञा हे तेथून निघोन निपाणीस जाऊन निपाणीकर म्हणजे सिदोजीराव नाईक निंबाळकर यासी भेटून करवीरास आले. कलह वाडण्या(चे) कारण हेच जाहले असेल असे वाटते. इकडे माहाराज याही कोकणात जाऊन तेथे लढाया होऊन खंडण्या घेऊन मागारी परत येताना दुरब्याच्या सुमारे मुकामावर,

निपाणीकर याज निसबतीने पेंढार घेऊन नारायणराव घोरपडे यांचे चिरंजीव भाऊ घोरपडे म्हणजे मुरारराव घोरपडे हे बुणग्यावर येऊन पडले. म्हणजे जनानखाना वगैरे खटले येत होते त्याजवर आलेबदल त्याची याची लढाई काही होऊन राजमंडलचे लस्कर करवीरास दाखल जाहली. नंतर माहाराजांची स्वारीही मागाहून करवीरास येऊन दाखल जाहली. त्या दिवसापासून नारायण घोरपडे हे निपाणीकर यांच्या आश्रयाने राजमंडलाच्या गावावर लुटालूट करून धांदल करू लागले.

पूर्वानुसंधान शके १७२३ साली उदाजीराव चवाण ऊर्फ आबासाहेब हिंमत बहादर यासी आम्ही, म्हणजे रताजीराव चवाणाचा जन्म जाहला. बारावे दिवसी शिवाजी माहाराज याणी बारशेबदल आमचे घरी येऊन हत्तीवरून साखरा वाटण्यास आज्ञा देऊन आम्हास राव बहादर म्हणोन किताब दिल्हे. पुढे आम(चे) तीर्थरूप फौजसुद्धा ठाणे हलकर्णीस राहत आसोन बापूसाहेब हे करवीरी नेहमी राहात आसत. हलकर्णी मुकामी आमचे वडीलास आणखी दोन पुत्र वरचेवर जाहले. त्यांची नावे प्रथम जोत्याजीराव चवाण व जीवनराव चवाण असे जाहले.

पूर्वानुसंधान शके १७३० साली निपाणीकर यानी राजमंडलचे ठाणी पूर्वी येक दोन वर्ष काही काही घालोन फौज जमा करून शके मजकुरी कागनोलीवर येऊन उतरले. इकडून माहाराज यांची स्वारी फौजसुद्धा सावगावावर जाऊन उतरली. या वेळेस त्यांची निपाणीकराची लढाई जाहली. त्या लढाईत वापूसाहेब याचा मोठा पराक्र(म) ही जाहला. परंतु राजमंडलच्या फौजेचा मोड जाहला. ते समई बापूसाहेब याचा बसावयाचा घोडा ठार पडला व त्यासीही भारी जखमा लागल्या. तेच समई निपाणीकर जवळ येऊन, काकासाहेब आता कसे म्हणौन बोललेवर बापूसाहेब याणी उतर केले की तू जर मला सापडला आस्तास तर ठार मारला असता. आसे निष्ठूर उतर केलेवर निपाणीकर याणी आपली पालकि आणऊन मोठ्या मर्यादेने पालखीत बसऊन कोगनालीत नेऊन ठेऊन तेथे देवतार्चन व माणसे सावल्याची वगैरे काही नव्हती—. सबब माणसाची नेमणूक करून देऊन बडदास्त फार चांगली राहणेचा बंदोबस्त करून ठेविला. परंतु माहाराजाचे लस्कराचा मोड होऊन शत्रूस येश आले. या खंतीने अन्नादिक व्यवहार निवर्जुन होते. त्यांचे चितात आसे की माहाराज

यास आपजय येऊन आपण वाचलो हे फार वाईट जाहले. आसी क्षित मनात आणौन देहेअवसान व्हावे हे खरे असे वरचेवर म्हणत असत. पुढे निपाणीकर याणी लस्कर घेऊत जाऊन ठाणे हलकर्णीस वेढा दिल्हे. तेथे इकडील भले लोक होते. त्याणी आठ दाहा दिवस ठाणे लढविले. आबासाहेब हिंमत बहादर हे कबिल्यासुद्धा सामानगडास जाऊन करवीरास आले. तिकडे हलकर्णीचे ठाणे निपाणीकर याणी घेऊन तसेच करंबळीचेही ठाणे घेतले. पुढे निपाणीकर याणी सामानगडास हस्तगत करून घेण्याची खटपट केली. परंतु किल्ला हस्त न होऊन किलेकरी वगैरे लोक व काही इकडील सरदार आडकरकर देसाई वगैरे होते त्याणी लडाई करून निपाणीकर याचा टिकाव न होंता फौज घेऊन मागारी आले. पुढे शके १७३१ साली निपाणीकर याचा व माहाराज याचा तह होऊन शरीरसमंध करून बापूसाहेब यासी महाराजानी सोंडऊन आणिले. नंतर लक्षु(मी) बाई चवाण म्हणजे नाराणराव चवाण आमचे चुलते, याची पत्नी तिचे भ्रतार निवर्तुन दोन वर्ष आजमास जाहली होती. त्यास पुत्र संतान नाही. सबब आमचे बंधु जोत्याजीराव[१] यासी दत्तक दिल्हे. ममलकतमदार हा किताब हुजुरून नारायणराव यास दिल्हे असे. त्याची शक मिति लागत नसोन त्याप्रमाणेच त्याचे दत्त पुत्र जोत्याजीराव चवाण यासी ममलकतमदार हा किताब हुजुर चालवीत असेत, त्या प्रो आहे. या प्रो मजकूर जाहला असोन सदर साली म्हणजे शके १७३२ बतीस साली बापूसाहेब याणी त्याचे जखमाच्या दुखणेत चित्तात क्षितीचा हृद्रोग लाऊन घेऊन देहावसान जाले.

१ उदाजीराव चवाण हिंमत बहादर ऊर्फ आबासाहेब हे बापूसाहेब यांचा काल जाहलेयावर निपाणीकर याजकडे आपला सरंजाम गेला होता तो खेरीज करून बाकी होती ती सरंजामाची गांव व जमिनी व दसकत कुरण वगैरे अनभव करून माहाराजापासी येकनिष्ठपणाने होते, त्या गावचा वगैरे तपसील खाली लिहिले प्रमाणे.

| | |
|---|---|
| १ मौजे निगवे ताा ठाणे | १ मौजे किणी काा दुदगांव |
| १ काा करवीर येथील मळा जमीन—१४ | १ कुरणे कात्यायनीनजीक डोंगर कवा-रचे वगैरे कुरणे ३ |
| १ देशमुखी वरुण तर्फेची त्याबदल उमली गाव दरोबस्त चालत आहे ती चार | १ गावगनाची देशमुखी गाव पौ चालू गांव ३० हक व |

१ रेटरे
१ मालेवाडी
१ कोतोली
१ सिवारे

कमते व कानू कायदे प्रो वतनदारी
१ मौजे पावले येथील मळा जमीन व आंबराई वगैरे
१ श्रीचे दारावरील जमीन दुकान वगैरे

—

येकून गावे सुमार ४

येणे प्रमाणे उत्पन्न चालत होते ती अनभव करीत आसेत. शके १७३४ सन १८१२ इसवी साली म्हणजे सन सलास अशर साली आलपिष्टण सावेब बहादुर यासी माहाराज याणी मालवण किल्ला कुंपणी सरकारात देऊन कुंपनी सरकारची व माहाराज सरकारची दोस्ती वृधिंगत व्हावी म्हणौन मेहरबान करनेल मूत्नेर[१०] साहेब बहादूर यासी कुंडल मुकामी पाठविले. नंतर महाराज सरकारातून दोस्ती वाडवावी व आपले राज्याचे संरक्षण व्हावे यासाठी मालवण जंजिरा सिंधुदुर्ग तालोकेसुद्धा सोडचिठी इंग्रज सरकारात देऊन तहनामा नारायणराव रत्नाकर राजाज्ञा व दिनकरराव गाई (क) वाड यास कुंडल मुकामी पाठऊन देऊन दोस्ती वाढविली. नंतर कुंपणी सरकारातून साहेब सरदार निपाणीस येऊन येकशे व दीड गावे सोडून द्यावी म्हणौन सांगून गावच्या सोडचिठ्या निपाणकर याजकडून घेतल्या. नंतर तेच साली म्हणजे शके १७३४ चैत्र वा। ८ रोजी सिवाजी माहाराज याणी कैलासवास केला. त्याचे जेष्ठ पुत्र याचा जन्म शके १७२२ सन १८०० इसवीस जाहला. त्याचे नाव संभाजी माहाराज ऊर्फ आबासाहेब माहाराज व दुसरे पुत्र त्याचा जन्म शके १७२६ सन १८०४ इसवीत जाहला. त्यांचे नाव शाहाजी माहाराज ऊर्फ बावासाहेब माहाराज असे उभयता होते. ते राज्य करीत असता शके १७३५ साली श्री गुरु भाऊ माहाराज यांसी पुणे मुकामी अलपिष्टण साहेब बहादूर याजकडे वगैरे बोलणेस रवाना केले. त्याणी बोलणे करून चिकोडी व मनोली तालुका पूर्व वहिवाटीप्रमाणे माहाराजाकडे सुटून यावयाचा यत्न चालविला होता. इतक्यात पेशवा बाजीराव साहेब याणी कुंपणी सरकारासी द्वंद्व करून मतलबाने वागू लागले. यामुळे कुंपनी सरकार याची बाजीराव साहेब पेशवा याचे कृत्रिमपणाचे वागणुकीचे कारण ध्यानात आणून आलपिष्ट (न) साहेब बहादूर याणी शके १७३९ साली राज्य भ्रष्ट केले.

शके १७४० साली निपाणीकर याजकडील चिकोडी व मनोली तालुका

सोडऊन घेऊन कुंपणी सरकारातून माहाराज सरकार श्री गुरु भाऊ माहाराज यांचे विद्यमाने देविला. शके १७४१ साली संताजीराव घोरपडे यासी सेनापती पदाची वस्त्रे आबासाहेब हिमत बहादर याणी हुजूर आर्ज करून श्री गुरु भाऊ माहाराज याचे विद्यमाने बोलणे ठरवून वस्त्रे दिल्ही. कापसी वगैरे संस्थानची गावे निपाणीकर याचे आश्रयाने राणोजीराव घोरपडे म्हणजे नारायणराव घोरपडे याचे पुत्र याजकडे आसोन ते स्वता कापसीत राहत आसेत. त्याणी हुजूर आज्ञेस आमान्य करून बदल गोष्ट सांगितली. सबब माहाराजाची स्वारी लस्कर-सुध्धा कापसीस जाऊन ठाणे घेऊन लाटेस गेले. लाटचे ठाणे घेऊन नजराणे बद्दल लाट हुजूर ठेऊन कापसी वगैरे तालुका संताजीराव घोरपडे सेनापति याचे स्वाधीन करून नंतर स्वारी मागारी करवीरास आली. करवीर मुकामी आबासाहेब हिमत बहादर याणी हुजूर आर्ज केला की आमचे संस्थानची गावे निपाणीकर याजकडे होती ती सरकारात सुटून आली आहेत, ती गावे व हलकर्णी तालुका आमचा आम्हास पूर्ववत प्रमाणे स्वाधीन करून द्यावा म्हणौन त्याजवरून आबासाहेब माहारा(ज) याणी आबासाहेब यासी आज्ञापिले की काही नजराणा द्यावा म्हणजे तुमचा हिमत बहादरीचा तालुका पूर्ववतप्रमाणे तुमचा तुम्हाकडे स्वाधीन कर्ण्याची आज्ञा होईल. म्हणौन बोल करून आबासाहेब याणी विनंती केली की पूर्वापार सांप्रदाय नजराणा देऊन तालुका घेण्याची नवी आज्ञा होती त्यास उपाय नाही. म्हणौन विनंती करून ते काम शेवटून घेणेचे ते वेळेस तेच राहिले. पुढे शके १७४३ म्हणजे सन १८२१ इसवी साली आबासाहेब माहाराज याजवर मोहिते याणी गर्दी केली. त्यात स्वर्गस्त जाहले.[११] नंतर बावासाहेब माहाराज याणी मोहिते याचे पारपत्य करून राज्य करू लागले. याप्रो मार जाहला तो शके १७४३ आषाढ मास पर्यंत.

१ पुढे बावासाहेब माहाराज राज्य करीत असता त्याजपासी आम्ही खुद म्हणजे रताजीराव बिन उदाजीराव चवाण, अमचे वय आजमासे वीस वर्षाचे आसोन माहाराजापासी नेहमी राहत आसोन माहाराज यासी आमचा तालुका सोडून देणेविसी वारंवार विनंती करीत होतो व सोडून देतो म्हणोन आज्ञाही होत होती. त्या सहित माहाराज याणी खानेसुमारीचे पेटे शके १७४७ सन १८२५ सन इसवी साली केली. त्या वेळेस आम्हास येका पेट्याची मुखत्या-रीचे काम कर्ण्याविसी आज्ञा जाहली. नंतर आम्ही तालुका सोडून देणेविसी

विनंती केलेबदल तूर्त येक गांव मौजे हळदी का कापसी हा गाव सोडून देतो म्हणौन हळदी हा गाव आमचे स्वाधीन केला आणि पट्याहून आलेवर तालुका सोडून देण्याची आज्ञा होईल म्हणौन सांगून रांगणा, मनोहर, भुदरगड पासून दानवाड, दतवाड कृष्णा तीरापर्यंतच्या तालो (के) चे पेठ्याची खानेसुमारी कर्ण्याविसी आज्ञा होऊन बरोबर कारकून व स्वार वगैरे देऊन रवाना केले बरहुकूम ते काम करून परत आलेवर पुढे दुसरे साली शके १७४८ व्यय न.म संवछरी पुन्हा आम्ही हुजूर विनंती केली की गुदस्ता आज्ञा जाहले प्रमाणे आमचा तालुका सोडून द्यावा. म्हणौन त्याजवरून हुजूरची आज्ञा जाहली की तुम्ही पुरातन पासून इमानी शेवक त्यापेक्षा तुमचा तालोका तुमचे स्वाधीन करू. परंतु काही नजराणा द्यावा असी आज्ञा जाहली. त्या वेळेस नजराणा देणेचा सांप्रदाय पूर्वापार नाही, सांप्रदाया प्रो व्हावे म्हणौन विनंती केली. परंतु स्वामींनी आज्ञा केली की तूर्त खर्चाची आडचण आहे. सबब मागणेचा नाही, पेक्षा तुम्हाकडे नजराणा मागावे हे विहित नाही. आता जो ऐवज तुम्हाकडून घेतो हा तुम्हास काही दिवसी परतही मिळेल. वगैरे बहुत येक प्रकारे समक्ष आज्ञा जाहली वरून नजराणेबद्दल तीस हजार रुपयेची निशा देऊन सदरहू तालुका हलकर्णी वगैरे गावे १४ व पूर्व सांप्रदायाप्रमाणे हिंमत बहादर हा किताब आम्हास हुजुरून दिल्हे तो घेतला. त्या वेळेस जरी पटका व साहेब नोबत व सिके व वस्त्र भूषणे व हत्ती नंग येक येणे प्रमाणे अष्टप्रधानांच्या मरातबाबरहुकूम संभा(वना) होऊन दिल्ही. तेच वेळी आमचे तीर्थरुप आबा-साहेब यासी उमदेतुल्उमराव बहादर हा किताब सिके वगैरे दिल्हे व वस्त्रे दिल्ही. नंतर आम्ही हुजूर विनंती करून रामचंद्रराव घोरपडे यास सेनापदे देविल्या प्रो चाल आहे व आमचे मधले बंधु भवानीराव चवाण यासी नारायणराव चवाण ऊर्फ नानासाहेब ममलकत मदार यासी दत्तक दिल्हे आसोन त्यास त्याचा ममलकत मदार हा किताब म्हाराजाकडून चालत आला त्याप्रमाणेच आहे. येणे प्रो तिनी किताबती आमचे घराण्यात चालत आहेत.

या प्रमाणे चालत आसता आम्ही माहाराज याजपासी निरंतर राहत असोन माहाराज याणी शके १७५८ साली म्हणजे सन १८३६ इसवीत माहाराज सरकारच्या दौलतीचे जमाबंदी वगैरे काम आम्हास पाहणेची आज्ञा होऊन काम पाहत आसता पुढे दोन वर्षाचे सुमार म्हणजे शके १७६० साली

सन १८३८ इसवी साली हुजूरची खासा स्वारी श्रीच्या दर्शनार्थ तुळजापुरास जाताना मार्गात येवती मुकामी ज्वरांष होऊन मार्गसीर्ष शुां १३ शके सन मारी स्वर्गवासी जाहले. त्यास पुत्र दोन. वडील पुत्र सिवाजी माहाराज हेच बाबासाहेब माहाराज छत्रपति व दुसरे पुत्र माहाराज हेच चिमा साहेब माहाराज छत्रपति या उभयताचे वय लाहान आसोन येवतीहून स्वारी परत आली नंतर दिवाण साहेब माहाराज हे राज्याचे काम करू लागले आसोन त्याज निसबत कामदार दिनकरराव गायेकवाड व रावजी वाकनीस या उभयतास दिवाणसाहेब माहाराज कामात वागऊ लागले आणि माहाराजांचा लोभ आम्हावर फार होता तो द्वेष मनात आणून दिवाण साहेब माहाराज हे आम्हाबरोबर आकस करू लागले. तेव्हा आम्ही पाहत होतो त्या कामात आपण वागावे तर त्यांच्या मनात आकस, तेव्हा कामाच्या संदर्फाने येकादे वेळेस आमच्या योग्यतेस कमी करितील की काय आसे आंतःकर्णात वाटलेमुळे काम पाहणेचे महकूब केले. नंतर आमचे वडील यांचा काल शके १७६४ साली जाला.

आम्हास पुत्र दोन. पौा राणोजीराव चवाण ऊर्फ भाऊ साहेब व दुसरे पुत्र प्रीतीराव चवाण ऊर्फ बापूसाहेब आसे दोन पुत्र व आम्ही हाली करवीर मुकामी आसोन आमचे हिमत बहादरीच्या संवस्थानकडे उत्पन्न चालत आहे ते येकंदर गाव व जमिनी व कुरण देशमुखीचे वतन व बाबतीसुधा आजमास २५,००० पंचवीस हाजार रुपयेचें बेरीज आसोन त्या प्रो लावणीमुळे कम जाजती बेरीज होत असोन रसदी बेरीज पेशजी लिहिल्याप्रमाणे काईम म्हणवत नाही. कम जाजती होत असेत. सदरहु संवस्थान पौा खर्च बाा आमचे चुलत बंधु जोत्याजीराव चवाण याजकडे तीन हाजाराचे उत्पन्न नेमून दिल्हे आहे व आमचे बंधु जीवनराव चवाण याजकडही तीन हाजार रुपयचे उत्पन्न खर्च बाा नेमून दिल्हे आहे आणि उ (भ) यतानी संवस्थानचे ताबेत वागावे असे आसोन त्या प्राा वहिवाट होत आहे. जीवनराव यास येक पुत्र आहे. त्याचे नाव माधवराव चवाण ठेविले आहे. येणे प्रो इकडील प्रकार आसोन माहिती मिळाली तो प्रकार लिहिला आहे. येणे प्राा मजकूर आहे कळावे छ २४ जिल्हेज शक १७७२ सन १८५० ईा ताा ३१ आगटबर ऊर्फ आश्विन वाा ११ रोज

दस्तूर आपाजी आबाजीराव इनामदार
आंतुरकर निाा हिम (त) बहादर. रताजीराव चवाण हिमत बहादर.

१ शककर्ते शिवाजी महाराज इ. स. १६८० साली निधन पावले.

२ औरंगजेब संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत दक्षिणेत आला.

३ क. छ. घ. इ. सा. भाग १, ले. ५ : गुजर

४ करवीर रियासतीची कागदपत्रें पहिला खंड : गर्गे, पृ. २७६

५ संताजी घोरपडे इ. स. १६९७ साली मारले गेले.

६ उदाजी चव्हाण यांचे निधन १२ नोव्हेंबर १७६२ रोजी झाले ( करवीर रियासत : गर्गे, पृ. ३०० )

७ ऐं. ले. सं. भाग ९. ले. ३५२९.३०

८ राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास. पृ. ४० : ख. आ. गायकवाड

९ क. छ. घ. इ. सा. ४ ले. ६९, पृ. ५६

१० कर्नल मॉटेसर. सिक्रेट अँड पोलिटिकल डिपार्टमेंट डायरी नं. २८०/१८१२

११ करवीर रियासतीची कागदपत्रें पहिला खंड : गर्गे, पृ. १४५, १४६, २२१

## सेना खासकील शिंदे, तोरगलकर घराण्याची कैफियत

पारसनीस दप्तर / इ. स. १८४८

यादी श्रीमन्महाराज छत्रपती सरकार करवीर यांचा वारणा पावेतो तह जाहल्या पासून राजश्री लक्ष्मणराव शिंदे सेना खासकील संस्थान तोरगल यांचे पूर्वजानी पराक्रम केले ते छत्रपती माहाराज सरकार यानी निपाणकर व पटवर्धन व वाडीकर सावंत याज बरोबर कोणत्या कारणावरून कोणकोणत्या ठिकाणी लढाया दिल्या, त्यात लढाऊ लोक कोणते होते, त्यानी पराक्रम काय केला व कोणत्या किताबती व स्वास्ता संपादन केली, हे आपल्या घराण्यापुरती माहिती, पुरातन लेख असतील त्यावरून, तसेंच इतर प्रत्यंतरावरून व दंतकथेवरून अेक संक्षिप्त बखर लेखन करून पुरातन लेखाच्या नकला सहीत पाठविल्या त्या पुरुषाचे नांव चिरकाल राहण्या...............व दाखल करावे म्हणोन मेहेरबान ग्रामसाहेब बाहादुर पोलीटिकल सुपरिंटेंडेंट ईलाखा करवीर याजकडून थैली छ ६ माहे जुलई सन १८४८ (पुढील एक ओळ फाटून गेली आहे) गोष्टी वरून सेना खासकील यानी लिहिले तपशील.

१. शककर्ते श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती यास शके १५९६ आनंद नाम संवत्सरे, सन खमस सबेन मयातेन व आलफ साली पट्टाभीषेक जाहाला. त्या पासोन पुढे पांच सहा वर्षे राज्य केले. त्यांचे पोटी पुत्र दोघे. शंभुमाहाराज व राजाराम माहाराज. त्या समई आमचे नीपणजे नरसोजी शिंदे यांस दक्षिण प्रांत काबीज करून ठाणी घालावी म्हणोन आज्ञा जाहाली. त्याज-वरून आमचे निपणजे यानी इकडे येवून फौज जमा करून तोरगल संस्थान संपादन केले. यांची कैफीयत प्रकर्णी अलाहिदा राजेश्री व्यंकाजीपंत वकील यानी दिलीच आहे. नरसोजी शिंदे आमचे निपणजे यानी तोरगल संस्थान केले

त्यास अजमासे अेकशेहे सत्तर वर्षे होतील. नंतर आपली कन्या श्रीमन्महाराज शंभू माहाराज छत्रपती[1] यास जीजाबाईसाहेब यास लग्न करून दिले. नंतर नरसोजी शिंदे यांचे पुत्र सुभानराव शिंदे आमचे पणजे यास हुजूरून आज्ञा जाहाली जे दक्षिण प्रांती बंडाई जाहाली आहे तुम्ही जावून बंडाचे पारिपत्य करून यावे म्हणोन. त्याज वरून किले तोरगलाहून जावून फौजबंदी करून दक्षिण प्रांती जावून बंडाईचे पारिपत्य करून माहाराज सरकारकडे गेले. तेव्हा श्रीमन्महाराज शंभु माहाराज छत्रपती स्वामी यानी आमचे पणजेचा पराक्रम पाहोन स्वामी कृपाळू होवून सेना खासकील किताब देवून वस्त्रे देवून बहुमान करून दक्षीण प्रांतातील खंडण्या घेवून चौथाई मोकास दावेचा आमल बसवणे विषयी आज्ञा होवून पाठविलेवर दक्षीण प्रांती जावून आज्ञेप्रमाणे काबीज करून खंडण्या घेवून आमल बसवलेचे आमचे पणजे सुभानराव शिंदे सेना खासकील यानी हुजूर विनंतीपत्र पाठविले. त्यांचे आज्ञोत्तर हुजूरून आले त्याची तालीक पाठविली आहे. आणि सनदा पत्रे व वंशावळी येकंदर हकीगत लिहून पेशजी थैली आसाहेबाची आली त्याजवरून राजेश्री व्यंकाजीपंत वकील याज समागमे पाठविण्याचे आहेत, त्या सर्व वकील यानी आसाहेबास जाहीर केल्या असतील.

२. श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती स्वामी यास परशराम पंत भाऊ पटवर्धन यानी लढाईचा सिलसीला लाविला. त्यासमई आमचे आजे लक्ष्मणराव शिंदे सेना खासकील यास सन आर्बा तीसेन मया व आलफ साली हुजूर येणे विषयी आज्ञा पत्र आले वरून आमचे आजे करवीरास गेल्यानंतर रामचंद्रपंत आपा पटवर्धन, पशरामपंत भाऊ पटवर्धन याचे चिरंजीव यानी ठाणे आळतेस येणार[3] तुम्हाकडील लोक त्या ठाणेचे बंदोबस्तास पाठवावे, म्हणोन हुजूरची आज्ञा जाहाली. तेव्हा अमचे आजेने बापू जगताप यास सरदारी देवून त्याजबरोबर मानकरी व स्वार व पायदळ देवून ठाणे आळतेचे बंदोबस्तास पाठविले. नंतर रामचंद्रपंत आप्पा पटवर्धन यानी सन मजकुरी शके १७१५ प्रमादीनाम संवत्सरे मार्गशिर्ष मासी येवून ठाणे आळतेस वेढा घातला. पाच सहा दिवस लढाई दिली. त्याची फौज भारी. मोर्चा ठाण्यास दिला. त्या समई खस्त मेहनत करून मोर्चा उठविला. तेणेकरून रामचंद्रपंत आप्पा यानी फारच जिकरी करून ठाणे हाल्लेनी घेवून सर्वत्रास कापून काढावे, अशी मसलत केली. ही वार्ता हुजूर निवेदन होवून श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती[3]

यांची खासा स्वारी फौज सुद्धा येवून कुमक देवून लढाई करून रामचंद्रपंत[3] यास हस्तगत करून घेवून हुजुरची स्वारी करवीरास आली. लढाईत रामचंद्रपंत आप्पा पटवर्धन यास जखमा लागल्या होत्या. त्या हुजूरून वैद्याकडून जखमा बांधवून दुरुस्त करून माहाराज सरकारनी रामचंद्रपंत यांजवर कृपाळु होवून पोषाख व जडजवाहीर देवून बहुमान करून तासगावास रवाना केले. आळतेचे ठाणे राखोन लढाई व आम्हाकडील सरदार व मानकरी व पाठिचे लोकानी खस्त व मेहनत केली याजबद्दल बक्षीस व बहुमाने देण्यास आज्ञा व्हावी म्हणोन विनंती करून देवावे म्हणतो, असे आमचे वडिलाचे नावे आमचे आजेनी पत्र लिहून पाठविले. त्याचे उत्तर आमचे वडिलानी लिहून करवीरास पाठविले त्याची तालीक पाठविली आहे.

रामचंद्रपंत आप्पा पटवर्धन यास हुजूरून बहुमान करून पाठविलेले पाहून परशरापंत भाऊ यांचे चित्ती विषाद येवून आणखी हुजूरचे तालुकेत सिलसीला लावून माघमासी करवीरास आले. तेथे लढाई होवून परत तासगांवास गेले. आमचे आजे यास तुम्हाकडील काजकामे केलेले लोकास ईनाम बक्षीसास बहुमाने देतो म्हणून आज्ञा जाहली. हुजूर येवून घेतले. तेथे आमचे आजचे शरीरी समाधान नाहीसे होवून फाल्गुन शुद्ध पौर्णीमेस देवाज्ञा जाहाली. त्या समई हुजूरचे आज्ञापत्र आमचे वडिलाचे नावे आले आहे. त्यात लक्ष्मणराव शिंदे सेना खासकील यांचा काल जाहाला, तुम्ही कोणते गोष्टीचा खेद न करिता स्वस्तचित्ती असणे, तुमचे सर्व प्रकारे सांभाळ करणार स्वामीस अगत्य असता तुम्हीं हरएक विषयी चिंता न करावी. हुजूर येणे विषयी तुम्हास आज्ञापत्र मागाहून सादर होईल. त्यासमई किलेचा बंदोबस्त करून यावे, म्हणून लिहीले आहे. नंतर हुजूर येणे विषयी आज्ञापत्र आले व आमचे वडील करवीरास गेले. श्रीमन्महाराज छत्रपती स्वामी यानी पोषाख देवून बहुमान केला तेव्हा आळतेचे लढाईत आम्हाकडील सरदार व मानकरी व पायेचे लोकांनी पराक्रम करून खस्त मेहनत केली त्यास बक्षीस व ईनामेचे याज बहुमाने देतो म्हणून पेशजी आज्ञा वडिलास जाहाली होती. त्याप्रमाणे घ्यावे म्हणोन आमचे वडील संमाजीराव शिंदे सेना खासकील यानी विनंती करून घेतली. त्याजवरून स्वामी कृपाळू होवून आम्हाकडील सरदार व मानकरी वगैरे लोकास ईनाम बक्षीस दिले तपशील.—

१. बापू जगताप यास मौजे बसरगी तालुके मनोली हा गांव ईनाम करून दिला आहे.

५. मानकरी यास बक्षीस

१. हणमंतराव घाटगे झुंजारराव यास सोन्याचा तोडा

१. बजाजी बाबा रणसिंग यास सोन्याचे कडे

१. सिवबा नलगे यास सोन्याचा तोडा

१. परशराम काटइ यास भाल्याची जखम लागली त्या जखमा बदल खर्चास दोनशेहे रुपये व सोन्याचे कडे

१. तमाण हवालदार यास सोन्याचे कडे

९. पायचे लोकास बक्षीस –

१. रुद्रणा हुजुरात यास जवमाळ सोन्याची

१. हणम भोई यास मोहनमाळ सोन्याची

१. येल नाईक यास रुप्याचे कडे

१. भीमाणा हुजुरात यास रुप्याचे करणे बदल रुपये दोनशेहे

१. हणमंता हुजुरात यास पायात घालणेची साखळी रुपेची व फुलाची

१. पासोडी.

निंगणा कुलुर यास बुंदुकीस रुपेचे कट घालणे बदल रुपये येक शेर

१. बसणा कुलुर यास तरवारीस रुप्याचे मेण करणेस रुपे दोन शेर व फुलाची पासोडी

१. इंणा सींग्या यास सिंगास गोळी लागली होती. सबब सिंगास रुपेचे कट घालणेस रुपे येक शेर

येणेप्रमाणे ईनाम बक्षिसा देवून हुजुरचा निरोप घेवून किल्ले तोरगलास आले.

३. श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती स्वामी याजकडून आमचे वडील संभाजीराव शिंदे सेना खासकील यांचे नावे आज्ञापत्र व फौजेचे खर्चास आले वरून आमचे वडील यानी करवीरास जावून हुजुरचे आज्ञेप्रमाणे काम काजे केली तपशील –

१. सन सबा तीसेन साली श्रीमन्महाराज छत्रपती स्वामी यांचे आज्ञापत्र हुजुर येणे विषयी आले वरून आमचे वडील करवीरास जाऊन पटवर्धन याज बरोबर लढाई दिली तेव्हां स्वामी कृपाळु होवून सेनाधुरंधर विश्वासनिधी म्हणोन घेउन बहुमाने करून पोषाख देवून तोरगलास जाणे विषयी निरोप देवून पाठविले.

२. श्रीमन्महाराज छत्रपती स्वामी यानी रत्नाकरपंत राजाज्ञा यांस दक्षीण प्रांतातील ठाणे बसवणे विषयी आज्ञा होवून आगाडीस फौज सर्व रवाना केली. त्यासमई आमचे वडिलांचे नावे आज्ञा पत्र आलेने पंडित राजाज्ञा फौजसुद्धा त्याप्रांती रवाना जाहले[४] आहेत ती तुम्ही फौज सुद्धा पंडित मा।नीले याजकडे जावून, तुम्ही विनंती केल्या अन्वये मशारनीले यांचे स्वामी सेवा करून दाखवून कृपेस प्राप्त होणे, म्हणोन छ २९ जमा दिला व सन समान तीसेन मया व आलफेचे आले वरून फौज जमा करून पंडित राजाज्ञा याजकडे गेले इतक्यात हुजुरची खासा स्वारीही आली. हुजुर जाऊन आज्ञेप्रमाणे प्रांत गोकाक तालुकेत ठाणे बसविली व गंचीनकुर बेटीचे ठाणे आमचे वडिलाचे स्वाधीन केले. नंतर हुजुरची स्वारी हुबळीकडे गेली. आमचे वडिलास पदीपेली कडील ठाणी घालणेस आज्ञा जाहाली वरून नवलगुंद तालुकेस ठाणे बसवून आमचे तर्फेने मामलेदार ठेविले. तसेच मुळगुंद तालुकाही घेवून ठाणे बसविली. आमचे वडिलाचे रजेतलबेत वर्तणूक करून बसुल देत जाणे, म्हणोन मोकदमानेचे नावे आज्ञापत्रे–

१. प्रांत मुळगुंद अेकंदर गाव गनास वट ताकीद
१. मौजे कडूर तर्फ माथ
१. मौजे कोळवले तर्फ माथ
१. मौजे कुरटी तालुके मुळगुंद
१. मौजे करिसुड तर्फ माथ
१. मौजे हेबळुर तर्फ माथ

येणेप्रमाणे दिली आहेत. फौजेचे खर्चाबद्दल गोकाक तालुके पो। दाहा हाजार रुपयाची वरात रामचंद्र जोशीराव व रघुनाथराव माने यांचे नांवे वकील नरगुंदचे ऐवजी व प्रांत नवलगुंद पो। दहा हजार रुपये घेणेविषयी आज्ञापत्र आहे. शिवाय नवलगूद तालुका आम्हाकडे होता त्या पैकी फौजेचे खर्चास घेत होते. येणे प्रमाणे ठाणी बसवून आमचे वडील हुजुरची स्वारी हुबळीस होती तेथे गेले. स्वारी मनोळीचे ठाणे घ्यावया करिता आली तेव्हा आमचे वडिलास तोरगलचे किलेहून तोफा घेवून येणे विषयी आज्ञा जाहाल्या वरून तोरगलास

येवून तोफ घेवून गेले. मनोळीचे ठाणे परशरामपंत भाऊ पटवर्धन यांजकडून बाळाजीपंत नी।। सदाशीवपंत होते. सदरी ठाणेस तोफ लावितांच ठाणे सोडोन गेल्यावर हुजुरचे ठाणे पडले. ठाणेत खंडेराव भोसले व दिनकरपंत यास ठेवून हुजूरची स्वारी करवीरास गेली. त्या समई त्या प्रांती फौज सुद्धा पंडित राजाज्ञा व आनंदराव पंडीत प्रतीनिधी व आमचे वडील संभाजीराव शिंदे सेना खासकील व प्रीतीराव चव्हाण हिंमत बहाद्दर व नारायणराव पाटणकर सरलष्कर यास हुबळी वगैरे प्रांताचे बंदोबस्तास राहाणे विषयी आज्ञा जाहाली. नंतर आमचे वडिलास मुदकरी व येंडगीरी व अनवालाकडे जावून ठाणी घालावी म्हणोन पंडित राजाज्ञा यांची पत्रे हुबळी मुक्कामाहून आले वरून फौज सुद्धा जावून ठाणी बसवून पुन्हा लष्करात राजाज्ञा कडे गेलेवर धोंडोपंत गोखले यानी हुजूरची ठाणी बसली होती, त्या तालुक्यास व आमचे तालुक्यात सीलासीला लाविला. त्या समई आमचे वडील पंडीत राजाज्ञा समागमे लढाईत होते व तोरगल तालुकेस गोखले यांचा उपद्रव होताच तालुकेचे बंदोबस्तास तोरगलास येवून तालुक्याचा बंदोबस्त करून पुन्हा पंडीत राजाज्ञा कडे गेले. म्हणून विनंती पत्र लिहीले. त्याचे उत्तर आज्ञापत्र आले. त्याची तालीक नंतर गोखले सावनुरकडे हुजूरून घेतलेले तालुक्यास उपद्रव करू लागले, तेव्हा हुजूरचे फौजेची व गोखलेची लढाई जाहाली. गोखलेचे मोड होवून सावनुरात शिरलेवर हुजूरची फौज करवीरास गेली.

३. परशरामपंत भाऊ पटवर्धन यानी सन तीसा तीसेन मया व आलफ साली कोपल सावनुराकडे गेले तेथे फौज जमा करून घेवून हुजुरचे प्रांतास उपद्रव करणे बद्दल आले. ते मौजे कीटवाल तर्फ मनोळी येथे येवून उतरून आमचे तालुक्यास उपद्रव करणेबद्दल आले. येथून स्वार व लोक पाठविले. पटवर्धन याजकडील पेंढारी पुढे चालोन येताच आमचे लोकास याजकडील व त्यांचे लोकांस मारामारी होवून पेंढारी यांची घोडी पांच साहा पाडाव आणिली. तेव्हा इकडील जमाव पाहून लढाई न करिता निघोन गोकाकेवरून करवीर प्रांती गेले. नंतर हुजूरून आमचे वडिलास येणेविषयी आज्ञापत्र आले. तेव्हा आमचे तालुक्याचा बंदोबस्त करून हुजुर फौजेसुद्धा गेले. परशरामपंत भाऊ पटवर्धन हे फाजसुद्धा लढाई करणेबद्दल पटटणकुडी कसबा लाट येथे आले, त्या समई माहाराज सरकारची फौज सुद्धा होवून पटणकुडीवर शके १७२० काळ युक्ताक्षी-

नाम संवत्सरी भाद्रपद मासी लढाई जाहाली. त्या लढाईत परशरामपंत भाऊ पटवर्धन हस्तगत........स्वारी फौजेसह करवीरी गेली.[५]

४. सन मया तेन व आलफ शके १७२१ सिद्धार्तीनाम संवत्सचे साली रामचंद्र पंत आपा पटर्धन परशरामपंत भाऊ याचे चिरंजीव यानी आपले वडिलास ठार मारलेचे चित्ती विशाद आणून शिंदे कडील पलटणे कंपुची घेउन करवीरास वेढा घालणार हे हुजूर विदीत होवून आमचे वडिलांस हुजूर आणवून घेवून करवीरात पंडीत राजाज्ञा यांस व आमचे वडिल संभाजीराव शिंदे सेना खासकील यास व व प्रीतीरात्र चव्हाण हिंमत बाहाद्दर यांस व पंत प्रतिनिधी कडील लोक व विशाळगडकडील लोक वगैरेस देवून हुजूरची खासा स्वारी किल्ले पनाळ गडास गेलेवर रामचंद्र पंत आपा पटवर्धन यानी कंपुची पलटणे घेवून येवून करवीरास माघ मासी वेढा दिला. दररोज लढाई होवून किल्याचे भिंताडे तोफेचे मारगीरीने पाडावे, ते रात्रौ........तयार करावे. दुसरे दिवशी आणखी लढाई व्हावी. याप्रमाणे चार महिने अजमासे होवू लागली. माहाराज सरकारनी शिंदेकडे[६] वकील पाठवून रामचंद्र पंत आपा पटवर्धन यास धरून काबीज करावे अशी पत्रे कंपूचे सरदार यास आणविली. ती पत्रे कंपुचे लष्करात न जाता परभारे रामचंद्र पंत आपा पटवर्धन यांचे गोटात आली. त्यातील मजकूर पाहोन मसलत फसली, दंगा जाहाला असे समजून आपली फौज सुद्धा कंपुचे फौजेस वर्तमान समजू न देता रातोरात निघोन गेले. नंतर निपाणकर याचे व सखाराम घाटगे सर्जेराव कागलकर यांचा आप्तपणा, तेव्हां घाटगे सर्जेराव यांचे इतल्याने सदरी कंपुची फौज आलिजा बहाद्दर यानी आपली कंपुची पलटणे आणवून माहाराज सरकारची स्वारी पनाळेहून करवीरास आली. त्या समई हुजूरची मर्जी प्रसन्न होवून समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधी म्हणोन मान देवून पोशाक देवून निरोप दिलेवर निघोन किल्ले तोरगलास गेले.

५. सन ईसने मयातेन व आलफ साली सावनुरावर रामचंद्र पंत आपा पटवर्धन यास व बापु गोखले यास लढाई जाहाली. त्या समई गोखले यानी कुमकेविषयी हुजूर विनंती पत्र लिहीले. त्याजवरून हुजूरचे आज्ञापत्र आमचे वडिलांचे नावे आलेने हुजूरून हैबतराव गायकवाड[७] यास, फौज सुद्धा रवानगी जाहाली आहे, तुम्ही गोखले याजकडे निकडीने जाणे विषयी आलेवरून आमचे वडिलानी बापु जगताप याजबरोबर फौज देवून सावनुरास गोखले याजकडे रवाना

केले. तेथे पटवर्धन व बापु गोखले यांची लढाई झाली. त्यावेळी पटवर्धन यांचा मोड जाहाला. आम्हा कडील बापु जगताप व मनाई वगैरे लोकांनी खस्त मेहनत केली. त्यावेळी बापु गोखले यानी आमचे वडिलांचे नावे पत्र लिहिले आहे त्याची तालीक पाठविली आहे. नंतर हैबतराव गायकवाड विश्वासराव व सदाशिवराव यादव व सुबराव घाटगे सर्ज्याराव याजबरोबर हुजूरची फौज आली. हैबतराव गायकवाड या समागमे वडील जमावानीसी सावनुरास गेले. पटवर्धन यानी हुजूरची फौज कुमकेस आली असे समजोन तोंडास न लागता निघोन गेलेवर हैबतराव गायकवाड फौज सुद्धा निघोन करवीरास गेले. आमचे वडील तोरगलास आले.

६. सावंतवाडीकर यास व माहाराज सरकारास द्वंद्व पडावयास कारण हुजूरचे प्रांतातील मालवण किल्ले खालील हक्क वाडी तालुकेत यावा तो वाडीकर यानी जबरीने सुरळीत देत नवते. म्हणण्याबद्दल हूजूरची खासा स्वारी फौज सुद्धा गेली होती. त्या समई आमचे वडील संभाजीराव शिंदे सेना खासकील हे जमावानीसी गेले होते. तेथे लढाई होवून स्वारी परत आली. नंतर दुसरे वेळी खेम सावंत वाडीकर निवर्तलेवर भाऊबंदी खटला आलाने प्रथम खेम सावंत यांचे वडील दादासाहेब, यांचे पाठचे बंधु सोम सावंत, धाकटे कुट सावंत. हे तिघे बंधु दादासाहेब निवर्तले नंतर दादासाहेब यांचे पुत्र खेम सावंत यास सिके घालुन सावंत हे राज्य कारभार करीत होते. कित्येक दिवसानंतर खेम सावंतही निवर्तले. त्यांच्या बायका चौघी. वडील लक्ष्मीबाई, सोम सावंत यांचे पुत्र फोंड सावंत, जयराम सावंत, कुट सावंत याचे पुत्र रावसाहेब, बाळा साहेब, यानीं खेम सावंत यांचे वडील बायको लक्ष्मीबाईस येक करून घेवून आपला पुत्र भाऊसाहेब यास लक्ष्मीबाईचे पुत्र करून सिक्का घालावा ही मसलत योजून सोम सावंत याजबरोबर द्वंद्व आरंभिले. तेव्हां सोम सावंत यानी आपला पुत्र फोंड सावंत देवास जाणेचे नीमित्य करून रेडीचे किल्लेस पाठविले. तेथे ठाणे बळकावून राहिलेनंतर सावंतवाडी सोम सावंत यांस व रावसो। यास युद्ध होवून रावसो। यानी सोम सावंताचे घरात हल्ला केला. तेव्हा सोम सावंत यानी मनात योजना केली जे आम्हास धरून जीवानिशी मारितात त्यापेक्षा यांचे हाती सापडो नये. म्हणून दारुची बुधली जवळ घेवून बसले होते. त्या समई रावसाहेब यांचे लेकावळेने व चंद्राजी या दोघानी घरास आग लाविली. तेव्हा दारुचे बुधलेस

आग लागून सर्वच ठार जाहाले. नंतर फोंड सावंत हे सोम सावंत यांचे वडील पुत्र रेडीचे किलेस राहिले. त्यास धरून मारावे ही मसलत रावसाहेब यानी केली. हे वर्तमान फोंड सावंतास समजताच त्यानी हुजूर करवीरास श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती स्वामी यांस सांगोन पाठविलेवर सन आर्बा मयातेन व आलफ माहे सफर महिन्यात हुजूरून राजाज्ञा याजबरोबर देवून समागमे आमचे वडिलांस जाणे विषयी आज्ञा होवून खर्चीस देवून पाठविले. राजाज्ञा हे जावून नांदोसीचे तळावर लष्करसहीत राहिले. तेथे राजाज्ञा यानी आमचे वडिलास सांगीतले जे फोंड सावंत हे तुमचे मेव्हणे आहेत, तुम्ही त्याजकडे रेडीचे किलेस जमावानीसी जावून घेवून यावे म्हणोन सांगितलेवरून आमचे वडील जमावानीसी रेडीचे किल्यास जावून फोंड सावंत सरदेसाई, हाली बापूसाहेब वाडीस आहेत यांचे वडील, त्यास घेवून हुजूरचे लष्करांत राजाज्ञा याजकडे आले. तेथून फोंड सावंत यास मालवणास ठेवून राजाज्ञा फौज सुद्धा वाडीकडे गेले. हुजूरची स्वारीही करवीराहून आली. नंतर वाडीकरास व हुजूरचे फौजेस लढाई होवून हूजूरची स्वारी करवीरास आली.

७. श्रीमन्महाराज छत्रपती स्वामी यास व नीपाणकर यांस द्वंद पडावयास कारण निपाणकर व पटवर्धन येक होवून हुजूरचे प्रांती स्वारी शिकारी करू लागले आणि मनोळी व मुरगुड तालुका हुजूरचा होता तो निपाणकर यानी घेतला आणि नारायणराव घोरपडे यानी निपाणकर याजकडे मिळोन फौज जमाव करून सेनापतीचे तालुक्यास व हुजूरचे प्रांतातील ठाणी घातली याज बद्दल द्वंद पडले. त्यासमई हुजूर येणेविषयी आमचे वडील संभाजीराव शिंदे सेना खासकील यांचे नांवे हुजूराची आज्ञापत्रे व हैबतराव गायकवाड विश्वासराव व रायाजी जाधव जप्तनमुलूक व प्रीतीराव चव्हाण उमदेतूल उमराव बाहादर व नारायणराव पाटणकर सरलष्कर यांची पत्रे आली. त्यांत, फौजेची खर्चासही पाठवून दिले आहे. जमावानिसी निघोन यावे. आपण चित्तात कोणविसी कल्पना न आणिता जमावासुद्धा सत्वर निघोन यावे. सिबंदी वगैरे काही आपणास पडू देत नाही. सर्व आमचे जीमा आहे. आपण कोणते विषयी काळजी न धरिता यावयाचे करावे. हुजूरही आपली पत्रे येतो म्हणून आली. त्याजवरून हूजूरची मर्जी संतोष आहे. आपण येणे करितां लढाई तहकुबी केली आहे. म्हणोन त्याजवरोन फौज जमा करून हुजूर गेले.

नंतर हुजूरची फौज बेडकेहाळावर मुक्काम करून चिकोडी प्रांतातील ठाणी घालून हजूरची स्वारी का। सांगाव प्रांत हुकेरी येथे मुक्काम केला. हुजूरचे फौजेची व नीपाणकर यांची लढाई एक दोन झाल्या. त्यात आम्हाकडील जाया जखमी जाहले त्यांची नावनिशी तपशील.

१. पहिले लढाईत हैबतराव कदम

४. दुसरे लढाईत — १ लिंबाजी कदम

१ कुसोजी जाधव — १ होनाजी जाधव

१ शेख मोहीद्दीन

४

नंतर शेवटची लढाई सन तीसा मया तेन व आलफ शके १७३० (इ. स. १८०८) विभवनाम संवत्सरे माघमासी जाहाली. त्या समई आम्हां कडील लोकानी फार खस्त मेहनत केली. जाया जखमी फार जाहाले व ठारही झाले त्याचा तपशील.–

१. घोडी पडली ६०० प्रमाणे ४८०० रुपये दिले

१. जखमी स्वार ६४ यास जखमाना खर्चीबद्दल दर असामीस बीस २० रुपये प्रमाणे रुपये १२६० दिले

१. पायाचे जखमी असामी ८३ दर असामीस ६ प्रो ४९८

१. जखमीयास सनगे ३००० तीनहजार रुपयांची

१. मयत आसामी २

१ रामकृष्ण बावा निंबाळकर रुपये ४००

शेख टिपु वस्ताद रुपये १५०

शिवाय रामकृष्ण बाप्पा नींबाळकर यानी मयेत ताल्या निंबाळकर यांस मौजे केसर गोप हा गांव ईनाम करून दिला आहे तो त्याजकडे चालत आहे. शेख टिपु वस्ताद यास मौजे सुनाळ येथे अर्धमार जमीन ईनाम करून दिली आहे.

येणेप्रमाणे आमचे वडिलानी दिले. हुजूरची स्वारी समागमे आमचे वडील करवीरास गेले तेव्हा श्रीमन्महाराज छत्रपती स्वामी यानी सेना खासकील हे फार खराबीस आले असे बोलिले. पुढे आम्हास लग्न करून द्यावे, लग्नसमई काही ईनाम द्यावे, असे चित्ती अणोन लग्नाचा उद्योग करून सन अशर मयातेन व आलफ शके १७३१ (इ.स. १८०९) शवलनाम संवत्सरे मार्गशीर्ष मासी लग्न

करून दिले. त्यासमई मौजे खोची हा गाव ईनाम संकल्प करून दिला. त्याची सनद व ताकीद द. २२ माहे शोबान सन ईहिदे अशर मया तेन ब आलफ साली लिहून दिले आहेत त्या व्यंकाजीपंत वकील याजबरोबर पाठविल्या आहेत. पुन्हा निपाणकर यानी फौज घेवून लढाईबद्दल करवीरास आले, त्या समई आमची पागा मौजे खोची येथे होती. ती पागा नोसे रघुनाथ याजबरोबर करवीरास पाठविली. तेथे जयंती वोढेवर लढाई झाली. त्या समई आम्हा कडील स्वार तिघे ठार जाहाले तपशील.

१ नारायणराव घोरपडे १ हणमंतराव घोरपडे
१ रामसिंग शिंदा

येणेप्रमाणे आसामीस ईनाम जमीन दिली आहे. आमचे वडीलांनीं निपाणकर याजबरोबर सांगवंवर लढाई दिली ही कल्पना मनांत धरून आम्हां कडील संमत कटकोळ व खेडीसुद्धां निपाणीकर यानी फौज पाठवून ठाणी सन ईसने आशर मयातेन व आल्फ साली घेतलीं. नंतर हूजूर विनंती पत्रे पाठविली तेव्हां हुजूरून पुणेस बोलणे होवून कटकोळ देह सुद्धा सोडचिठ्या अणावून कल्याणराव याजबरोबर पाठवून आमची गावे आम्हांकडे देविली. सन आर्बा आशर मयातेन व आलफ साली हुजूरून सोडचिठ्या आलेल्या वकील याजबरोबर पाठविल्या आहेत.

१. सांगावचे लढाईत माहाराज सरकारचे फौज कचरली हे पाहुन आमचे फौजेचे व नीपाणकराचे फौजेचे गाठ पडोन लढाई जाहाली. त्यावेळेस आमची खराबी होवून वडील करवीरास आले. लढाईत ठार जाहाले लोकांचे व जखमी लोकांचे खर्चाचा गवगवा पडला. तेव्हा माहाराज सरकारातून खर्चास यावयाचे. परंतू सरकारचे जामदारखानेस शिल्लकेस ऐवज नव्हता. सबब श्री माहालक्ष्मी देवीचे अंगावरील दागिना व रत्नजडीत मुगुट सुद्धा एकंदर अजमासे पन्नास हजार रुपयाचे श्रीमन्महाराज शिवाजी माहाराज छत्रपती स्वामी यानी भरून आमचे वडीलाचे ठिकाणी पाठविले. तेव्हां आमचे वडील संभाजीराव शिंदे सेना खासकील यानी श्रीदेवीचे दागिने ऐसे समजून श्री देवीस अभिषेक करवून शंभर रुपयाची साडी श्रीस देवून एकंदर दागिने परत देवीस पोचते केले. आमचे लोकांचे समजूत आमचे वडिलानी केली. तपशीलवार सदरी लिहीले आहेत.

येणेप्रमाणे आमचे वडिलानी हुजूरची शेवेचे एकनिष्ठपणे करून काजकामे केली. आणि काजकामात मनुष्ये ठार जाहाली व जाया जखमी जाहले त्यास ईनाम बक्षीसी बद्दल गावे व जमीनी व…… ……दिले आहेत व फौजेचे खर्चाबद्दल लाखो रुपयेचे…………येवून बहूत खराबीस आले. असे असोन श्रीमन्महाराज बावासाहेब महाराज छत्रपती स्वामी यानी अलीकडे जबरीने का कटकोळ व मौजे नंदवाड अशी घेतली आहे व मौजे खोची गाव आम्हाकडे चालत होता. हल्ली तोही चालत नाही. याजमुळे संस्थानावर कसाला फार आला आहे. आसाहेबानी मेहेरबानी करून आमची गावे आम्हास सोडून देवून संस्थानाचा बचाव करणे आसाहेबाकडे आहे. तारीख २० माहे शोवल सुमा तीसा आर्बेन मयातेन व आलफ शके १७७० कीलनाम संवत्सरे सन १८४८ ईसवी.

………………………………

१ कोल्हापूरचे पहिले संभाजी महाराज

२ आळत्याची लढाई डिसेंबर १७९३ (करवीर रियासत : गर्गे पृ २४३)

३ कोल्हापूरचे दुसरे शिवाजी महाराज

४ करवीर रियासत : गर्गे पृ. २५०

५ पट्टणकुडीची लढाई : सप्टेंबर १७९९

६ दौलतराव शिंदे

७ राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास : खं. आ. गायकवाड, पृ. ४५



## हिंदुराव घोरपडे, गजेंद्रगडकर घराण्याची कैफियत

सेनापती दप्तर / इ. स. १८६७

यादी मेहरबान पोलीटिकियाल एजंटसाहेब बहादूर प्रात कर्नाटक व करवीर याजकडे संस्थान गजेंद्रगड येथील घोरपडे हिंदुराव यांचे घराणेतील पुरुषांचा पराक्रम वगैरे केलेची माहिती बद्दल हकीकत लिहिणेंत येती ती खाली लिहिले प्रमाणे समक्ष हुकूमावरून

१. घोरपडे यांचे मूळ पुरुष बहुत दिवसापूर्वी पुणे प्रांतातील वतनदार असोन आडनाव भोसले. दैववशांत बादशहाची व यांची गाठ पडून काही दिवस त्यांचेपासी राहून मर्जी संपादन करून स्वारी बराबर असत. जेथे तुंबळ गड किल्ले हस्तगत न होता अवगड पडले असे किल्ले, जेंथे सीड वगैरे लावून हल्ला करणेचा उपाय नाही तेथे त्यास नेमला म्हणजे घोरपडीचे कंबरेस दोरी बांधून किल्ले वगैरेवर चढणेचे ते आगाडीस आपण चढून निशान लावावे. असे दर जागी पराक्रम स्वतः फौजेनिसी केले. त्यामुळे बादशाहाची मर्जी खूष होऊन 'घोरपडे' म्हणोन किताब दिल्हेचे कारण हेच की जेथे जेथे प्रसंग पडेल तेथे घोरतर युद्ध करून जय मिळवितात. व तुंबळ जागी निरुपाय असले ठिकाणी सुद्धा घोरपडीचे कंबरेस दोरी बांधून आत्मा देह हे क्षात्र धर्माकडे चित्त पुरवून हाल्ला करतात. सबब त्यास घोरपडे असे किताब, आबदागीरी वगैरे चिन्हे द्यावी असी योजना करून दिल्हे प्रमाणे हा काळ पर्यंत चालत आहे.

त्या मूळ पुरुषास स्त्रिया दोघी असोन जेष्ट स्त्रीस नऊ व कनीष्ट स्त्रीस सात पुत्र असले बद्दल नौकस व सातकस असी संज्ञा जाहली ती अद्याप पर्यंत चालत असोन घोरपडेचा चौकडे त्या पासून जाहला आहे.

आमचे यजमानाचे घराणेस नौकस असी संज्ञा सेनापतीकडे सनदा असलेस

असावे. शिवाय भुजंगराव आपासाहेब घोरपडे हिंदुराव याणी मराठी कानडी भाषेत कविता केली आहे त्याचे समाप्तीस नौकस भुजंग पद घालणेचे प्रमाण दिल्हे आहे व दुसरा प्रकार सदर नऊ पुत्र व सात पुत्र होते ते हल्ली युद्ध प्रसंगी खुशाल असोन परम धर्माने लढाई करीत त्यास पराक्रमाची विच्या. जसे सोने कसास लावून पाहतात तद्वत लढाईत कसोसीने पाहता नऊ असामीचा पराक्रम जाजती झाले कारणाने नौकस असे नांव आले. सातकस घराणेतील मुधोळकर व भादूरवाडीकर वगैरे असत, म्हणोन वाडवडील बोलत आले.

सदर नऊ पुत्रापैकी म्हाळोजीराव घोरपडे वंशातील बादशाहापाशी वजीर होते. त्यावेळी बादशाहानी असे मनात आणले की आपण गादीचे अधिकारी असता सर्व मुलुख आपले आज्ञेत असून आपले धर्मास व हिंदू धर्मास परम विरुद्ध असे. तेव्हा मोठे सरदार मानकरी मराठे आमचे पदरी आहेत (ते) आपले धर्म आचरतात हे गैर. आमचे धर्माप्रमाणे वांगणे विसी (त्याना) आज्ञा करून आपले ताब्याचे सर्व मुलकातील हिंदू धर्म दरोबस्त बुडवून त्यांचे देवस्थान वगैरेचे विध्वंस करून दरगावी मक्का मजीत बांधून आपले धर्माचा मोठा प्रसार करावा, असे आपले ज्ञातीचे पठाण उमराव यासी खलबत करून नियम ठरवून मुलकांत धामधुमी चालविले. म्हाळोजी राजे घोरपडे याणी, शहाजी राजे भोसले हेही बादशाहाचे सरदार, यास सदर सर्व मजकूर कळवून आप आपसात बोल्हन घेऊन विचार केला की, आम्ही हिंदु धर्माचे असून एकनिष्टपणाचे भाव ध्यानात आणावा. सर्व एक होऊन वर्णसंकर होणार. त्यापेक्षा आम्ही जन्म घेऊन काय फायदा जाहला ? धर्म राखावा, परधर्म भयावह, असे आमचे शास्त्रात सांगितले आहे. तेव्हा दोष आम्हावर नाही. जर बादशाहा वर्णाश्रमधर्माप्रमाणे प्रज्या वर्तवील, त्याची आज्ञा जर भंग करू तर मात्र दोष आहे. तसा प्रकार येथे काही राहिला नाही. आता आपला धर्म बुडवू नये हा निश्चय करून उभयतानी आपआपल्या फौजा तयार करून राज्य सरकारात (जर) हिंदुधर्म स्थापिणेचेमुळे यवन सरदार फौजेनिसी सन्मुख लढाईस येतील तर त्याचे पराभव लागलीच करीत.

शककर्ते सीवाजी यास राज्याभिषेक शके १५९६ साली (इ. स. १६७४) जाहल्यावर शक कर्ते सीवाजी महाराज यांचा पुत्र संभाजी महाराज याणीही मोठे घोर युद्धाचा प्रसंग तेथे यास पाठवित असत. तेव्हा आवरंगजेब बादशाहाचे मोठे लढाईत म्हाळोजी घोरपडे पडले.[1] तेव्हा संभाजी महाराज यास शत्रुने

धरून नेहले. तुळापूर मुक्कामी सीव जाहले. नंतर संभाजीराजे यांचे बंधू राजाराम महाराज यांचे आज्ञेवरून म्हाळोजी घोरपडे यांचे पुत्र वडील संताजी, दुसरे बहीर्जी व तिसरे मालोजी, याणी आपले फौजनिशी जाऊन आवरंगजेब बादशाहाचा मोड करून, त्याचे डेऱ्याचे तनाव तोडून, सोन्याचे कळस व सीके कट्यार त्रिवर्गानी आणून राजाराम महाराज विशाळगडास होते तेथे दिले. (ते) वेळी आनंदभरीत होऊन संताजी यास सेनापती, बहीरजी यास हिंदुराव व मालोजी यास अमीरुल उमराव असे किताब देवून बहुमानांची वस्त्रे दिली. नंतरही काही वेळ परशत्रूचे पराभव करून फौजही पुष्कळ बाळगून होते. असे परंपरा अैकीव माहिती आहे. कागदपत्राचा दाखला वडील सेनापतीचे दप्तरात असणेचे असतील.

२. बहीरजी घोरपडे हिंदुराव यांचे पुत्र सिदोजी हिंदुराव[२] हे अजानबाहू असून वरदी पुरुष होते. त्यास श्री सुब्रम्हण्य प्रसन्न असेत. नेहमी सर्प जवळ असत. दुसरेनी पाहीलेस मोठे भयंकर वाटे. परंतु त्यास मात्र काही भय नसता नित्य त्याची पूजा करून दुध पाजून नंतर भोजन करीत. याप्रमाणे प्रतिदिनी त्यांचा नियम व सर्वांचाही असा नियम की स्वारीत सुद्धा भोजनपूर्वीच दर्शन देऊन त्याचे अंगावर फिरून गुप्त होत असे. त्यापासून सनदा पत्रावर वगैरे सुब्रमणे म्हणोन करणेची चाल आहे. तो सुब्रमणी अलीकडे पांचचार पिढीपर्यंत म्हणजे दौलतराव साहेब ता. २४ जुलई सन १८६४ इसवीस काळ जाहलेचे कालकिर्दीपर्यंत आंगरखाचे बंदाप्रमाणे निघत आहे. ज्यावेळी निघेल तेव्हा जाळीचे डबेत मोगरेचे वगैरे सुगंध फुल व अबीर व अष्टगंध घालून त्यात ठेवून-पूजा-करून साखर वाटून ब्राम्हणास दक्षणा वगैरे देणेचा सांप्रदायाप्रमाणे करीत. ते अलीकडे गुप्त आहे. सीदोजीराव हे जिकडे लढाईस जातील तेथून यशच घेऊन येईत. महाराजांचा अंमल असीजे पर्यंत पन्नास साठ लक्षाचा मुलुख होता. जेथे अमल बसेल तेथे देवाची स्थापना करून ब्राम्हणास सनदापत्रे करून देहता. ते हल्ली करविरी इतर ठिकाणी चालीतात. हल्ली हिंदुराव किताब असून पुन्हा ममलकतमदार म्हणोन मिळविला.

३. सदर सीदोजीराव यास वडील पुत्र मुरारराव घोरपडे हिंदुराव व ममलकत मदार व दुसरे पुत्र भुजंगराव व तिसरे पुत्र दौलतराव. पैकी भुजंगराव पूर्व वयातच लढाईचे गर्दीतच आरत जाहले. बाकी दोघे बंधू जुमामर्द. त्याणी

कर्नाटकात, हैद्राबाद व त्रिचन्नापली, गुत्ती परयंत, ज्यास जसे साधेल तसे मुलुख काबीज करीत जाऊन, मुरारराव साहेब हे गुत्ती सोडून राकेड (?) म्हणजे श्री कार्तिक स्वामी सन्निध राहात होते. दौलतराव साहेब गजेंद्रगडी राहून दौलत आनभवीत होते. ते कालपरत्वे दोघा कडील मुलुख जात जात वडील मुरारराव यांजकडे सोंडूर संस्थान पाऊण लक्षाचे आदमासे राहिले व दौलतराव याजकडे तीन लक्षापैकी गजेंद्रगड संस्थान पंचविस हजाराचे आमचे यजमानाकडे असून करवीर इलाखेत महाल सरदेशमुखीचे वतन व इसाफती गाव मौजे सांगवडेसुद्धा आदमासे दहा हजार व सांगली इलाखेत वज्रचवंडे गांव इनामी व आजंन्नीतील मळा आदमासे तीनशे व हैद्राबाद मुलखापैकी चौथाईतील गांव ठाणे बहादर पिनी आदमासे हाजार रुपयेचे चालत आहे.

मूळ पुरुषा पासून मुरारराव व दौलतराव या पावेतो जुमामर्दीने मुलुख काबीज करीत आले त्या त्या ठिकाणी म्हणजे करवीर, बेळगांव, धारवाड, सोंडूर, गजेंद्रगड, गुत्ती, त्रिचनापल्ली व हैद्राबाद पर्यंत ब्राम्हणास सनदापत्रे दिल्या आन्वये गाव वगैरे उत्पन्न काही काही हल्ली पर्यंत चालत आहे. त्याचा दाखला जो मुलुख ज्याच्या आधिकारात आहे त्याचे दप्तरी खर्च पडत असलेचे समजते. कुरुंदवाड पूर्वी घोरपडेचे उपाद्ध्ये साबडे याजकडे असून अलीकडे कुरुंदवाडकर पटवर्धन याजकडे दिले तेथे कृष्णा तटाकास घाट बांधून त्यावर श्री शुब्रमण याचे देवालय व मुरारराव साहेब यांचे थडे असून त्याचा खर्च हल्ली चालत आहे व इचलकरंजीकर यास आजरे प्रांताचे देशमुखी वतन इकडून दिले असलेचे समजते

४. सदरहू बद्दल कागदपत्राचे दाखले पुष्कळ असून तूर्त मिळाले ते खाली लिहिले त्या प्रमाणे :–

१ श्री करवीर निवासनी महा लक्षुमी हे अनादी पुराण प्रसिद्ध असून यवनाचे धांदलीमुळे देवळांतून प्रतिमा काढून कपील तीर्था जवळ देवालयात गुप्त ठेविली होती. ती मूळप्रतिमा राजेश्री सीदोजी हिंदुराव याणी शके १६३७ सन १७१५ साली दसरेचे मुहूर्ताने स्थापना करून देवीची पूजा यथाप्रकार चालते करून स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याणकारक आहे व आपणासही श्रेयसकर आहे. व याहिपर किर्ती असे जाणवीले. स्थापना करून दिल्हे बद्दल शंभु छत्रपति याणी राज्य शके ५० साली वेदशास्त्रसंपन्न राजेश्री नरहर भट

सांगावकर यास अधिपत्य देऊन सनद दिल्हेची नक्कल या सोबत पाठविली आहे. याची अस्सल राजमान्य राजेश्री रावसाहेब प्रधान नि॥ श्री याजपासी असून सनदेप्रमाणे वहिवाट चालली आहे.

१ सदर श्रीचे देवालय जाग जागी पड होऊन सीकस्त जाहलेने दुरुस्ती बद्दल श्री शंकराच्यार्य स्वामी यास सदर घोरपडे हिंदुराव याणी आपले वतनाचे इसाफतीगाव मौजे बेलाली हा गांव सीष्य परंपरा चालणेचे करारानें शके १६४२ म्हणजे सन १७२० साली करून दिल्हे. लिंगायतस्वामी संस्थानाकडे चालत आहे ते अस्सल पत्र स्वामीकडे आहे.

१ घोरपडे नि॥ कामगार व अप्त राजेश्री नरसिंगराव निंबाळकर याणी राजेश्री व्यंकाजी बहीरव म्हणजे करवीरचे देशपांडेचे पूर्वजातील पुरुष यांचे नांव वतल राजेश्री माधवाच्यार्य घळसासी यास म्हावळुगे गावी तीन कुडव जमीन चालत असता ताम्र म्हणजे यवन्नाचे धांदलीमुळें देश सोडून गेल्याचे कारणाने चालत नाही ती चालविणे विसी सीत आसरे मया अलफ सन १७१५ इसवी साली सनद करून दिल्हेचे आसल हाली आनंताच्यार्य घळसासी याजकडे असोन जमीनही सर्रास वहिवाटीत आहे.

३ हारभट बिन कृष्णभट सावगावकर हाली आहेत त्याचे पूर्वजास

१ साबाजी शंकर सुभेदार याचे नावे हिंदुराव घोरपडे याणी समान तीसेन अलफ साली म्हणजे सन १६९७ इ. साली पुरुषोत्तमभट यास पाच व्हन वरषास करून दिल्हे बद्दल.

१. सांगवडे गावास सदर भटजीस दहा रुपये देणे विषई तीसा तीसेन आलफ म्हणजे सन १६९८ इ. साली वरात दिल्हे ते.

२ रामाजी हरी हावलदार याचे नावे संभाजी धारराव निंबाळकर ह घोरपडेचे कामगार याणीं कृष्णभट यास पांच खंडी भाताचे वरशासन आर्बे सलासन मयाअलफ सन १७३३ साली करून दिल्हे बद्दल, अेकूण तीन कागद भटजी-कडे असून यास हाल्ली उत्पन्न नक्त रुपये नऊ व गल्ला कैली· ॥१८१८३ हीकडून पावत आहे.

१ जिवाजी देवजी हावलदार यास ताकीद—त्रिंबकभट सीराळेकर यास पांच बिघे जमीन बेकलीगावी दिल्हे बद्दल सन असरे मया व अलफ सन १७०९

साली सनद करून दिल्हेची अस्सल गंगाबाई कोम दत्तंभट सिरालेकर याजकडे असून जमीन हल्ली चालत आहे.

१ बागलकोट तालुका असलेबद्दल तेथील सुभेदार व सरसुभेदार याचे नावे व॥ राजेश्री गंगाधरभट यास ५०० रुपये देणेवीसी राजेश्री दौलतराव साहेब यांची सन समान सलासन मया आलफ म्हणजे इ॥ सन १७३७ साली सीक्के मोर्तबी वरात दिल्हेची तालीक याची अस्सल आम्हाकडे आहे.

५ घोरपडेचे पुरुषानी मिळवून त्यांतून देणगी दिल्हेले जिकडे तिकडे फार करून चालू असून संस्थानाकडे जमाबंदी असेल त्यातही देवस्थान धर्मादाव खर्च कर्णेचा सांप्रदाय हा काळ पर्यंत आहे. तसे मानाने सदर तिसरे कलमांस नमूद केले ते उत्पन्न ३६३०० यात खर्च होत आहे.

येणे प्रमाणे हाकीकत कागद व माहिती वरून समजले प्रमाणे लिहिणेत आले आहे ता॥ २ दिजेंबर १८६७ इ॥

व्यंकाजी बहीरव नि॥ मालोजीराव घोरपडे हिंदुराव

---

१ संगमेश्वरी संभाजी महाराजांना मोगल सैन्याने पकडले त्या वेळी म्हाळोजी ठार झाले.

२ सिदोजी हिंदुराव घोरपडे हे कोल्हापूर राज्याचे पहिले सेनापती (करवीर रियासतः गर्गे पृ. ९१)

३ मुरारराव हैदर अलीच्या कैदेत कपाळदुर्ग येथे निधन पावले.

४ क व. इ. सा.: गुजर का. २, पृ. १२८,

## जप्तन मुलुक जाधव घराण्याची कैफियत

कै. नं. ४० / इ. स. १८५०

यादी निलकंटराव जाधव जप्तन मुलीक यांजकडून जाण्याचा सुमा इहीदे खमशेन मयातेन व आलफे सन १२६० फसली येसाजे. हुजूरुन नंबर ८४ तारीख २ माहे आगटंबर सन १८५० इसवीची यादी आलेत. आपल्या कडून वंशावळ आली. त्यात मूळ पुरुषापासोन आजपर्यंत किती पुरुष जहाले, त्यापैकी कोण कोणी किती किती दिवस पर्यंत काम केले, त्यांचे सन शक व ते मयत जहाले त्याचे सन शक सुद्धा समजावे लागते म्हणोन वगैरे लिहून आले वरून तपास करीतां असल जाहाला तो मजकूर खाली लिहीले प्रमाणे—

१. मूळ पुरुष रखोजी बीन नरसोजीराव जाधव यानी कैलासवासी श्री मन्महाराज शंभु छत्रपती साहेब सरकार करवीर यांचे शेवा एकनिष्टपणे करीत असता महाराज कृपाळू होऊन इनाम स्वास्त करून दिले ते ७।। कृ।। करवीर येथे जमीन बीघे तीस पैकी भाऊ हिशेस जाऊन बाकी तक्षीम आम्हाकडे........ प्र।।. राजारामसाहेब व शिवाजी राजे महाराज चंदी प्रांती असतां बहुत शेवा केली. सबब राज शक ४७ साली[1] इनामे देऊन सनदा दिल्या आहेत.

१०० जकायत करवीर येथे दरबोली यक पैसा प्र।। राजशक ४७

७४३।। मौजे काडगांव तालुके प्रों राजशक ५७ सालीं जरुर........ पदुस्तर कुरण सुद्धां दरोबस्तगांव इनाम

५ मौजे बालींग तर्फ हवेली येथील अव्वल कुरण पै।। भाऊ वतणी वजा जाऊन बाकी गवत अदमास ५००० दर १००० प्रो रुपये अजमास १३०

---

८५६ एकूण

येणेप्रमाणें संपादन करुन बहुतेक दिवस सरकारचे कामकाजाचे उपयोगी पडोन शेवा चाकरी केली ते कधी मृत्यु पावले त्याचे शक सन लागत नाहीं. त्यामुळे मुक्रर साल नमूद करीता येत नाही. पण त्यानीं अदमास २४ वर्षे कालकिर्द भोगली आसे ऐकण्यात आहे. त्यास पुत्र पाच होते त्याचा तपशील खाली दुसरे कलमी लिहीला आहे.

कलम

२. पहीले आबाजीराव, दुसरे शिवाजीराव, तिसरे सुभानजीराव, चवथे कृष्णाजीराव, पाचवे नरोजीराव असे पाच पुत्र होते. त्यानीही सरकारची शेवा चाकरी करुन विश्वासुपणात वागत होते. ते कधी मृत पावले त्याचे साल शक लागत नसोन सदरपैकी आबाजीराव यानी पंधरा १५ वर्षे कारकिर्द भोगली अशी माहीती मिळते.

कलम

३. दुसरे कलमी वडील आबाजीराव लिहीले त्यास पुत्र वडील नरसोजीराव, दुसरे सुलतानराव, तीसरे नरोजीराव, चवथे जानराव, असे चौघे पुत्र असोन, दुसरे सुलतानराव यानी सरकारची शेवा चाकरी करुन लोभात वागत असत. जंजीरा शिंदूदुर्ग येथे यशवंतराव शिंदे सुभेदार याजबराबर हुजूरुन नेमीले. तेव्हा सुभेदार याजवरी मोठा प्रसंग गुदरला. त्यावक्ती सुलतानजीराव याणी मोठी मर्दुमी करुन सुभेदार यास काही तोसीस लागू न देता किला सांभाळून सरकारचे मनोगतानुरुप चाकरी केलेली सर्व······सुभेदार यानी राहीले········ वापीत केलेवरुन सरकारास मोठा संतोष होऊन सामील करुन जोडून किले मजकूरचा मामला सांगीतला आनी स्वास्थ करुन दिले त्याचा तपशील खाली—

२७२।२ मौजे मोरेवाडी ता. खानापूर
सुद्धां दरोबस्त गांव संभू छत्रपती[२] महाराज यांनी राजशक १०४ चे साली ईनाम करुन देऊन सनदा दिल्या आहेत.

१० मौजे वालींगे येथे जमीन बीघे १० महाराज यानी इनाम करून दिल्हे. यास आदमासे ८५ वर्षे होतील. त्यापैकी भाऊ वाटणी जाऊन हल्ली आम्हाकडे दर ४ रुपये प्रमाणे प्रतीचा

---

२८२।२ चालत आहे.

कलम

येणे प्रमाणें संपादन केले आणि मामलेचे काम करीत असता श्री बालकृष्णाची मूर्ती यक पीतळेची किले मजकूरी त्यास सापडली. ती त्यानी आणोन सरकारास देताच तेच समई मुर्ती परत देऊन श्रीचा उछाव गोकूळ

आष्टमीचा प्रती वर्षी करीत जावे, त्याचे खर्चाबाबत सरकारातून प्रती वर्षी सहाशे ६०० रुपये दिल्हे जातील, अशी आज्ञा होऊन पहीले वर्षी रोख रुपये देवीले. पुढे मामले निहाय कोणते तरी मामलेकडे खर्च घालून देणेची वहीवाट असता अलीकडे कैलासवासी बावासाहेब महाराज यानी किले मनोहरचे बेहडेस घालून देऊन सालास किल्ले मजकूरा कडूनच रुपये देवीत होते. ते मृत पावले पासून दिवाणसाहेब महाराज यांनी अपले कालकिर्दीस वंद केले. पण पूर्वीपासून चालत आले अन्वये आज पावेतो श्रीचा उछाह सतत चालत आहे. सुलतानराव हे कधी मृत पावले त्याचे सन शक लागत नाहीं. पण त्यानीं अदमास वीस २० वर्षे कालकिर्द भोगली असावी. तसेच त्यांचे तीघे बंधुही एकत्र असोन सरकारची शेवा चाकरी करून मृत पावले. त्यांचे शक सन लागत नसोन त्यानी आपले नाव कधी संपादन केलेचा दाखला नाहीं. सबब कालकिर्द समजत नाहीं—

४. तीसरे कलमी सुलतानजीराव लिहीले त्यास वडील पुत्र रायाजीराव, दुसरे हिंदूराव असे दोघे होते. पैकी वडील रायाजीराव यानी आपले वडील असताच लहानपणीच सरकारची स्वारी पनाळे मुकामीं किलेवरी असता तेथें बहुतेक प्रकारे शेवा करुन श्रीमन्महाराज राजे छत्रपती शिवाजीराजे यांची मर्जी संपादण करुन लोभात वागू लागले. तेव्हा सरकारचा विश्वास त्याजवरी बसून खासगी कोतवाल पागेचा कारखाना पहाणेस आज्ञा जहाली. नंतर स्वारी करवीरी आलेवरी आणखी जाजती घोडी याचे ताबेत देऊन हजार बाराशे राऊत नेमून त्याची सरदारी सांगोन जेथे बलकुबल पडेल तेथे येकादे वेळे स्वता, येकादे स्वारीस रत्नाकरपंत राजाज्ञे याजबराबर पाठऊ लागले. त्या काली मोठमोठे प्रसंगी कर्नाटक प्रांती व फत्तेसींग माने बंड होळकराकडील वडगांवावरी मारुन पाच चारशे आदमास घोडा पाडाव करुन आणीले. इत्यादी बहुतेक स्वाऱ्या मोठ्या शूरत्वाने करीत असंता पूर्वी सरनोबतीचा किताबत देऊन पुढे कर्नाटकहून परत आलेवरी याणी मरदुमी करुन सरकार चाकरीवरी कोठे पराक्रम करुन काम काजाचे उपयोगी पडीले. सर्व सरकारास श्रुत होताच सरकार कृपाळू होऊन स्वामी काजास पडले. बाबत सन सबा तिसेन मयातेन व ,आलफे सालीं जप्तन मुल्क असा किताब दिला. त्यास आदमासे ५४ वर्षे जाहाली. नंतर शिदोजीराव देसाई निपाणकर याचा व महाराजांचा द्वेष पडोन सावगावावर लढाई जहाले

वक्ती अखेर मोड होऊन स्वारी परतले वेळीं फौजेत मोठा दंगा होऊन युद्धाचा बिघाड होऊन फौज फुटून जाता महाराजांची स्वारी घोड्यावरुन येताना बरोबर जप्तन मुलुक होते. त्या प्रसंगी मार्गावरचे अडचणीत सरकारचा घोडा फसून पडला. तेव्हा जप्तन मुलूक याणी महाराजास आपले घोड्यावरी घेऊन येत असता बराबरचे हुजरेपैकी यकास धका लागून पडला. त्याचे हातात नंगी तरवार होती ती महाराज व जप्तन मुलुक ज्या घोड्यावर बसले होते त्याचें पायास लागून घोड्याच्या पायाच्या शिरा तुटल्यावर घोडा लटका पडला. सबब तो घोडा ठेऊन दुसरा घोडा सुलतानजी मान्या बारगीर हुजूर पागेतील राऊत होता त्याचा घोडा घेऊन पुन्हा स्वार होऊन महाराजास पाठीसी घेऊन येका घोड्यावरून मोठ्या जुरतीने आपले बराबरी मंडळीस सांभाळून यळगुड मुक्रामास येऊन तेथे पालकी वगैरे सरंजाम आपले स्वार पाठऊन आवरून महाराजास काही इजा होऊ न देता स्वपराक्रमानें बचाव करून करवीरास आले.[३] असे कितेक काम काजे केली त्यास सरकार कृपाळू होऊन स्वास्त इनाम सरंजाम करून दिले ते--

३४५॥ मौजे सांगवड येथें वतन नावीकीचे सन सबा तीसेन मयातेन आलफे सालीं करून दिली त्यास अदमास ५५ वर्षे होतील. सदर

१५० गांवी जमीन बीघे ३० सन सबा तीसेन साली त्यास वर्षे ५५

६० मौजे कलंब तर्फ ठाण येथे इनाम जमींन बीघे ८१० दिली. त्यास अदमास वर्षे ६५

१०० मौजे बालींग तर्फ हवेली येथे जमीन रू ७५ कुरण २५ आकार वर्षे ६०

१०० मौजे उचगाव येथे जमीन बीघे ८२० दिली त्यास वर्षे अदमास ५२

६० मौजे मुसरीगी येथे बीघे ८११ त्यास वर्षे अदमास ६३

४५ क॥ वडगांव येथे जमीन बीघे ८९ सुमार वर्षे ४७

३५ मौजे चिचवाड येथे जमीन बीघे ८५ सुमार वर्षे ६०

३५ मौजे शहापूर येथे जमीन बीघे ८५ वर्षे अदमास ४५

४० हातकनंगल व तील व तीलवणीचे शिवची जमीन बीघे १० वर्षे ५५

१५ क॥ करवीर येथें जमीन वानोटेबाबत डाग बीघे ८५ वर्षे ४५
२४ मौजे सोलांकुर ता॥ तारळ येथे जमीन बीघे ८४ किल्लेदारी बाबत वर्षे ६५
५० मौजे उचगांव येथें कुरण दिलेस अदमास वर्ष ६५ गत्रताची बेरीज आकार
४९२ पेट शिवापूर उर्फ शनिवार क॥ करवीर हे........ईनाम प्राचीन आदमास वर्षे ६०
३५० वाडी उजळाई दरोबस्त इनाम प्राचीन बहुत दिवसाची. त्याचे शक सन लागत नाही.
१०० वाडी टेंबलाई सदर प्रमाणे

२००१॥

येणे प्रमाणे संपादन करुन त्यानी आपलेस ३७ चाळीस वर्षे आपले कालकीर्दीस सेवा करून सन तीसा आशर साली मृत पावले. तसेंच त्यांचे बंधु हिंदूराव ही मृत पावले. त्याचे सन शक लागत नाही.

५. चवथे कलमातील रायाजीराव जाधव जप्तनमुल्क यांस पुत्र वडील गोपाळराव, दुसरे आबाजीराव, तीसरे दौलतराव असे तिघे होते. पैकी वडील गोपाळराव यांस जप्तन मुलुक असीताच सरनोबतीचा किताब सरकारातून देऊन जप्तन मुल्क यानी पागेचे काम स्वाधीन केले, त्यानी सरकार हुकूमाप्रमाणे पागेचे काम करीत असता जप्तन मुल्क होते तो सन सबा आशर साली मृत पावले.

१ दुसरे आबाजीराव आमचे ति॥ यांस कैलासवासी बावासाहेब महाराज यांचे कालकीर्दीस जप्तन्न मुलकीची वस्त्रे दिली. त्यानीही सरकारचे मर्जीनरुप महाराजांचे आज्ञेप्रमाणे शेवा चाकरी केले कारणाने स्वामी कृपाळू होऊन सरकारातून इनाम संरजाम करून दिलेचा तपशील—

० क॥ कबूर इलाखा चिकोडी हा दिलेला पांच साल आम्हाकडे होता. नंतर चिकोडी तालुका इंग्रज सरकारात सन १२३७ फसली साली गेला. त्या कारणाने जप्त जहाला सबब—

५० क॥ आळते येथे जमीन बीघे ८६ सुमा इसने अशीरीन मयातेन व आलफे साली दिले त्यास वर्ष आदमास तीस ३०

३० मौजे बावडे तर्फ हवेली येथे जमीन बीघे ८१० सन तीसान मयातेन व आलफे साली मीळाली त्यास वर्षे अदमासे ६२

५३५॥≈ मौजे परखदेल तर्फ कळे हा गांव दरोबस्त इनाम सन समान आशरीन मयातेन व आलफे साली दिला त्यास वर्षे २४ जाहली.

८६४॥≈ मौजे सोलांकूर तर्फ तारळे हा गांव जप्ती गल्ला उमरसुद्धां दरोबस्त इनाम सन सलास सलासीन साली त्यांस वर्षे २३

८०९ मौजे गुडाळ ता॥ तारळ हा गांव सदर सालीं सदरहू प्रमाणे दरोबस्त इनाम

२२८९।०

येणेप्रमाणे संपादन करून आमचे तीर्थरूप यानीं सरकारची शेवा अदमासे २३ वर्षे केली. ते सन आरबेन मयातेन व आलफे साली मृत पावले नंतर दुसरे सालीं आम्हास हुजूरून जप्तनमुलुक कीताब दिला. वडीलाचे अलीकडे आम्ही आदमासे ११ वर्षे सरकारची शेवा चाकरी करीत आलो. आम्हास पुत्र एक सुलतानराव आहेत.

२ सदर पाचवे कलमी आवल आमचे वडील चुलते गोपाळराव म्हणजे लिहीले त्यांचे पुत्र सयाजीराव त्यांस सरकारनी सरनोबतीचा किताब देऊन पागेचे काम व शिरोळ मामलेची वहीवाट सांगोन मौजे अर्जुनवाड या गांवी जमीन बीघे ४० इनाम करून दिली. सन आरब सलासीन साली शिरोळचे बेहेडेस खर्ची घालून दिलेप्रमाणे चालत असोन अलीकडे सनद नसले करीता अमानत आहेत. सन खमास सलासीन साली मयत जाहाले. त्यांचे पुत्र माधवराव यासी सरकारातून सरनोबतीचा किताब दिलेस हल्ली सरकारची चाकरी करीतच आहेत.

३ तीसरे दौलतराव आमचे चुलते सरकार चाकरी करीत होते. ते खमास आशरीन साली मृत पावले. त्यांचे पुत्र हाल्ली गोपाळराव हे सरकार शेवा करीतच आहेत.

येणें प्रमाणें सदरी पांच कलमी लिहीले अन्वये स्वास्त संपादन जाहले बाबत कैफीयत दिलेल्या बीत तपशील

२२३९।० जप्तन मुलकीं बाबत आमचे नांव चालत आहे

३२१९॥≈ सरनोबती बदल रायाजीराव जाधव सरनोबत यांचे नांवे

कैफीयतीत दाखल जाहले प्रो.
२८६२॥। नक्त रुपये, १७६ गलेबाबत
१७० कुरणाबाबत

---

५४२९८=

एकूण पांच हजार चारशे एकूणतीस रुपये दोन आणे हे उत्पन्न मिळाले पासोन सतत आम्हाकडे चालत आहे. तारीख १ माहे नवंबर सन १८५० इसवी साधारण नाम संवत्सरे शके १७७२ दाखल तारीख २ नवंबर सन १८५०

निळकंठराव जाधव जसन मुलीक

---

१ इ. स. १७२१

२ या ठिकाणी शिवछत्रपती असें हवे किंवा हा शक चुकला असावा. शंभू छत्रपती १७६० सालीच निधन पावले.

३ करवीर रियासतः गर्गे, पृ. २८८



## निंबाळकर सरनोबत घराण्याची कैफियत

कैफियत नं. १२०/इ. १८४७

कैफियत दौलतराव बीन रघुनाथराव निंबाळकर सरनोबत उमर वर्षे सुमारे ३३ जात मराठे राहाणार शहर करवीर, सुमा सबा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलिटिकल एजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून अंक ६५ सन १८४५ ईसवीची यादी आली. त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या लोकांजवळचे सनदापत्र पाहुन कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी याचे नांव डेरी आंक ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला. त्याजवरुन सनदापत्र असतील ते दाखवणे म्हणून आज्ञा त्यास आम्हाकडे वतनी ईनाम वगैरे चालत आहे त्याजबद्दल खाली लिहिले प्रो. सनदापत्र वगैरे मिळाले ते हजर करून माहीतगारीचा मजकूर लिहुन देतो तपशील—

(१) हल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील—
संपादक आमचे आजे स्वामीकार्यावर खर्च जाहाले करितां आमचे वडील रघुनाथ रावजी निंबाळकर सरनोबत यासी पुत्रपौत्रादी वंशपरंपरे अनभव करणे म्हणून करार करून ईनाम करून दिले ते—

३०२ जमीनी बाबत भागात वगैरे उत्पन्न येत आहे ते २० मौजे कोगे ता। हवेली येथे जमीन बिघे ८५ घराऊ वहिवाटीस आहे त्याचे उत्पन्न पेशजी येत होती ती बेरीज रुपये २५ प्रे॥ कमी लावणीमुळे व नापीक जाहाले अशा कारणामुळे कमी रुपये ५ बाकी उत्पन्न साल मजकुरी गला भात १ दरमणी रुपये १ प्रमाणें एकूण रुपये

१५ मौजे मणेरी येथे जमीन बिघे ८५ भागाने लागण केली आहे त्याचे उत्पन्न गल्ला खं १॥ पो निम्मा वजा जाता बाकी गल्ला खंडी ·॥· दरमणी रुपया १ प्रमाणें येकूण

१५ मौजे सडोली येथे जमीन बिघे ८५ पो उत्पन्न पेशजी येत होती ती बेरीज रुपये ३० पैकी जमीन ८२ गावकर यानी घेतली आहे त्याजबद्दल गावकर याजवरहि खटला चालू करणे आहे. त्या जमीनीबद्दल व लावणी कमतरीमुळें कमी रुपये १५ बाकी गल्ला साल मजकुरी भागोन आला तो ·॥· दरमणी रुपया १ प्रो येकूण

२४ मौजे म्हये तो हवेली येथे जमीन बिघे ८५ भागाने लागण केली आहे त्याचे उत्पन्न पेशजी रुपये २७ येत होते पो लावणीमुळे कमी रुपये ३ बाकी रुपये

१५ गला १॥ खंडी पो भागी ·॥· दरमणी रु. १ प्रो बाकी गल्ला निम्मा एकूण रूो पंधरा, ९ बिघावणीबद्दल

२३ मौजे कोपर्डे ता॥ हवेली येथे जमीन बिघे ८५ त्याचे उत्पन्न पेशजी येत होते तिची बेरीज हाल्ली येत असे ती.

१३ गल्ला खंडी १।१ निम्मा भागी ·॥३ बाकी

·॥३ दर १ प्रमाणे एकूण

१० बिघावणी बद्दल

१७० मौजे पारगाव काा वडगांव येथे जमीन बिघे ८१७ पो उत्पन्न

८० काळीं जमीन ८१०· दर ८ प्रमाणें पेशजी येत होती ती बेरीज तसेच हल्ली उत्पन्न येते.

९० बागायत जमीन बिघे ८७ पेशजी उत्पन्न येत होती ती बेरीज रुपये १२८ पैकी कमी लावणीमुळे ३८ बाकी रुपये

३० मौजे हातकणंगले येथे जमीन बिघे ८१० पेशजी उत्पन्न बेरीज रुपये ४० प्रे॥ लावणीमुळे कमी रुपये १० हल्ली जमीन घराऊ वहिवाटीस केली आहे. पो उत्पन्न बेरीज जोरी ·॥· दरमणी रुपये २ प्रो एकूण

५ का। करवीर येथे रंकाळे जमीन खंड बिघा ८॥· त्याचा खंड पेशजी प्रो

४२३ मौजे कलनाकवाडी ता। खानापुर हा गाव ईनाम त्याचे उत्पन्न साल मजकूरी आले ते—

३५० रोख रुपये पेशजी गाव चालु प्रो बेरीज, रुपये ४७५ पैकी गावकर सनदी रुपये ५ व श्री भैरव भुदरगड १ एकूण साहा रुपये वजा जाता बाकी येणे रुपये ४६१ परंतू लावणी होवून सदरहु रकम येत नाही. हल्ली उत्पन्न येते ती बेरीज रुपये ३५६ पो खर्च ६ बाकी

३० गल्ला पेशजी येणे बेरीज २॥। पो लागण मुळे कमी खंडी १। बाकी गल्ला १॥ दरमणीं रुपये १ प्रो.

३७ जमीन घरी मळी आहे त्याचे उत्पन्न

२० पिवळ शेत बिघे ८२ पो गल्ला खंडी १ येकूण रुपये

१७ बाद डोंगर रान आदमासे दाहा बिघे ८१० पो उत्पन्न

६ कुरण मळी जमीन बिघे ८२ पो गवत सुो ६००० सहा हजार दर हजारी रुपये १ प्रो येकूण

४२३ पेशजीची बेरीज ५५९

० वडील आमचे रघुनाथराव यांसी जखमा फार लागल्यामुळें घोड्यावर बसण्यास येत नाही असे जाहाले वरुन सरकारानी बसणेस पालखी दिली त्या खर्चाबद्दल भुदरगडाकडून रुपये ३०० मिळत होते ते आरबा आरबेन पासून मिळत नाही अलीकडे आमचे नांव पुत्रपौत्रादि वंशपरंपरे म्हणोन ईनाम करुन दिले ते

१२० मौजे पारगांव का॥ व वडगांव येथे जमीन बिघे

८२५ पेशजी उत्पन्न बेरीज १६०

६० मळा जमीन ८५ येकूण रुपये

६० काळी जमीन ८२० दर ३ प्रो येकूण रुपये

१५० मौजे कोगे येथे जमीन बिघे ८२० पो पेशजी उत्पन्न बेरीज १९३/- पौ कमी रुपये ४३।- उत्पन्न होत नाही. सबब बाकी बेरीज रुपये

१०० गल्ला खंडी ५॥ पो कमी ·॥· बाकी ५
दर खंडीस रुपये २० प्रो येकूण रुपये
५० नक्त खंड रुपये ८३। पो कमी रुपये ३३/- वजा जाता बाकी
२० मौजे कलनाकवाडी येथे जमीन आबदागिरी ब॥ बिघे
८५ पो उत्पन्न गल्ला येक खंडी १ येकूण रुपये
१५ मौजे म्हसबे तो खानापुर येथे आबदागिरी ब॥ जमीन
बिघे ८५ पो उत्पन्न गला केली १॥ पो वजा जाता ·।॥·
बाकी गल्ला केली ·।॥· येकूण रुपये

पेशजी उत्पन्न बेरीज १६२०/- येकूण दाहाशेहे सवा तीस रुपये साल मजकुरी आले सदरी जमा हल्ली येती ती घालुन पोटी बेरीज पेशजीचे उत्पन्नाची दाखविली आहे. हाल्ली उत्पन्न लिहिले त्यास साल दरसाल लागणीमुळे कमिजास्त व पीक नाही यामुळे कमिजास्त होत असते.

(२) सदरहु उत्पन्न संपादन कोणी केले व कशाकरितां दिले व दिल्यापासून वहिवाट कशी चालत आली याचा तपशील खाली लिहिलेप्रमाणें—

१. कैलासवासी शिवछत्रपती सो माहाराज यानी आमचे तीर्थरुपास दिले ते

१. आमचे आजे नाईकजी निंबाळकर बीन शाबाजी निंबाळकर सरनोबत कोगनोलीचे स्वामी खर्च जाहाले सबब पंचवीस बिघे जमीन पाची गावांत म्हणून ईनाम करार करून दिल्या त्या सनदा कंपुचे दंग्यात गहाळ जाहालेमुळे सन व शक लागत नाही परंतु पाऊणशेहे वर्षे जाहाली. जमीन दिली ती गावें—
८५ मौजे कोगे ८५ मौजे मणेरी ८५ मौजे म्हये ८५ मौजे सडोली ८५ मौजे कोपर्डे

२. आमचे वडील रघुनाथराव नींबाळकर सरनोबत सावनुरचे लढाईत जखमी होवून डोकीची कवची फुटोन उडोन गेले असतां मौजे कलनाकवाडी हा गांव बक्षीसीबद्दल ईनाम करार करून दिला आणि सनदा दिल्या. त्या सनदा कंपुचे दंग्यात गाहाळ जाहाल्यामुळे सन व शक लागत नाही परंतू पन्नास वर्षे सुमारे जाहाली.

३. सरकारांची स्वारी कोकणात गेली, तिकडे दंगा जाहाल्यात आमचे वडील रघुनाथराव यासी जखमा लागल्या सबब पारगावात जमीन बिघे ८१० अशा सनदा सदरहू दंगेत गाहाळ झाल्यामुळे सन व शक लागत नाही परंतु सुमारे ४७ वर्षे जाहाली.

कैलासवासी बावासाहेब माहाराज छत्रपती यांनी दिले ते—

१. आमचे वडील रघुनाथराव यासी कैलासवासी शिवछत्रपती सो यांनी कुरुंदवाडाजवळ लढाई झाले वेळी जमीन देणेचे वचन दिले होते त्याबद्दल मौजे पारगावांत जमीन बागाईत ८७ सन आरबा आशरीन साली सन इंग्रजी १८२३ साली दिली त्यास सुमारे चोवीस वर्षे झाली.

आमचे नावे मिळाले ते—

१. मौजे पारगांव येथे जमीन बिघे ८२५ व मौजे कोगे येथे जमीन बिघे ८२० अशी पंचेचाळीस बिघे जमीन सेवेबद्दल करार करून दिली सन सबा सलासीन साली ईंग्रजी सन १८३५

२. अबदागिरीबद्दल जमीन बिघे ८१० मौजे कोगे येथे सन तिसा सलासीन साली देवून सनदा करून दिली होती. पुढे एक वर्ष अनुभव केला पुढे बावासाहेब माहाराज यांचा काल जाहालेवर रामराव आकबरनीवीस यानी सदरहू जमीन अबा खासगीदार कारकून यांची वतनी म्हणोन त्यांची त्यास देवून त्याऐवजी मोबदला आम्हास मौजे म्हसे व ता। खानापुर येथे बिघे ८५ व मौजे कलनाकवाडी येथे जमीन बिघे ८५ अशी दाहा बिघे जमीन रामराव आखबरनीस याने मोबदला दिली.

एकूण कालकीर्द २ दोन

सदरी उत्पन्न छत्रपती साहेब माहाराज यानी दिले ते पुत्र पौत्रादी वंशपरंपरे आनुभव करणे म्हणोन दिले आहे.

( ३ ) पहिले कलमीं लिहिले उत्पन्न आमचे वडील रघुनाथराव यांचे नांवे व आमचे नावे मिळाले.

(४) वडिलांचे नावे उत्पन्न त्यास चाकरी करणारे चिरंजीव राजेश्री आबाजीराव निंबाळकर त्यास हिस्सेदार आम्ही नऊ आसामी बंधु आहो ते नांवे खाली लिहिलेप्रमाणे—

१ आप्पाजीराव निंबाळकर यांची स्त्री
२ हिंदुराव निंबाळकर
३ ईश्वरराव निंबाळकर
४ आबाजीराव निंबाळकर
५ नारायणराव निंबाळकर
६ तात्याजीराव निंबाळकर
७ बळवंतराव निंबाळकर
८ तुकोजीराव निंबाळकर
९ आम्ही खुद्द.

एकूण आसामी नऊ ९

आमचे नावे उत्पन्न त्यास आमचे आम्ही चाकरी करणार.

(५) सदरहु उत्पन्न पहिले कलमी लिहिल्यात पेशजी येत होती ती बेरीज पोटी लिहून हल्ली उत्पन्न साल मजकुरी आली ती बेरीज सदरी लिहिली आहे. परंतु उत्पन्न साल दरसाल पर्जन्य न लागलेमुळे व लागण कमिजास्त होती या कारणाने उत्पन्न कमजास्त होत असते. सदरी लिहिले उत्पन्नाशिवाय करवीर ईलाखेत उत्पन्न नाही व चवथे कलमास सनदा पत्रें लिहिले आहेत त्याशिवाय आम्हापासी—

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न वगैरे मजकूर लिहून दिला आहे त्यांत काही कंपेश जाहलेस सरकार आज्ञा करतील ती आम्हास मान्य आहे.

एकूण सहा कलमें लिहून दिले सही छ १९ माहे जमादिलाखर सन १७६९ तारीख ४ माहे जुन सन १८४७ ईसवी हस्तअक्षर मल्हार कृष्ण गर्दे कारकून

सही

दौलतराव निंबाळकर सरनोबत

साक्ष दस्तुर खुद्द

१ वासुदेव गंगाधर शेवडे नी। लष्कर

१ रघुनाथराव बाजी रेणावीकर

( सही ) विनायक रघुनाथ काळे काम पाहाणार

" प्रश्न तारीख मजकूर "

आबदागिरीबद्दल म्हणोन मौजे कलनाकवाडी बिघे ८५ व मौजे म्हसवे ८५ मिळोन दाहा बिध्यास दुसरे कलमी तपशील लिहून चौथे कलमी सनदा चार ४ हजर करितो त्या पाहाता आबदागिरीबद्दल म्हणोन सनदेत नाही सेवेबद्दल आहे. व सदरी पहिले कलमी मौजे कोगे येथील ८१० चे उत्पन्न दाखल न करितां चौथे कलमी मौजे कोगे या गावची आबदागिरीबद्दल सनद दाखल करिता हे कसे जमीन कशी चालत आहे कीं नाही यातील मजकूर कसा असेल तो लिहिणे—

" उत्तर "

कैलासवासी बावासाहेब छत्रपती तुळजापुरी जाते वक्ती आम्हांस सरकारातून आबदागिरी देवून त्याचे खर्चाबद्दल मौजे कोगे तर्फ हवेली येथे विठ्ठल सदाशीव कारकून यांचे........असामी बा॥ जप्तीस जमीन होती ती बिघे ८१० पुत्र पौत्रादी वंशपरंपरेने आम्हांस देवून सन तीसा सलासीन मया तेन आलफ छ २६ माहे साबानची सनद करून दिली. पुढे माहाराजांचा काळ जाहाल्यावर सर कारकून यानी कारभारी रामराव वकील यास कळवून आपली जमीन वतनी आपल्यास मिळावी म्हणोन कळविल्यावरून सरकारातुन सदरी कोगे येथील जमीन जबरीने विठ्ठल सदाशीव यास देवून त्यांचे बदला सदरी पहिले कलमी लिहिलेले मौजे कलनाकवाडी बिघे ५ व मौजे म्हसवे ५ मिळोन बिघे दहा आम्हांस आबदागिरीबद्दल म्हणोन दिली त्या प्रमाणे सनदेत कां लिहून दिले नाही. हे आम्हास समजले नाहीं. सेवेबद्दल म्हणोन नमूद केले आहे. आम्हास आबदागिरी बद्दल दहा बिघे जमीन माहाराजानी दिली तितकीच मोबदला जमीन आम्हास मिळाली म्हणून कैफियतीचे दुसरे व चौथे कलमी आबदागिरीची सबब लावून दाखल्यास नक्कल दिली आहे. त्या सनदेतील जमीन आम्हाकडे चालत नाही. मोबदला केली ती कारकीर्द दिवाणसाहेब माहाराजाची आहे.

याशिवाय पहिले कलमी लिहिले उत्पन्नाचा फेर मोबदला जाहाला नाहीं. दिल्याप्रमाणें सतत वहिवाट चालत आहे हे लिहून दिले

सही तारीख ४ माहे जून सन १८४७ ईसवी

साक्ष दौलतराव निंबाळकर सरनोबत दस्तुर खुद्द

१ आप्पाजी आबाजीराव ईनामदार आलुरकर
नि।। हिंमत बाहाद्दर द. खुद

१ वासुदेव नी।। लष्कर

विनायक रघुनाथ काळे काम पाहणार

तारीख २५ माहे जून सन १८४७ ईसवी

" प्रश्न "

मौजे कोपर्डे कर्यात हवेली येथे लागवड जमीन दुपीकी बिघे ८५ तुमचे वडील राघोजी बीन नाईकजी निंबाळकर सरनोबत यास कोट कोल्हापुराकडून सन आशर मयातेन व आलफ छ २९ माहे जमादिलावल रोजची ताकीद मौजे मजकूरचे नांवे मिळाली त्या ताकीदीचे श्रीजवळ शंभु असे निशाण असून अखेरीस दुसरे ताकीदी सारखे मोर्तबासुद ही अक्षरे न लिहितां जागा सोडून पुढे मोर्तबा केले आहे याजवरुन ही सनद पुरती न होता मिळाली किंवा कसें ?

" उत्तर "

आमचे आजे सरकार कामावर खर्च जाहले असतां आमच्या वडिलांस.... बद्दल जमीन खून काटाची ईनाम करुन दिली त्या पो। सदरी मौजे मजकुरची जमीन आहे. त्या जमीनीच्या कोट करवीरच्या ताकीदीवर मोर्तबासुद ही अक्षरे न लिहितां जागा सोडून पुढे मोर्तबा केले. हे असे कां जाहाले हे आम्हास माहीत नाहीं. परंतु या ताकीदीच्या सिरावर श्रीचे नजीक शंभु हे निशाण व शिक्का काटेचा आहे व या ताकीदीचे पुराव्यास सन ईहिदे आशर मयातेन व आलफ छ १० साबान रोजी दुसरी ताकीद मिळाली तीही हजर आहे. तेव्हां वरील सनदेस जागा सोडीली ती चुकून मोर्तबासुद म्हणणे राहिले असावे असे वाटते. ती माहीती आम्हास पुरी नाही. आमचे तीर्थरुप साल्गु।। फाल्गुन शु।। १३ शके १७६७ विश्वासु संवत्सरी वारले. आतां आम्हांस माहीती सांगणारे कोणी नाहीं. होता तो मजकूर लिहिला आहे.

तां। सन मजकूर सही

साक्ष दौलतराव निंबाळकर सरनोबत

१ जिवाजी यशवंत फडणीस
कोतवाल पागा.

## पंडितराव घराण्याची कैफियत

कैफियत नं. १३ / इ. स. १८४५

कैफियत गोपाळाचार्य बीन माधवाचार्य पंडीतराव उमर वर्षे ४६ जात देशस्थ ब्राह्मण कसब वेदशास्त्र जाणणे राहाणार क्षेत्र करवीर, सुमा सित आर्बेन मयातेन व आलफे. मेहरबान पोलिटीकल येजंट साहेब बहाद्दूर प्रान्त कर्नाटक याजकडून आख ६६ सन १८४५ इसवीची यादी आली. त्यांत इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांचे जवळच्या सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर आख ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाला. त्याज वरून सनदा पत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्याजवरुन आहेत ती सनदा पत्रें हजर करून सनदा प्रकर्णी माहीतगारीचा मजकूर लेहून देतो तो खाली लिहील्या प्रमाणें.

( १ ) आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

१ मौजे मोघई ता तारळ येकून देह एक, एकून आकार आजमास बावती वगैरे वजा जाऊन उत्पन्न येते ते

१० नक्त रुो ६ गल्ला वगैरे माप कैली खंडी सहा

१ जमीन बाबद

१ मौजे वडनगे ताो ठाणे या गावी जमीन बीघे ५ पांच येकून आकार आदमासे १४

१ मौजे आंबप ता आळत जमीन बीघे ०= येकून आकार पांच ५ रुपये

१ मौजे दरवेश पाडळी ता। वडगांव येथे जमीन बीघे १ आकार रुपये चार ४

१ मौजे मोहरे ता। सातवे येथे जमीन बिघे ०= आकार रुपये २

१ कसबा सरूड ता। शिराळे येथे जमीन बिघे ०=

५ येकूण गल्ला दसरे मापे ०≡ केली.

नक्त २५ रुपये गल्ला केली ०≡ जमीन बीघे ०१२

नक्त ३५ रुपये, गल्ला ०६०३ कैली, जमीन बीघे १२

येकून देह येक जमीन बीघे ०१२ मिळून उत्पन्नाचा आकार नक्त रुपये ३५ पसतीस व गल्ला कैली ६०३ सहा खंडी तीन मण आहे. शिवाय श्री शिवछत्रपती महाराज यांनीं रामचंद्राचार्य बीन हरीहराचार्य याजला राज शके ११५ येकशे पंधराचे साली का। कोल्हापूर येथे घरदार बाबत जागा लांबी हात ५० व रुंदी हात ३२ बत्तीसच्या सनदा करून दिल्या त्यांस सुमार ५७ सत्तावन्न वर्षे जाहाली. तेव्हा पासून त्या जागेवर घर बांधून हल्ली नांदत आहेत.

(२) संपादन करणेचा तपशील

१ आमचे मूळ पुरुष वेदशास्त्र संपन्न राजश्री हरीहराचार्य बीन श्रीकराचार्य पंडीतराव स्वामी सनीध विद्यायोग्य पंडीताची समटकी (?) फसली समेन श्री संभु छत्रपती महाराज यांनी मौजे मोघर्डे तो। तारळ या गांवच्या सनदा करून दिल्या त्यांस सुमारे ११० वर्षे जहाली व मौजे आंबप तो। आळते येथील जमीन बीघे ०२ दोन व मौजे दरवस पाडळी ता। वडगांव येथें जमीन बीघे एक व मौजे मोहरे ता। सातव येथे जमीन बीघे ०२ दोन व मौजे सरूड ता। शिराळे येथे जमीन बीघे ०२ दोन येणें प्रमाणें श्रीमंत मातोश्री राजसबाई सो। महाराज यानी....नाम संवत्सरे माघ शु॥ ७ रोजीं भुमीदान धारादत्त करून सदरहु जमीन बीघे ०७ सात बाबत सनदा करून दिल्या त्यांस सुमार १०९ वर्षे जाहाली. सदरहु सनदा मिळाल्यापासून निरवेध आजपर्यंत चालत आहेत.

१ वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामचंद्राचार्य बीन हरीहराचार्य यांजवर श्रीमंत मातोश्री जिजाबाई साहेब कृपाळू होऊन मौजे वडनगे तो। ठाणे येथील जमीन बीघे ०५ पांच इनाम देऊन सनद दिल्ही त्यांस सुमार ८४ वर्षे

जाहाली व श्री शिवछत्रपती महाराज यांनी किले भूमीदान घर बांधावयास जागा लांबी हात ५० व रुंदी हात ३२ दिल्ही त्यास सुमारे ५७ वर्षे जहाली. सदरहु बाबत सनदा सादर जाहाल्यापासून आजपर्यंत बीन हरकत वहीवाट करीत आहे.

( ३ ) सदरहु उत्पन्नांत आमचे घर, भावाचेही भाग आहेत ते




याजप्रमाणे वंशावळ असोन मुळपुरुष हरीहराचार्य यांचे आम्ही पनतु. सदरहु उत्पन्नात हिश्ये आहेत ते असामीवार—रावजी यांजकडे मौजे मोहरे येथील जमीन बीघे ०२ दोन आकार रुपये दोन व मौजे वडनगे पैकीं जमीन बीघे ०२।। येकून जमीन बीघे ०४।। व आकार रुपये नऊ याचे पोटीं हिश्येदार नंबर १८ चा हिश्येदार आहे व नंबर १४ चा बाबूचार्य यांजकडे मौजे सरूड येथील जमीन बीघे ०२ आकार भात कैली ०३ आहे. दोनी उत्पन्नात मौजे मोघर्डे पैकी निमे वडीलकी बाबत आम्हाकडे वजा जाऊन बाकी राहिले त्यांत आम्ही व नंबर १४।१६ यांचे सारखे विभाग आहे. त्यांत आमचा विभाग भाऊपणाचा सहाजण आहे.

(४) पहिले कलमात लिहीले उत्पन्नाबाबत सनदापत्र हल्ली हजर केली आहे त्याचा तपशील.

८ मौजे मोघर्डे तर्फ शिराळ याजबाबत श्री संभु छत्रपती यानीं सनदा करून दिल्या त्याचा तपशील

६ राज शके ६२ भाद्रपद बहुल त्रयोदशी सौम्य वासरेच्या सनदा साहा मोर्तबी

१ राज शक ५८ आश्विन बहुल सप्तमी इंदू वासरेची मोर्तबी

१ राज शक ७४ कार्तिक बहुल पंचमी सोमवासरेची सनद एक

६ गावगन्ना जमिनीबद्दल सनदा २

सन सबा सलाशीन मया आलफे ता छ १ मांहे सवालच्या सनदा

१ हरीहराचार्य यांचे नांवे सनद एक

१ येशवंतराव गोपाळ व दामाजी हरी यांचे नावे एकं

१ सदाशीव चिंतामणी मुतालीक व कारकून वतन सरदेश कुँलकर्ण्यांचे नांवे एक

१ मौजे मोहर ता। सातव यांचे नांवे एक

१ मौजे आंबप ता। आळते यांचे नावे एक

१ मौजे दरवेश पाडळी यांचे नावे एक

१ सन इसने सितेन मया आलफे छ ११ मोहरम रामचंद्राचार्य पंडीतराव यांचे नावे एक

४ का। कोल्हापूर येथे घर बांधणे करीता मोबदला जागा लांबी हात पन्नास व रुंदी हात बत्तीस याजबाबत दानपत्र राज शक ११५ कील नाम संवत्छरे माघ बहुल वासरे चतुर्थी गुरुवासरेचे हुकूमापूर्वक

१ रामचंद्राचार्य पंडीतराव यांचे नावे एक

१ गोदाजी भोसले हवालदार नि॥ सदाशीव कृष्ण कारकून यांचे नांवे एक

१ देशमुख व देशपांडे ता हवेली यांचे नावे एक

१ कोल्हापूर याचे नांवे एक

येकूण कागदे यकोनीस हजर केले आहेत.

(५) पहीले कलमांत लिा उत्पन्नाशिवाय आणखी गाव व जमीनींचे उत्पन्न कांहीं नाहीं. व चवथे कलमांत लिहीले कागदाशिवाय उत्पन्नाबाबत सनदा पत्र कांहीं येक नाही.

(६) सदरी पांच कलमी मजकुरात लेहून दिल्हा आहे. यांत कमजास्ती जाहाल्यास निा सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकून सहा कलमें लिहून दिल्ही सही तारीख छ २७ सव्वल मुा तारीख २९ आक्टोबर सन १८४५ इसवी दस्तूर नारो कोन्हेर निा गोपाळराव पंडीतराव

१ कृष्णा बाळाजी मिरजकर<br>रा. करवीर द. खुद<br>१ गोविंद सखाराम कारकून

सही<br>गोपाळाचार्य बीन माधवाचार्य<br>पंडीतराव द. खुद.

समक्ष जहाली ता मजकूर<br>अंताजी वामन

## मीराखान हकीम यांची कैफियत

कैफियत नं. ३८ / इ. स. १८४६

कैफीयत बो मीराखान वल्द महमदखान हाकीम जात मुसलमान उमर वर्षे आदमासे ६५ पासष्ठ राहाणार करवीर सुमा सीत आरबेन मया तेन व आलफ ऐसीजे—

मेहेरबान पोलीटिकल एजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आंख ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्यांजबाबत त्या त्या लोकांजवळच्या सनदा पत्रें पाहुन कळवावें म्हणोन वगैरे मजकूर त्या खालीं मुख्य कारभारी याचे नांवे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदा पत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यांस आहेत ती सनदापत्रें हुजर करून त्या प्रकर्णी माहीतीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणें—

(१) हाल्लीं आम्हांकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

० मौजे मुडसिंगी तर्फ हावेली येथे जमीन ४५
पाच आहे त्याचा गला केली ०।० पांच मण
दसेरी मापे

२॥. मौजे सडोलीकर प्रांत हावेली येथे जमीन
बिघे ०५ आहे तिचा खंड—
२॥. बिघवणी दर विघा ०॥० प्रो नक्त रुपये
० गला केली ०॥१ अकरा मण दसेरी मापे

० मौजे उंचगावकर प्रांत हावेली येथे सात बिघे यांचे सनदे पो पदरी पडून चालती ती जमीन बिघे ०५ पांच हल्ली भागाने लाविली त्याबाबत आकार गला केली दसेरी मापे ०।१ अक्षरी साहा मण

६।० मौजे नरदे तर्फ वडगांव येथे जमीन बिघे ०५ पांच आहे त्याचा आकार दर बिघा रुपये १।० प्रमाणें एकूण नक्त रुपये

३५० मौजे निमशिरगांव प्रांत रायबाग हा गांव निंमे सरकार व निम्मे कागलकर घाटगे याजकडे आहे त्यास पो सरकारतर्फेचा निम्मे गांव आम्हाकडे चालत आहे त्याचा आकार आदमासे

३५० नक्त लावणी आन्वये जमाबंदी रुपये साहाशेहे पो हक्कदार व गांवखर्च रुपये २५० आडीचशेहे वजा होऊन बाकी आम्हास राहाती ती नक्त रुपये

१४०० मौजे उमलवाड तर्फ उदगांव देहाय एक याचा आकार रुपये

१४०० नक्त लावणी आन्वये जमाबंदी रुपयें १७०० सत्राशेहे पो हाक्कदार व गांवखर्च रुपये तीनशेहे ३०० वजा होवून बाकी रुपये

१८ मौजे वसगडे तर्फ हवेली येथे गवताचे कुरण पडसर जमीन बिघे ०६ साहा हाल्ली खंडानें लाविली आहे त्याचा खंड दर बिघ्यास रुपये तीन ३ प्रमाणें एकूण आकार रुपये

१५० मौजे निमशिरगांव प्रांत रायबाग दुतर्फे व चिपरी तर्फ आळते या दोन्ही गांवचे शिवेतील ·।· बिघे जमीन तीस बक्षीसीबद्दल चालत आहे तिचा आकार दर बिघा रुपये ५ पांच प्रमाणे नक्त रुपये

० मौजे नांगाव खुर्द तर्फ हावेली येथे पड जमीन बिघे ०१५ पंधराची सनद मिळाली पोा जमीन बिघे ८॥· साडेआठ स्वाधीन होवून चालत आहे त्याचा आकार गवत सुमारें १५००० पंधरा हजार

| जमीन बिघे | गला केली दसेरी मापें | गवत सुमारी |
|---|---|---|
| ·॥४॥· | १०२ | १५०० |

येकूण देहाय दीड १॥ व जमीन बिघे साडे चौसष्ट यांचा आकार नक्त रुपये येक हजार नऊशेहे पावणे सत्तावीस व गल्ला केली एक खंडी दोन मण व गवत सुमारी पंधरा हजार येणे प्रमाणें उत्पन्न आम्हास पावत आहे.

(२) सदरहु उत्पन्न कोणी केले व कोणी कशाकरितां कधी दिले व दिल्यापासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील—

१ आमचे वडील कैलासवासी महमदखान वा। मीराभाई हाकीम याजवर कैलासवासी शिवछत्रपती माहाराज कृपाळू होवून शेवेबदल करार करून आज्ञापत्रें करून दिली त्याचे वर्षाचा तपशील

१ मौजे मुडसिंगी तर्फ हावेली येथील पांच बिघे जमिनीबाबतचे आज्ञापत्र मिळोन वर्ष ४५ पंचेचाळीस जाहाली त्याची सनद आहे.

१ मौजे सडोली कर्यात हावेली येथें पांच बिघे जमीनीबाबत आज्ञापत्र मिळून वर्षे बेचाळीस ४२ जाहाली.

१ मौजे उंचगाव कसबे हावेली येथील सात बिघेचे आज्ञापत्र मिळोन वर्षे सुमारे ४१ एकेचाळीस जाहाली पो। जमीन आम्हाकडे बिघे पांच चालत आहे.

१ मौजे नरदे तर्फ वडगांव येथील पांच बिघेची सनद मिळाली होती. ती साल गुदस्ता नीमशिरगांव प्रांत रायबाग येथे वहिवाटदाराचे घर जे मिळाले त्यांत दग्ध जाहाली. सबब शके मिती याचे स्मरण नाही. परंतु सुमारे वर्षे चाळीस वहिवाट चालत आहे म्हणून वडील मुखें ऐकिले आहे.

१ खुद्द आम्हांवर कैलासवासी बावासो माहाराज यानीं कृपाळू होऊन बक्षीस शेवेबद्दल करार करून आज्ञापत्रें करून दिली त्याचा तपशील

१ मौजे निमशिरगांव प्रांत रायबाग या निम्मे गावच्या सनदा सादर जाहाल्या असून सालगुदस्ता मौजे मजकुरी वहिवाटदाराचे घरात दग्ध जाहालेमुळे शके मिती याचे स्मरण नाहीं परंतु शेवेबद्दल सुमारे वर्षे २० वीस वहिवाट चालली आहे.

१ मौजे उमलवाड तर्फ उदगांव शेवेबद्दल सरंजामात करार करून सनदा करून दिल्या त्यास वर्षे सुमारे १९ जाहाली

१ मौजे वसगडे येथे जमीन बिघे साहा ०६ सेवेबद्दल करार करून सनदा मिळाल्या होत्या त्या मौजे निमशिरगांव प्रांत रायबाग येथें वहिवाटदाराचे घरी जळाल्यामुळे शके मिती लागत नाहीं. परंतु वहिवाट सुमारे १६ सोळा वर्षे चालत आहे.

१ मौजे निमशिरगांव व मौजे चिपरी याचे शिवेत जमीन बिघे ·।· बक्षीसीबद्दल आज्ञापत्र मिळाले त्यांस वर्षें सुमारे तेरा १३ जाहाली.

१ मौजे नांगाव खुर्द तर्फ हावेली येथील सेवेबद्दल पंधरा ०१५ बिघे जमीनीबाबत आज्ञापत्रें मिळून आकरा वर्षे जाहाली पो। जमीन बिघे साडे आठ आम्हांकडे चालत आहे.

येणें प्रमाणें सनदा सादर जाहाल्यापासून सतत वहिवाट चालली आहे.

( ३ ) सदरहु उत्पन्न संपादन करणार आमचे वडील व आम्ही खुद्द असोन हाल्ली वहिवाट आम्हीच करीत आहे व त्या उत्पन्नास आम्हाखेरीज दुसरा कोणी विभागी नाही. व सरकारात हामेषा हाजर असून हाकीमीचे म्हणजे वैद्यक्रियेचें चाकरी करावी लागते व स्वारी बाहेर जाहालेस बरोबर जावयाची वहिवाट आहे.

( ४ ) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाबाबत सनदा आम्हांजवळ आहेत त्या हाजर केल्याचा तपशील—

१ मौजे मुडशिंगी तर्फ हावेली येथील पांच बिघे जमीनीबद्दल सुमा ईसने मया तेन व आलफ छ २८ माहे साबानचे आज्ञापत्र मोकदमानी मौजे मजकूरचे नांवे येक.

१ मौजे सडोली कर्यात हावेली येथील पांच बिघे जमीनीबाबत सुमा आरबा मयातेन व आलफ छ २८ माहे जमादिलावलचे आज्ञापत्र कोट कोल्हापुराकडून मोकदमानी मौजे मजकूरचे नावे एक

१ मौजे उंचगाव का। हावेली येथील सात बिघे जमीनीबाबत सुमा खमस मयातेन व आलफ कोट कोल्हापुराकडून मोकदमानी मौजे मजकुरास नांवे एक

१ मौजे उमलवाड तर्फ उदगांव याजबाबत सुमा सब्बा आशरीन व आलफ छ १९ माहे जिलकादचे खुद्द आमचे नांवे आज्ञापत्र येक १

१ मौजे नीमशिरगांव प्रांत रायबाग व प्रांत कागल मौजे चिपरी तर्फ आळते या दोन्ही गावचे शिवेचे जमीन बिघे ।· तीस याजबाबत हुजुरुन खुद्द आमचे नांवे सुमा सलास सलासीन मया तेन व आलफ छ १ माहे जिल्हेजचे आज्ञापत्र एक

२ मौजे नागांव खुर्द तर्फ हावेली येथोल पंधरा बिघे बाबत सुमा खमस सलासीन मयातेन व आलफ छ २५ माहे रबिलावलची आज्ञापत्रें

१ खुद्द आमचे नांवे एक

२ मोकदमानी मौजे मजकूरचे नांवे एक

एकूण सात आज्ञापत्रें आम्हाजवळ होती ती हजर केली आहेत या शिवाय मौजे नरदे येथील जमीन बिघे ०५ पांच व मौजे नीमशिरवगांव देहाय निम्मे गांव व मौजे वसगडे येथे जमीन बिघे ०६ साहा एकूण आज्ञापत्रे सादर जाहाली असून मौजे निमशिरगांव येथील वहिवाट दाराचे घर सालगुदस्त जळाले त्यात दग्ध जाहाल्यामुळें आम्हाजवळ नाहीत.

(५) सदरी पहिले कलमांत लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी सरकारातून मिळालेले उत्पन्न नाही व चवथे कलमांत लिहिले सनदापत्राशिवाय सरकारी सनदापत्रें कांहीं नाहीं.

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न व उत्पन्नाचा मजकूर लिहून दिला खरा आहे यांत कमिजास्ती जाहाल्यावर सरकार आज्ञा करतील ते आम्हास कबूल. येकूण साहा कलमें लिहून दिली सही छ ४ माहे जमादिलावल शके १७६८ पराभव नाम संवत्सरे तारीख १ माहे मे सन १८४६ ईसवी.
दस्तुर–गणेश रामचंद्र सातारकर
नी।। मीराभाई हाकीम

सहीची निशाण खुद्द मीराभाई
यांचे हातचे आसे.

साक्ष

१ रामाजी धोंडदेव हुजूरपागा दस्तुर खुद्द

१ परशराम महादेव टिकेकर दिवाणा मामला दस्तुर खुद्द

## नेसरीकर शिंदे
## घराण्याची कैफियत

कैफियत नं १ / इ. स. १८४५

कैफियत नरसिंगराव बिन जीवनराव शिंदे उमर वर्षे ४२ जात मराठे कसब सरदारीचे, राहाणार ठाणे नेसरी इलाखा कोल्हापूर

मेहेरबान पोलटेकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आख ६५ सन १८४४ इसवीची यादी आली त्यांत इनाम सरंजाम, देवस्थान, धर्मादाय, चालत आहे. त्याजबाबत त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी ५५० सन १८४५ चा शेरा जाहाला. त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञापत्र सादर जाहाले त्याजवरून विनंतीपत्रासोबत सनदापत्रे देऊन मुखत्यार कारकून याजबरोबर पाठवून सनदा प्रकर्णी माहितगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे

( १ ) आम्हाकडे हली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील ११ खालसा गांव

| | |
|---|---|
| १ कसबे नेसरी पेठ नेसरी गांवसुद्धा | १ मौजे सांबर |
| | १ मौजे तोरेवाडी |
| १ मौजे वगराती | १ मौजे डोणेवाडी |
| १ मौजे सावंतवाडी | १ मौजे हडलग |
| १ मौजे सरवली | १ मजरे कालमवाडी |
| १ मौजे अर्जूनवाडी | १ मौजे कलमेवाडी |
| ५ | ६ |

९ दुमालदार याचे गावी सालाबादी बाबती येत आहे ते गाव नऊ येकूण आकार अजमासे

१ मौजे कुबरी
१ मौजे तलेवाडी
१ मौजे हलैवाडी
१ मौजे तावरेवाडी
१ मौजे डिकेवाडी
५

१ मौजे कानडेवाडी
१ मौजे बिदरवाडी
१ मजरे येकेहट्टी
१ मौजे शिपूर
४

येकूण खालसा व बाबतीचे गांव मिळोन देह २० येकूण उत्पन्न अजमासे रु. ६००० सहा हजाराचे आहे.

(२) या प्रांती मोगलाई अम्मल होता. मातोश्री श्री मन्माहाराज राजाराम साहेब छत्रपती सरकारानी राज्य सर केले. त्या समई आमचे पणजे सुलतानराव शिंदे यांनी नेसरी वगैरे संस्थान संपादन केल्यावरून राजाराम साहेब छत्रपती कृपाळू होऊन सदरी कलमात लिहीलेले उत्पन्न आमचे पणजे सुलतानराव शिंदे यांसी दिल्यावरून आजतागायत सतत सुमारें १५० दीडशे वर्षेपर्यंत आम्हाकडे चालत आहे असे वडीलमुखे आमचे ऐकणेत आहे.

(३) संपादक हे आमचे पणजे आहेत व या उत्पन्नास हिस्सेदार आम्हांशिवाय कोणी नाही व या उत्पन्नाबाबत म्हणोन महाराज सरकारात चाकरी करावी लागत नाही. परंतु आम्ही महाराज सरकारचे पदरचे, सबब सरकार स्वारी बाहेर गांवी जाहाली आणी आम्हास आज्ञापत्र आले असता येण्याचा सांप्रदाय आहे.

(४) पहिले कलमांत लिहीलेल्या उत्पन्नाबाबत सनदापत्रे हजर केली त्याचा तपशील

१ छ १ माहे मोहोरम सन खमस अशरीन मया तेन व आलफचे आबा साहेब महाराजांचे कालकिर्दित जीवनराव शिंदे यांचे नांवे आज्ञापत्र.

१ छ ७ माहे सोवल सन अशरीन मया तेन व अलेफ २ चे आबासाहेब महाराज यांचे कालकिर्दित खाली छ आमच्या नांवे आज्ञापत्र

येकूण दोन कागद पहिले कलमात लिहिले प्रमाणें उत्पन्नाबाबत आम्हां-जवळ होते ते हजर केले आहेत. उत्पन्नाचा भोगवटा अजमासें दिडशे वर्षाचा म्हणोन दुसरे कलमांत लिहिले त्यास त्यावेळी मिळालेल्या सनदांचा मजकूर असा आहे की, नेसरीवर हिंमत बहाद्दर यांनी येऊन दंगा करून दरोबस्त गांव लुटून नेला. त्यावेळी पूर्वीच्या सनदा गहाळ झाल्या म्हणोन वडिलमुखे माहितीत आहे. त्या सनदाचे शक मितीचेही स्मरण नाही.

( ५ ) पहिले कलमांत लिहीलेल्या उत्पन्नाशिवाय आणखी काही येक उत्पन्न नाही व चौथे कलमात लिहिलेल्या सनदा पत्राशिवाय उत्पन्नाबाबत सनद पत्र काही एक नाही.

( ६ ) सदरी पांच कलमात मजकूर व उत्पन्न लिहून दिले हा मजकूर खरा आहे यात काही कमीजास्त जाहाल्यास सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण सहा कलमे लिहून दिली सई छ८ माहे रमजान शके १७६७ भाद्रपद शु।। १० इंग्रजी तारिख ११ माहे सप्टेंबर सन १८४५ दस्तुर नारो गोविंद नेसरीकर नि।। शिंदे दस्तुर खुद्द

साक्ष नरसिंगराव शिंदे दस्तुर खुद्द

१ बाबाजी नागेश पेंडसे रा. करवीर
नि।। पाटणकर हल्ली मु. करवीर दस्तुर खुद्द

१ रामचंद्र कासी खानोलीकर रा. करवीर द. खु.

ही कैफियत समक्ष जाहाली ता. व सन मजकुर. अंताजी वामन टिकेकर सनदा पत्राचे चौकशीचे काम पाहाणार नि।। सरकार करवीर

## घाटगे बाजी नागपूरकर घराण्याची कैफियत

कैफियत नं. ४२ / इ. स. १८४६

कैफियत भोवानराव बिन नारायणराव घाटगे बाजी नागपूरकर जात मराठा उमर वर्षे अंदाजे २७ राहागार कसबे करवीर सुमा सित अरबेन मयातेन व अलफ ऐसीजे—मेहेरबान पोलिटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आख ६६ सन १८४५ इसवीची याद आली. त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकाजवळची सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्या खाती मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आरव ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला. त्यांजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा. त्याजवरून माहितगारीने लिहून देतो तो खालील प्रमाणे

( १ ) हल्ली आम्हांकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

४२५६॥—। को उदगांव ता आळत याजबाबद आकार आजमासे ५०६४०=। त्या पैकीं वजा माहाल मजकूर ८०७=। बाकी ७९८॥।≡॥। मौजे कूर ता॥ खानापूर येकूण देहाय येक आकार अजमास ७९८॥।≡॥।

नक्त रुपये १०९४॥।॥ पैकी वजा महाल मा॥ गाव हकदार वगैरे

गल्ला कैली मापे १४०३०॥। —

पो॥ वजा खर्च ४॥।३।१॥≡

बाकी ग॥ ९०४॥३०≡

तूप मापी शेर ०॥।६॥।१३

७७८॥= मौजे टिकेवाडी ता॥ खानापूर येकूण देहाय एक येकूण आकार अजमासे ७७८॥=

नक्त रुपये १११६॥-॥। पैकी वजा खर्च महाल मजकूर व गांव हक्कदार वगैरे ३३७॥ ≡॥।
बाकी ७७८॥ =
० गला कैली ११॥४॥१॥ पो वजा महाल मजकूर वगैरे ४।०॥
बाकी गला ७।४।१॥·
० तुप मापी ०॥०॥ पैकीं वजा गांव खर्च ००७ बाकी मापी शेर ०।≡॥

८२७॥ = मौजे नसलापूर प्रांत रायबाग देहाय येक आकार आजमासे रुपये ९९७॥ पैकीं वजा महाल मार व हक्कदार १६९॥। =

२२५ इनाम जमीन बिघे ०॥।२२ आकार ४० मौजे मुडशिंगी ता हवेली जमीन बिघे ०५ खंडाने लावली त्याज बा रुपये
० का सावगांव येथे जमीन बिघे ०५ आहे त्याचा आकार रुपये ४० आहे. ती आमचे वडील यांनीं आबाजीराव जाधव यांस दिली आहे. सबब दखलबाज

१८५ मौजे नसलापूर प्रांत रायबाग येथें वतन नाईकीचे जमीन ·॥।·१२ येकूण आकार

येकूण देहाय ४ व जमीन बिघे ११२ एकशें बारा त्याचा आकार सहा हजार आठशे पावणे सत्याऐंशी एक आणा व गला कैली गांव मापे साडे सोळा खंडी चार मण अर्ध पायली तीन चिपटी व तूप मापी येक मण पावशेर तेरा टाक येणेप्रमाणे जमाबंदी आम्हास पावतात.

(२) सदरहू उत्पन्न संपादन करणार आमचे वडील कैलासवासी शिवछत्रपती महाराज यांनीं कशाकरिता कधीं इनाम करून दिली व दिल्हेपासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील

१ मौजे मजकूर उदगांव आमचे मातुश्रीचे लग्नासमई कन्यादानास धारादत्त इनाम करार करून दिला त्यास अजमासे वर्षे सुमारे ४०

२ मौजे टिकेवाडी मौजे नसलापूर व को उदगांव येकूण देहाय तीन आमचे....नागपूर मुक्कामी होते त्यास आनवून सदरहू तीन गाव इनाम करून दिल्हे. त्यास वर्षे अजमासे ३६ छतीस जाहाली.

३ कसबे सावगांव येथील जमीन बिघे पांच व मौजे मुडशिंगी येथील जमीन बिघे पांच येकूण बिघे दहा आमचे मातोश्रीस कैलासवासी आबासाहेब महाराज यांजकडून दिपवाळीचे ओवाळणी बद्दल करार करून सनदा दिल्या त्यास वर्षे सुमारे ३० तीस जाहाली.

४ मौजे नसलापूर येथील नायकीचे वतन सदरहू गात्र दिल्हे बराबर इनाम करून दिल्हे त्यास वर्षे सुमारे छत्तीस ३६ जाहाली.

येणेप्रमाणे इनाम संपादन केल्यापासून आजतागायत सतत चालत आहे.

(३) सदरहू उत्पन्न संपादन करणार आमचे वडील असून हल्लीं वहिवाट आम्ही खुद करीत आहोत व या उत्पन्नास विभागी आमचे सापत्न वडील बंधू नागपूर मु. तिा माधवराव बाजी रिसालदार आहेत. ते तेथील उत्पन्नाचा उपभोग करीत आहेत. व आम्ही येथील सदरहू उत्पन्नाचा उपभोग करीत आहो. फारिकत होऊन विभाग जाहाले नाहीत. एकंदर वहिवाट चालली आहे व या उत्पन्नाबाबत सरकारात चाकरी करणेची वहिवाट नाहीं. परंतू स्वारी बाहेर जाहल्यास इतमामानिशी बरोबर असून खर्चास मिळत असते.

(४) सदरी पहिले कलमांत लिहीले उत्पन्नाबाबत सनदा सादर जाहाल्या होत्या. आमचे वडील नागपुरास गेले ते समई बराबर घेऊन गेले ते तिकडे कमानीवर होते. सरकारी कामावर कारंजे मुक्कामीं गुजारले. तेव्हा कागदपत्राची व्यवस्था कशी जाहाली याची माहिती आम्हास नाही. व नागपूर येथील वाडाही जळला. याजकरितां तीर्थरूप मातोश्री नानीसाहेब साल गु. वैशाख मासी नागपुरास गेले समई कागदपत्राची शोध करणे विषई विनंती केली आहे व हल्लीं कागदपत्र तेथे असतील ते पाठवून द्यावेत म्हणोन लिहीले आहे. त्यास तिकडून कागद आले म्हणजे हजर करू. येथे सनदापत्रे आम्हांजवळ नाहींत.

(५) सदरी पहिले कलमांत लिहीले उत्पन्नाशी खर्च आणि कांही एक उत्पन्न नाही व चवथें कलमात लिहीले कारणास्तव आम्हांजवळ उत्पन्नाबाबत सनदपत्र कांही येक नाहीं.

(६) सदरी पाच कलमी उत्पन्नाबाबत मजकूर व उत्पन्न लिहून दिल्हे हे खरे आहे. त्यांत काही कमजास्त जाहाल्यास नि।। सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण साही कलमी लिहून दिली सई ता छ २९ माहे जमादिलावल उर्फ वैशाखमास शके १७६८ पराभव नाम संवत्सरे मुा तारिख २६ माहे मे सन १८४६

सई भोवानराव धोंडी गव्राजी
१ बापुजी विश्वनाथ कारकून नि।। लष्करकडे दस्तुर खुद्द
१ बाबाजी बापोजी फडणवीस नि. हुजरे दस्तुर खुद्द

दप्तरी दाखल ता १ जुलई सन १८४६
नि।। अंताजी वामन टिकेकर
सनदा पत्राचे काम पाहाणार



## शहाजीराव खानवटकर भोसले यांची कैफियत

कैफियत नं. ५३ / इ. स. १८४६

कैफियत बो शाहाजीराव बीन मालोजीराव भोसले खानवटकर उमर वर्षे ५९ जात मराठे मुक्काम करवीर सुाा सबा आरबेन मया तेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल येजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक यांजकडुन आख ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांच्या सनदा पत्रें पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी याचे नांवे डेरी आख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदा पत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यांस आहेत ती सनदा पत्रें हजर करून त्या प्रमाणें माहीतीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणें

(१) हल्लीं आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

८१९।।।· मौजे चावरे तो वडगांव याचा सरकारी आकार रुपये ३१०० परंतु हाल्ली लागणी आन्वये जमाबंदी सन १२५५ फसली

रुपये २२६४।≡ पो वजा खर्च

६०२।।· हुजुर बाबती बद्दल पेटा आळतेकडे

३०३ किता हुजूरनी परभारे वरात शिंदे पाा वगैरे

१०५।।· म्हाली हाक्कदार

९९।।।= गांव हक्कदार

७४१।= देवस्थान

१२ धर्मादाय

२८।।≡ गांव सालाबादी
१५० कमावीसदार नेमणुक
६८ सादीलवार
बाकी आम्हाकडे वसुल आला तो ८१९।।—

१७० मौजे लौटवाडी ता। खानापुर आकार नक्त व गले सुद्धा सरकारी रुपये ७०० हल्ली लागणी आन्वयें सन १२५५ फसली नक्त रुपये ३२७ व गला खंडी
४।। पो खर्च
१४८ हुजूर बाबतीत आदा
२५ गाव खर्च साला बंदी
३४ गाव हाक्कदार
२० देसाई
बाकी नक्त रुपये १०० आम्हांस वसुल आला व गला खंडी साडेचार पो हुजूर बाब ·।।· दाहा मण व गांव खर्च ·।।· येकूण यक खंडी वजा जाता बाकी गल्ला साडेतीन खंडी त्याचा आकार दर खंडीस रुपये २० प्रमाणें रुपये ७० एकूण गलेसुद्धां रुपये एकशेहे सत्तर आम्हास वसुल आले.

५८ जमीनीबाबत आकार
५० का। रूकडी येथे मळा जमीन बिघे ०५ पांच हल्ली खंडाने लाविली आहे त्याचा खंड ८ का। करवीर येथे साकोळी नजीक बागायत जमीन बिघा ०।।· आर्धा घरी वहिवाटीस आहे. त्याचा आकार अदमासे

येकूण गाव दोन व जमीन बिघे ०५।। साडेपांच याचा आकार गलेसुद्धां दाहाशेहे पावणे आठ्ठेचाळीस रुपये आम्हास वसुल आले.

(२) सदरहु उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशाकरितां कधी दिले व दिले पासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील—

१ मौजे चावरे हा गांव आमचे तीर्थरूप मालोजीराव भोसले यांस कैलासवासी शिवछत्रपती माहाराज यांनीं खर्चाबद्दल ईनाम करून

सनदा करून दिल्हे त्यास सुमारे ८० वर्षे जाहाली तेव्हांपासून आनुभव करीत आहो. सदरहु गाव मिळणेचे कारण शिवछत्रपती महाराज हे आमचे वडिलांचे सख्खे बंधु. म्हणजे आमचे सख्खे चुलते. याजला खानवटाहून आणवून मातुश्री जिजाईसाहेब माहाराज यांनी दत्तविधान करून घेतले. त्यावेळी आमचे वडिलास करवीरी आणोन आमचे चालवणे आवश्यक जाणोन खर्चास दिले.

१ मौजे लौटवाडी तो खानापुर हा गांव आमचे चिरंजीव मालोजी-राव भोसले यासी दुधाबद्दल कैलासवासी शिवछत्रपती माहाराज यांनी ईनाम करार करून देऊन सुा ईसने आशर मया तेन व आलफ म्हणजे इंग्रजी सन १८११ ईसवी साली सनद मिळाली त्यास चौतीस वर्षे जाहाली सतत अनुभव करीत आहो

१ का रूकडी येथील मळेची जमीन बिघे ०५ पांच कैलासवासी शिवछत्रपती माहाराज यानी आम्हावर कृपाळु होवून ईनाम करार करून देवून सनदा आमचे नावे करून दिले त्यास सुमारे ४५ वर्षे जाहाली

१ साकोळी नजीक बाग जमीन बिघा ·॥· आर्धा आमचे बंधु कैलासवासी 'व्यकंटराव भोसले याजवर कैलासवासी बावासोा माहाराज यानी कृपाळू होवून खडक जमीन पड होती ती बाग करणेस देवून सनदा करून दिले त्याजवरून त्या जमीनीत मशागत करून बाग केली त्याप्रमाणे दिलेपासून सतत चालत आहे.

येणेप्रमाणे उत्पादन संपादन केले.

(३) सदरी लिा उत्पन्न संपादन करणार आमचे तीर्थरुप मालोजीराव भोसले व आम्ही व आमचे चिरंजीव मालोजीराव भोसले आसून हल्ली वहिवाट आम्ही करीत आहो. या उत्पन्नास कोणी हिस्सेदार नाहीत व सरकारात सेवा करणेचा प्रकार असा आहे कीं, आम्ही सरकारचे कुटुंबातील सबब आमचे घरी जे पुरुष होतील त्यांनीं सरकार संनिध नेहमी असावे.

(४) सदरी पहिले कलमात लि॥ उत्पन्नाबाबत सनदा आम्हांस मिळाल्या होत्या त्या आमचे बंधु व्यंकटराव याजपासी आसतां ते काही दिवस आम्हांपासून विभक्त असोन मृत्यू पावले त्याची जिंदगी एकंदर दिवाण-

साहेब माहाराज यानी आमानीती करून नेली. त्यात सदरहु सनदा पत्रें गेली. त्याचे कारण व्यंकटराव याची स्त्री, दिवाणसाहेब माहाराज याची बहीण, तिचा जांवई आनंदराव म्हाडीक याजकडे व्यंकटराव याचा हिस्सा व जिनगी वगैरे देण्याचे ईराद्यानें जप्त केलेवर सदरहु गावचा हिस्सा आम्हाकडोन व्यंकटराव याजकडे चालत होता. तो व जिंदगी आम्हास मिळावी म्हणून खुदावंत येजंटसाहेब बहादुर जिल्हे बेळगांव यांजकडे आम्ही फिर्याद केल्यावरून साहेब बाहादुर यांचे हुकुमावरून गावचा हिस्सा व जिंदगी वगैरे आम्हास दिले. परंतु सनदा मिळाल्या नाहींत. सदरहु हुकुमावरून गावचा हिस्सा व जिंदगी मिळाली तेव्हां सु॥ सलास आरबेन म्हणजे ईंग्रजी सन १८४२ ईसवी साली आज्ञापत्रे करून दिले ती व मौजे लौटवाडी ता॥ खानापुर याचे नावे पेशजी मिळालेली सनद हजर केली आहेत.

सु॥ सलास आरबेन मया तेन व आलफ छ २४ माहे शावाल म्हणजे इंग्रजी सन १८४२ ईसवीची तीन

१ शाहाजीराव भोसले याचे नावे नंबर २८०
१ मोकदमानी मौजे चावरे ता॥ वडगांव याचे नांवे नंबर २८१
१ का॥ रुकडीचे नांवे नंबर २८२
१ सु॥ ईसने आशर मयातेन व आलफ छ १४ माहे रमजान म्हणजे ईंग्रजी सन १८११ ईसवी मोकदमानी मौजे लौटवाडी ता॥ खानापुर याचे नावे नंबर

येकूण चार आज्ञापत्रे हजर केली आहेत.

(५) पहिले कलमात लि॥ उत्पन्नाशिवाय आणखी कांहीं उत्पन्न नाहीं. व चौथे कलमांत लि॥ सनदा पत्राशिवाय हल्ली चालते उत्पन्नाबाबत सनदपत्र कांहीं एक नाहीं.

(६) सदरी पांच कलमांत मजकूर व उत्पन्न लिहून दिलेले खरे आहे त्यात कांहीं कमिजास्त जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ते आम्हांस कबुल आहे.

एकूण सहा कलमें लि॥ दिले सही ता। १४ आक्टोंबर सन १८४६ ईसवी शके १७६८

दस्तुर बाळाजी पांडुरंग कारकून नी॥ श्रीमंत राजे श्री शाहाजीराव भोसले खानवटकर

साक्ष ( सही ) शाहाजीराव बीन मालोजी

१ दादो बापुजी कडोलेकर आवटे राव भोसले खानवटकर

द. खुद द. खुद

१ नारो गोपाळ सिकेनीस द. खु.

कैफीयत आमचे समक्ष जाहाली. सही करणेस मालकाच्या सबब आत्माराम बाजी नि॥ लष्कर यास त्याजकडे पाठवून त्यानी कैफीयत वाचून पाहून सही आपले हस्ते करून साक्षी घाळून दिली आहे.

सही

आप्पाजी लक्ष्मण सनदापत्राचे काम पाहाणार



## हिरोजीराव पाटणकर यांची कैफियत

कैफियत नं. १७/इ. स. १८४५

कैफीयत हिरोजीराव बीन मानसिंगराव पाटणकर उ. वर्षे ४६ जात मराठे कसब सरदारीचे, राहाणार करवीर, सुमा सित आरबेन मयातेन व आलफ. मेहेरबान पोलिटिकल एजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आरब ६६ सन १८४५ ईसवी रोजी याद आली त्यात ईनामे, सरंजाम, देवस्थान, धर्मादाय चालत आहे. त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकुरचा त्याखाली मुख्य कारभारी यांचे नावे आरब ५५ सन १८४५ ईसवीचा शेरा जाहला, त्याजवरून सनदापत्रे दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास सनदा प्रकर्णी माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणें—

( १ ) आम्हाकडे हल्ली ईनामी उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील—-

मौजे शिरोली ता॥ आखे पेटा करवीर एकूण देह येक याचा आकार सरकार बाबती व गाव हक्कदार वगैरे खर्च वजा जावून बाकी आम्हास येते ते अजमास

९०४।≡।।। नक्त पनाळी रुपये

७८८८१। दसेरी मापे केली

येकूण नक्त पनाळी नऊसेहे चार रुपये पावणे दाहा आणे गला. केली दसेरी माप सात खंडी सव्वा पायली.

मौजे बाणेरी ता॥ हवेली पेटा करवीर येथे जमीन बिघे सहा ६ याजबाबत उत्पन्न गल्ला कैली दसेरी मापे

नक्त ९०४॥≈॥ गाव, दसेरी मापे कैली ७॥२८१।

जमीन बिघे सहा ६

येकूण नक्त नऊशे चार पावणे दहा आणे गला कैली साडे सात खंडी दोन मण सव्वा पायली येकूण देह गांव एक व जमीन बिघे ६

( २ ) सदरी लिहीलेले इनाम संपादन करणारे आमचे सख्खे चुलते गोविंदराव पाटणकर बिन राघोजीराम पाटणकर हे स्वामी शेवेसी तत्पर असोन परशाराम भाऊ पटवर्धन याजबरोबर लढाई जाहाली त्यांत जखमी जाहाले, तेव्हां मौजे शिरोली हा दरोबस्त गांव पुढें कांहीं दिवसांनी बाणेरी ता। हवेली येथील जमीन बिघे सहा येणे प्रमाणे कैलासवासी शिवछत्रपती महाराज यांनीं कृपाळू होऊन सदरहू इनाम याच्या सनदा करून दिल्या तेव्हा पासोन सतत आज पावेतो गांव सुमारे आठेचाळीस व जमीन सुमारे ३५ वर्षे आम्हाकडे चालत आहे.

( ३ ) सदरी पहीले कलमांत लिहिलेले उत्पन्न संपादन करणारे आमचे सख्खे चुलते व या उत्पन्नास हिस्सेदार आम्हांशिवाय दुसरा कोणी नाहीं. आम्ही सरकारात मानकरी असोन सरकारी स्वारी कोठे गेल्यास बरोबर जावे लागते. तेव्हां इतर मानकरी लोकांप्रमाणें आमचा मानमर्तबा सरकारातून ठेवणेची वहिवाट आहे. चाकरी वगैरे कांहीं करावी लागत नाहीं.

(४) पहिले कलमांत लिहीलेल्या उत्पन्नाबद्दल सनदा पत्रे हजर करावी तर निपाणीकर सरलष्कर यांचे दंगाईत मौजे शिरोली हा गांव दग्ध केला. तेथे आम्ही आपले वाड्यांत खटल्यासुद्धां राहात असता तो आमचा वाडाही दग्ध जाहाला. तेव्हां हल्लीं दाखला हजर करावयास आम्हांपाशी कांहीं राहिले नाहीं. व शके मितीचे स्मरण नाहीं.

(५) पहिले कलमात लिहील्या उत्पन्नाशिवाय आणखी कांहीएक उत्पन्न नाही व चवथे कलमात लिहिलेल्या कारणामुळे सनदा पत्रे काहीएक नाही.

(६) सदरी पांच कलमी मजकूर लिहून दिलेला खरा आहे यात कांहीं कमजास्त जाहल्यास जी सरकार आज्ञा करील ती आम्हांस कबूल आहे.

येकूण सहा कलमे लिहून दिली ता छ १७ माहे सवाल उर्फ आश्विन मास शके १७६७ मु॥ ता. १८ माहे आगटंबर सन १८४५ रा॥ दस्तुर बाबाजी नागेश पेंडसे ति॥ पाटणकर

साक्ष
१ गोपाळ धोंडो उचगांव
नि. कान्हेराव

सही हिरोजीराव बिन मानसिंगराव पाटणकर दस्तुर बाबाजी नागेश पेंडसे नि॥ पाटणकर नि॥ खुद्द हातची दोन

आप्पाजी देशपांडे अखेरे ( अक्षरे )
साक्ष दस्तुर खुद्द मु।। करवीर
१ राघो भवानी आऊंधकर
मु।। करवीर नि।। रामचंद्र
पावरी राजाराम संत नि।।
प्रो साक्ष दस्तुर खुद्द
सही--समक्ष जाहली ता. सन मजकूर.
अंताजी वामन टिकेकर नि।। लष्कर व सनदा पत्राचे चौकशीकडे

## माणकोजीराव खानवटकर भोसले यांची कैफियत

कैफियत नं. ७७/इ. स १८४६

कैफीयत बेशमी मानकोजीराव बीन स्वरुपजी बाबा भोसले खानवटकर ईनामदार बा। करवीर उमर वर्षे आजमासे ५५ जात मराठे सुमा सबा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल येजंटसाहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आंक ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबाबत त्या त्या लोकांची सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांचे नावे डेरी आख ५२० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रे असतील ते दाखवावी म्हणोन आज्ञा, त्यास मौजे तीटवे तो तारळे पेटा भुदरगड हा गाव आम्हाकडे ईनाम असून सनदा पत्रे होती. परंतु निपाणीकर यांचे प्रांतात दंगा जाहाला त्यावेळेस आमचे राहाणे मौजे मजकुरी होते. तेव्हा निपाणीकर यांचे लष्कर येवून गांव जाळिले व गाव व आमचा वाडा लुटून नेले. त्या लुटीत सर्व कागदपत्र गेले. या कारणामुळे सनदा नाहीत. सदर गावचे उत्पन्न खाली लिहिल्याप्रमाणे——

(१) मौजे तीटवे तो तारळे पेटा भुदरगड हा गाव आम्हाकडे चालत आहे. त्याची लावणी व त्या प्रो हुजूर बाबती व माहाली ईनामदार व गाव हक्कदार व देवस्थान धर्मादाय वगैरे वजा जाता बाकी उत्पन्न आम्हास राहात आहे ते तपशील खाली लिहिलेप्रमाणे——

३८९ नगद लावणी रुपये १११० पो बजई

५०८॥· हुजूर बाबती

९३ माहाली ईनामदार

७६॥· गाव नी॥ वतनदार
३०॥· देवस्थान
१२॥· धर्मादाय

७२१ येकूण सातशेहे येकवीस रुपये जाता बाकी रुपये

५८॥- जमीनी बाब गल्ला खंड केली ५८१। यासी दरमणी रुपये
१ प्रमाणें रुपये १०१।- पैकी वजई
३० पंत आमात्य बावडेकर यांची बाब गला केली खंड १॥-
१२॥।- सरदेशमुखी हक्क गला केली
येकूण वजई गल्ला २८२॥।
बाकी गला केली २॥।-२॥ यासी रुपये

०॥। ≡॥ तुप जमीनीबद्दल घेणेची वहिवाट ते तूप वजन ८१८८९
रुपये १॥।⁓॥ पो वजई ग्रामदेव समाराधना वगैरे वजा वजन
८८॥ रुपये ·॥। ≡ बाकी येणे प्रमाणें उत्पन्न आम्हास आहे.

(२) सदरहु उत्पन्न संपादन करणार कैलासवासी स्वरुपजी बाबा भोसले खानवटकर आमचे वडील. कैलासवासी श्री मन्माहाराज शिवछपती महाराज हे आमचे चुलते राज्यास दत्तक जाहाले नंतर सदरहु गांव आम्हास ईनाम करुन दिले त्यास मुकरर वर्षे सनदा गेल्या सबब लागत नाहीत. परंतु आजमासे वर्षे ७५ जाहाली कलमे

(३) सदरहु उत्पन्न संपादन करणार आमचे वडील यानी वहिवाट केली. आम्ही खुद असून हल्ली वहिवाट आम्हीच करीत आहो. सदरहु उत्पन्नास हिस्सेदार आमचे सख्खे बंधु त्रिंबकराव भोसले, व आबाजीराव भोसले, व नारायणराव भोसले, व दिनकरराव भोसले असे चौघे बंधु आहेत ते खानवट येथील उत्पन्न आम्हास आहे ते अनभवुन खानवट येथे राहात आहेत. आम्ही सदरहु उत्पन्न अनभऊन येथे आहो. सदर बंधुची आमची वाटणी कांहीं जाहाली नाही.

(४) सदरी पहिले कलमांत लिहिले. उत्पन्नाबाब सनदा सादर जाहाल्या होत्या त्या निपाणीकरांचे दंग्यात लुटीत गेल्या सबब आम्हापासी नाहीत.

(५) पहिले कलमांत लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी कांहीं येक उत्पन्न

नाही. चवथे कलमांत लिहिले कारणास्तव आम्हा जवळ सनदपत्र कांहीं येक नाहीत.

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न व मजकूर लिहून दिला खरा आहे. यात कांहीं दोष जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण साहा कलमे लिहून दिली सही तारीख छ २२ माहे जिल्हेज शके १७६८ पराभव नाम संवत्सरे तारीख १९ माहे नवंबर सन १८४६

सही माणकोजीराव बीन स्वरुपजी
बाबा भोसले खानवटकर द. खुद

साक्ष—विनायक रघुनाथ काळे

१ आवजी नरसिंह कबनुरकर दस्तुर खुद

१ रावजी बल्लाळ कुलकर्णी तीवलेकर द. खुद



## बाबाजीराव गायकवाड यांची कैफियत

कैफियत नं. १२ / इ. स. १८४५

कैफीयत— बाबाजीराव बीन रघुनाथराव गायकवाड उमर वर्षे तीस जात मराठे कसब मानकरी राहणार मौजे आरल ता। सीतव सु।। सीत आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलिटिकल येजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आरब ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यात ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकाजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी याचे नांव डेरी आख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणून आज्ञा त्यास आहेत ती सनदापत्रे हजर करून त्या प्रकर्णी माहाईतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लि॰ प्रमाणे—

(१) आम्हाकडे मौजे दोदवडे ता। खानापूर हा गांव ईनाम हल्ली चालत आहे त्याचे उत्पन्न बाबती व हक्कदार वगैरे खर्च वजा जाऊन बाकी आम्हाकडे राहाती ती—

२४७८२ नकद पनाली रुपये
६।।१।१। गला केली नवसेरी माप

एकूण देहाय येक आकार रुपये दोनशेहे सत्तेचाळीस रुपये दोन आणे व गला केली साडेसहा खंडी सव्वा मण सव्वा पायली येणेप्रमाणे उत्पन्न आहे.

(२) सदरहु गाव संपादन करणारे आमचे तीर्थरुप रघुजीराव बीन कानोजीराव गायकवाड याजवर श्री शिवछत्रपती माहाराज स्वामी कृपाळू होऊन आमचे चुलते नारायणराव बीन कानोजीराव गायकवाड हे परशरामपंत यांचे

लढाईत स्वामी कार्यावर करवीरी खर्च जाहाले, म्हणून मौजे मजकुराबाबत सनदा करून दिल्या तेव्हापासून आजपर्यंत सुमारे ५१ वर्षे आम्हाकडे निरवेद चालतो.

(३) पहिले कलमांत लिहिलेले उत्पन्न संपादन करणार आमचे तीर्थरुप असून हाली वहिवाट आम्ही करीत आहो व या उत्पन्नास आम्हांसुद्धां चार विभागी आहो त्याचा तपशील

२ आमचे सख्खे चुलते तीर्थरुप राजेश्री विश्वासराव व आंबाजीराव बीन कानोजीराव गायकवाड

१ आमचे चुलत बंधु चिरंजीव राजेश्री नारायण बीन विठ्ठलराव गायकवाड

१ खुद्द आम्ही

येणेप्रमाणे सदरहु उत्पन्नास आम्ही चौघे सारखे विभागी आहो.

(४) सदरी पहिले कलमांत लिहिलेले उत्पन्नाबाबत हाल्ली सनदा हजर केल्या आहेत त्याचा तपशील--

राज सन १२६ रौद्रनाम संवत्सरे वैशाख शुध्ध ३ मिती या रवीवासरेच्या सनदा तीन

१ रघुजीराव बीन कानोजीराव गायकवाड यांचे नावे येक

१ देशमुखी देशपांडे ता। खानापूर यासी नांवे येक

१ मौजे दोदवडे ता। खानापूरचे नांव येक

एकूण सनदा तीन हाजर केल्या आहेत.

(५) पहिले कलमांत लिहिलेलें उत्पन्नाशिवाय आम्हांकडे आणखी कांहीएक उत्पन्न नाही व चौथे कलमांत लिहिलेले कागदाशिवाय उत्पन्नाबावत सनदपत्र काही नाही.

(६) सदरहु पांच कलम मजकूर लिहून दिला खरा आहे यांत कमीजास्ती जाहाले जे, सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण साहा कलमे लि॥ दिल्ही सही तारीख छ ८ माहे जीलकाद सन १७६७ मुक्काम तारीख ९ नवंबर सन १८४५ ईसवी

दस्तुर दाजी बाळाजी कुलकर्णी

नी॥ बाबाजीराव गायकवाड

सही

बाबाजीराव बीन रघुनाथराव गायकवाड द. खु.

साक्ष

१ सखाराम बलाळ रगोबीलकर

खास बारदार व बुक बारदार दस्तुर खुद

१ कृष्णाजी देवराव कारकून

## मानसिंगराव घोरपडे यांची कैफियत

कैफियत नं. ११४/इ. स. १८४७

कैफीयत मानसिंगराव बीन म्हालोजीराव घोरपडे जात मराठा उमर वर्षे ३० ईनामदार मौजे हसुर व हेबाळ, कर्यात नुल, पेटा गडहींगल सरकार करवीर सुमा सबा आरबेन मयातेन व आलफ. मेहरबान पोलीटीकल येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून आरव ६६ सन १८४५ ईसवीची याद आली, त्यात ईनाम, सरंजाम, देवस्थान, धर्मादाय, चालत आहे. त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळची सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी याचे नावे, वरी आरव ५६० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरुन सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा, त्यास आम्हाकडे ईनाम गाव चालत आहेत, त्याजबाबत सनदापत्रें मिळाली ती हजर करुन माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहीले प्रमाणे—

(१) आम्हाकडे हाली ईनाम गांव दोन कर्यात व पेटा मजकुरी चालत आहेत त्याचा आकार सन खमस आरबेन मयातेन व आलफ सालचे ईजमाली जमाखर्च वरुन

१५४४|||–मौजे हसुर चंपु याजबद्दल जमा रुपये १७२०

तपशील

१६६८|||≈ ऐन जमा

१४५६ जमीनीबद्दल

४०|||≈ रामनवमी पटी बाबत

१७२ जुडी नकदी

१६६८|||≈

४५॥ सायर जमा

१८॥ घर फाळा

२७ मोह तर्फ

६ जकायत कोमारकी

१७२०।≈ एकूण

यास खर्च तपशील

५८॥≈॥ देवस्थान

१४ धर्मादाय

२४ हुजूरबाब

३० हकदार

३०।– चिलर नेमणूक

१८।≈। सादीलवार

१७५॥–

बाकी रसद रुपये १५४४॥–

तपशील––

२१६॥≈ राजसबाई घोरपडे यांस हुजूर परवानगीवरून

३६० सुंदराबाई व येशोदाबाई व कृष्णाबाई यास दरमाहे ३० प्रो

५७६॥≈

९६७॥≡ रसद भरणा घोरपडे याजकडे

१५४४॥–

१०३९।–॥ मौजे हेबाळ यांजबद्दल जमा रुपये

१२६७॥≡

तपशील

८९३ रयेताव जमीन

१९६॥ जुडी ईनाम पटी

४२॥ नक्त बाव मोह तर्फ

५।· कसर जमा

३॥≈ भागा बद्दल
५० कुरण
१२ जकायत
६३८– वरगत पटी परभार
५८॥≈ श्रीरामनवमी उत्साहा बा॥
४८ ≡ देवस्की
६३८–
१॥ गुळढेप
१२६७॥ ≡

यासी खर्च तपशील रुपये

१५ हुजूर बाब सालाबाद
३७ ≡ ग्रामदेवाकडे
३८।· दसरा
२०॥≈ वर्षासन
२॥ आलावा मोहरम
३॥≈ शिमगा सण
१॥ देणगी किरकोळ
४४॥≈॥ सादीलवार किरकोळ दप्तर रोषणाई खर्च
६० श्री रामनवमीचे उत्साहाबद्दल
४॥· सालाबाद घोंगडे वगैरे

बाकी रसद ईनामदार याजकडे रुपये १०३९।–॥ येणे परंतु तपोनीधी भोजगीरी आमृतगीरी गोसावी याजकडे मौजे मजकूर रद्द कर्जात लावून दिला आहे सबब रसदी बेरीज बाबकड रद्द कर्ज होते—

(२) सदरहु गाव कैलासवासी शिवछत्रपती स्वामी यानी आमचे आजे मानसिंगराव घोरपडे यास ईनाम करार करून सुमा अर्बा मयातेन व आलफे म्हणजे सन १८०३ ईसवी साली सनदा करून दिल्या त्याप्रमाणे त्यानी व त्यांचे पुत्र म्हणजे आमचे वडील म्हाळोजीराव या उभयतानी अनुभविले. पुढे म्हाळोजीराव मृत्यु पावले. त्याचे पोटी संतान नाही. तेव्हां त्यांची मातोश्री पुण्यशील राजसबाई यानी कैलासवासी बावासाहेब माहाराज यांचे हुजूर विनंती

केली कीं, आमचे दीर सखाराम राव यांचे पुत्र वडील सुनेचे वोटेत देणेची आज्ञा व्हावी. म्हणोन त्याजवरुन म्हाळोजीराव यांची स्त्री येशोदाबाईचे वोट्यात आम्हास दत्तक देणेविषयी सुमा तीसा सलासीन मयातेन व आलफ म्हणजे सन १८३८ ईसवी साली राजसबाई आजींचे नांव व दोन्ही गावचे नाव आज्ञापत्रे सादर जाहाली. त्याप्रमाणे आम्ही दत्तक होवून ईनाम आनुभवीत आहो. पूर्व सनदेस वर्षे ४३ व मागील सनदेस वर्ष ८ जाहाली पूर्वापार सतत वहिवाट चालली आहे.

(३) सदरहु उत्पन्न संपादन करणार अमचे आजे व आम्ही वहिवाट करितो. या उत्पन्नापैकीं मौजे हेबाळ रद्द कर्जात आहे व मौजे हसुरचे उत्पन्नात हिशाचा तपशील:—

२१६॥।~ सखी आजी राजसबाई कोम मानसिंगराव उर्फ बाळासाहेब घोरपडे याजकडे मौजे मजकूर पैकीं जमीन चालत आहे त्याजबद्दल रुपये

१२० सापत्न आजी सुंदराबाई कोम मानासिंगराव यांस दरमाहे १० प्रमाणे रुपये

२४० मातोश्री येशोदाबाई व सापत्न मातोश्री कृष्णाबाई या उभयतास दरमहा १० रुपये प्रमाणें सालीना रुपये

२०० चुलत बंधु दाजीराव बीन चंद्रोजीराव घोरपडे यांस सालीना

७६७॥। ≡ खुद्द मानासिंग

येणे प्रमाणे हिस्से हुजूर हुकूमाने जाहाले. त्या अन्वये खर्चास देतो व मौजे हेबाळ रद्द कर्ज उघडल्यावर त्यांतील हिस्सा कोणास न मिळता सनदे अन्वये दरोबस्त आम्हाकडे येणे व सरकारचे आज्ञापत्र सादर होईल तेव्हा हुजूर हजर होवून आज्ञा होईल ती मान्य करणेची वहिवाट आहे.

(४) सदर पहिले कलमी लिहिले उत्पन्नाबाबत सनदा च्यार हजर केल्या आहेत त्या ता।।

१ मानासिंगराव घोरपडे यांचे नांवे सु।। आर्बा मयातेन व आलफ छ २५ माहे शोवालचे येक नंबर १२५४. सुमा तीसा सलासीन मयातेन व आर्बे छ १६ माहे शाबानची तीन—

१ पुण्यशील राजसबाई घोरपडे यांचे नांवे येक नंबर १२५५
१ मोकदमानी मौजे हसुरचे नांव येक नंबर १२५७
१ मोकदमानी मौजे हेबाळचे नांव नंबर १२५६
४ येकूण चार सनदा आसल दिल्या आहेत

(५) सदर पहिले कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी चालते उत्पन्न व सनदा नाहीत.

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न व मजकूर लिहून दिला खरा आहे. यांत काहीं कमिजास्ती जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास मान्य आहे. एकूण सहा कलम लिहून दिली सही छ ५ माहे जमादिलावल शके १७६९ तारीख २१ माहे येप्रील सन १८४७ ईसवी दस्तुर

साक्ष

आनंदराव आप्पाजी नी॥ घोरपडे
सही मानसिंगराव बीन म्हालोजीराव घोरपडे
ईनामदार मौजे मजकूर दस्तुर खुद

१ सुबराव कृष्ण सरदेशकुलकर्णी तो। हवेली दस्तुर खुद्द
१ फरंगोजी नाईक दस्तुर खुद्द—

## घाटगे झुंजारराव घराण्याची कैफियत

कैफियत / इ. स. १८४५

कैफीयत संताजी बिन मानाजी घाटगे झुंजारराव उमरवर्षे ६५ जात मराठे कसब सरदारीचे. राहणार करवीर. सुरु सन सीत अरबैन मयातेन व अलफ. मेहरबान पोलिटीकॅल एजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक यांजकडून ऑरव ६६ सन १८४५ इसवीची याद आली. त्यात इनाम, सरंजाम, देवस्थान, धर्मादाय, चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर, त्याखाली मुख्य कारभारी यांचे नावे डेरी अरव ५५० सन १८४५ इसवी चा शेरा जाहला. त्याजवरुन सनदा पत्रे असतील ती दाखवावी व सनदा प्रकरणी माहीतगारीचा मजकुर लिहून देणे म्हणून आज्ञा जाहली. त्याजवरुन लिहून देतो तो मजकूर खाली लिहिले प्रमाणे:

(१) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

२०० रुपये मौजे अंबापूर ता।। सातवे, एकुण देहे अेक प्रमाणे आकार अजमासे

भवानी शंकर पागेकडून बारगिरीचे चाकरीबद्दल नख्त रुपये वीस पावले आहेत त्याची कैफीयत व कागदपत्रे देऊन दखलबाज कलम लिहीले आहे

(२) सदरी कलमात लिहिलेले उत्पन्नास संपादन करणार आमचे सावत्र बंधू सटवाजी बिन मानाजी घाटगे. याचे कारण असे आहे की भवानराव प्रतिनिधी कऱ्हाडकर हे लष्करासुद्धा कवठेच्या मुक्कामी लढाईचे इराद्याने आले त्याजवरुन महाराज सरकारातून लष्कर रवाना झाले. त्यातून आमचे वडील मानाजी बिन जिऊराव घाटगे हेही गेले. तेथेच लढाईत ठार झालेवरुन महाराज शिवछत्रपती स्वामी कृपाळू होऊन मौजे अंबापूर हा गांव आमचे बंधू सटवाजी

यांचे नावे सनदा होऊन इनाम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करुन दिला. त्यापासून आजतागायत सतत आम्हाकडे सुमारे ६० वर्षे चालत आहे.

(३) संपादन केल्याचा मजकूर सदरी कलमात लिहीलाच आहे व पहिले कलमात लिहीलेले उत्पन्नास हिस्सेदार आहो त्याचा तपशील

१ खुद्द आम्ही, संताजी घाटगे

१ आमची भावजयी सकवारबाई कोम सटवाजी बिन मानाजी घाटगे

१ आमचा पुतण्या राणोजी बिन येसाजी घाटगे.

अेकूण तीन आसामी पहिले कलमातील उत्पन्नात हिस्सेदार आहोत. या उत्पन्नाबाबद सरकारात चाकरी करावी लागत नाही.

(४] पहिले कलमात लिहीले उत्पन्नाबाब्रत सनदा पत्रे हजर केली त्याचा तपशील.

तीन सनदा राजशके १११ क्रोधीनाम संवत्सरे आश्विन बहुला षष्टि इंदुवासरे

१ सटवाजी बिन मानाजी घाटगे याचे नांवे

१ देशमुख उर्फ देशपांडे तर्फ शिराळे व ता।। सातवे यांचे नांवे

१ गंगाजी दळवी नामजाद व आबाजी राम व कारकून किला पन्हाळा याचे नावे

ताकीदी छ ११ माहे जिलकाद सन खमस समानेन मयातेन व अलफ आज किल्ले पन्हाळा

१ तां हा मोकदमानी मौजे थेरगांव ता।। शिराळे यांचे नांवे

१ तां हा मोकदमानी मौजे चरण ता।। सातवे याचे नांवे

येणे प्रमाणे पांच कागद सदरी लिहिले त्याविषयी पहिले कलमात लिहिलेल्या उत्पन्नाबद्दल सनदपत्र आपल्याजवळ काही नाही.

(५) पहीले कलमात लिहीलेल्या उत्पन्नात आणखी काही अेक उत्पन्न आम्हाकडे नाही व चौथे कलमात लिहीलेल्या कागदाशिवाय उत्पन्नाबाबत सनदपत्र काहीअेक नाही.

(६) सदरी पांच कलमात मजकूर व उत्पन्न लिहून दिल्हे हा मजकुर खरा आहे. यात काही कमीजास्त झाल्यास नी।। सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे

एकुण सहा कलमे लिहून दिली सई ता. छ. १६ माहे रमझान शके १७६९ विश्वावसु नाम संवत्सरे. इंग्रजी तारीख १९ माहे सपटेंबर सन १८४५ इसवी दस्तुर नरसो रामचंद्र नानवडेकर मु।। करवीर साक्ष

१ लक्ष्मण जनार्दन कारकून नी।। सरलष्कर

१ सदाशिव गोविंद नी।। भोपे दस्तुरखुद्द.

सई संताजी बिन मानाजी घाटगे झुंजारराव निशाणी खुद्द हातची, करार दस्तुर नरसो रामचंद्र नानीवडेकर मु।। करवीर.

## सदाशिवराव जोती दिवाण यांची कैफियत

कैफियत नं. ६ / इ. स. १८४५

कैफियत सदाशिवराव जोती दिवाण उमर वर्षे सुमारें ५५ जात देशस्थ ब्राह्मण कसब कारकुनीचे रा. कोल्हापूर सुमा सित आरबेन मयातेन व अलफे मेहरबान पोलिटीकल येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून अंक ६६ सन १८४५ इसवीची यादी आली त्यांत इनाम सरंजाम धर्मदाय देवस्थान चालत आहे. त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंक नंबर ५५० सन १८४५ इसवीचा शेरा होऊन आला त्याजवरुन सनदापत्रें असतील ती दाखवावी म्हणोन अैसीयास आम्हाजवळ आहेत ती सनदापत्रें हजर करुन सनदा प्रकर्णी मजकूर लिहून दिले ते खाली लिहिले प्रमाणें —

(१) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील.

२५०२ देह ४ सुमारें उत्पन्न रुपये

१००० मौजे कारवे ता।। कोडोली येकूण

८८२ मौजे निरवडे देह १ येकूण

४४० मौजे कळे तर्फ कळे देह १ येकूण

१८० मौजे माणगांव तर्फ कल्हे देह १ येकूण देह ४

२५०२

४१५ जमीनीबद्दल

१२० का।। कुबोला जमीन बिघे ८१० येकूण

१०० मौ.जे आळते बिघे ८१० येकूण

पावणे दहा बिघे दीड पांड

२० मौजे बालगे ताा हवेली बिघे ८६
४५ मौजे केरली तर्फ ठाणे बिघे ८२० येकूण रुपये ७० आकार पैकी बागा बदल वजा रुपये ५२ बाकी
२० किता मौजे केरली बिघे ८५ येकूण
२० मौजे चुये तर्फ हवेली बिघे ८५ येकूण कैफीयत नंबर ६ सन १८४५ लगत
२५ मौजे नागांव तर्फ हवेली बिघे ८५ येकूण
२५ मौजे केरवले तर्फ हवेली येथील जमीन बिघे १० येकूण आकार रुपये पंचवीस बंगला अडीच मण
०कुरण जमीन
१ मौजे कुडु तर्फ हवेली बिघे जमिनीचा अजमास नाही परंतु गवत येते ते सुमोरें ६००००
१ मौजे इसपुर्ली तर्फ हवेली जमीन अजमास नाहीं परंतु गवताचे उत्पन्न येते ते सुमारे ७५०००

२९१७ ४१५ देह ४ बिघे ०॥। १ गला ८२॥ गवत १३५००

येकूण देह चार व जमीन बिघे एकावण व शिवाय कुरणे दोन. येकूण नक्त रुपये दोन हजार नऊशे सतरा रुपये व गल्ला खंडी चार कैली व गवत सुमारी एक लक्ष पस्तीस हजार येणे प्रमाणें उत्पन्न येत आहे.

(२) आमचे चुलते रत्नाकर राम[1] यानी महाराज सरकार कारभार सुसूत्रपणें केला. ते मृत्यु पावले नंतर आम्ही व त्यांचे पुत्र नारायणराव रत्नाकर विभक्त जह्याले. नंतर महाराज सरकारात विनंति केल्यावरुन आबासाहेब[2] महाराज कृपाळू होऊन हुकेरी प्रांती पांच हजार उत्पन्नाची गांवे दिल्ही. त्याप्रमाणें दहा अकरा वर्षे सुमारे आम्हाकडे आले. ते गांव कंपणी सरकारात गेल्यानंतर सुमारे दोन तीन वर्षानंतर बावासाहेब महाराज कृपाळू होऊन सदरी कलमात लिहीले उत्पन्नाच्या सनदापत्रें दिल्यापासून आजतागायत सतत सुमारे बारा तेरा वर्षे आम्हाकडे चालत आहे.

(३) संपादक आम्हीच असोन वहिवाटही आम्ही करीत आहो. व या उत्पन्नास हिश्येदार आम्हा शिवाय कोणी नाही. व चाकरीही कोणती करावी लागत नाहीं. परंतु सरकार स्वारीबरोबर जात येत असतो.

(४) पहिले कलमात लिहीले उत्पन्नाबाबत सनदापत्राचा तपशील खाली लिहील्याप्रमाणें--

देह चार. याजबद्दल छ १९ जिलकाद सन सलास सलासीन मयातेन व आलफच्या आज्ञापत्रे--

१ खुद्द नावे यांत मौजे कल्हे व मौजे चिंचवडे व मौजे मानगांव व मौजे केरवले येकूण देह चार.

१ मामला धर्म संवस्थान यांचे नांवे त्यांत मौजे कल्हे व मौजे चिंचवडे व मौजे मानगांव येकूण देह तीन.

१ मामला मोकादमानी मौजे केरवले ता।। कोडोली यांचे नांवे

१ खडोजी निकम मुद्राधारी व आत्माराम बयाजी किले पावणगड यांचे नांवे

१ मोकादमानी मौजे चिंचवड तर्फ कल्हे याचे नावे

१ मोकादमानी मौजे कल्हे तर्फ कल्हे यांचे नांवे

१ मोकादमानी मौजे मानगांव तर्फ कल्हे यांचे नांवे

१६ जमीनीबद्दल आज्ञापत्रे ३ क।। कुंभोज दहा बिघे बद्दल २० मोहरम सन समान आसरीनच्या

१ उफनांव

१ मोकादमानी क।। मजकूरी यांचे नांवे

१ खासगी मामला यांचे नांवे

२ मौजे आळते छ ७ जमादिलावल सन आर्बा सलासीन मयातेन आलफेची साल्ये दाहा बिघे दिड फडाबद्दल

१ मोकादमानी क।। आळते यांचे नांवे

१ माहाल भोवानीशंकर पागा यांचे नांवे

३ मौजे बावडे तर्फ हवेली छ १६ जमादिलावल सन सबा आशरीन मयातेन व आलफे बीस बिघेबद्दल

१ खुद्द नांवे

१ मोकादमानी मौजे मजकूर यांचे नांवे

१ सदाशीव बाबुराव काटे करवीर यांचे नांवे

३ मौजे केरली तर्फ ठाणे छ २५ मोहरम सन खमास सलासिन मयातेन व आलफे वीस बिघे बद्दल

१ खुद्द नांवे

१ मोकादमानी मौजे मजकूरचे नांवे

१ खंडोजी निकम मुद्राधारी व विठल आबाजी किले पावणगड याचे नांवे

३ मौजे केरवले तर्फ कोडोली छ २५ रजब सन आर्बा सलासीन मयातेन व आलफेची वीस यकर जबीन बिघे तीस याजबद्दल

१ खुद नांवे

१ मोकादमानी मौजे मिजकूरचे नांवे

१ खंडोजी निकम मुद्राधारी व आत्माराम बापोजी किले पावणगड याचे नांवे

० किला मौजे केरली बिघे पांच व मौजे चुये बिघे ८५ पांच व मौजे मानगांव बिघे ८५ पांच येकूण बिघे पंधराबाबत सनदापत्रे नाही.

१ कुरणाबद्दल

मौजे कुरडू ता॥ हवेली येथील कुरणाबद्दल छ २८ शौवल सन आशरीन मयातेन आलफेचे इसपुर्ली येथील कुरणाबद्दल सन गैरविल्हेस पडली.

१ मौजे इसपुर्ली तर्फ हवेली येथे गुराचे घर जमीन दिल्ही यांजबद्दल छ ७ माहे रमजान सन शित अशरीन मयातेन व आलफे मोकादमानी यांचे नांवे

एकूण कागद वीस आम्हाजवळ उत्पन्नाबद्दल होतें ते हजर केले आहेत

(५) पहीले कलमात लिहीलेप्रमाणे या उत्पन्ना शिवाय आणखी कांहीं उत्पन्न नाही. चौथे कलमांत लिहीले प्रमाणें सनदापत्राशिवाय उत्पन्न आपले सनदपत्र हुजुरून आम्हाजवळ कांही नाही.

(६) सदरी पांच कलमांत उत्पन्न व मजकूर लिहून दिल्हेला खरा आहे. यांत कमीजास्ती जाहाल्यास सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

एकूण सहा कलमे लिहून दिल्ही सही तारीख छ २४ माहे रमजान शके १७६७ विक्रमनाम संवच्छरे भाद्रपद व।। ११ इंग्रजी तारीख २७ सपटंबर सन १८४५ इसवी दस्तूर गोविंद भिमाजी दामले नि।। कारकून मशार निल्हे दिवाण

| साक्ष | सही |
| --- | --- |
| १ नारो गोविंद नि।। शिंदे नेसरीकर यांची साक्ष | सदाशीवराव जोती दिवाण दस्तूर खुद |
| १ बाबाजी गणेश पेंडशे नि।। पाटणकर द. खु. | अंताजी बल्लाळ टिकेकर सनदापत्राचे चौकशीदार |

(१) रत्नाकरपंत राजाज्ञा

(२) छत्रपती आबासहेब महाराज (इ. स. १८१२ ते १८२१)

## व्यंकटरावं पाटणकर
## यांची कैफियत

कैफियत नं. २४ / इ. स, १८४६

कैफीयत—व्यंकटराव बीन नागोजीराव पाटणकर उमर वर्षे २५ जात मराठे रा. का।। करवीर सुमा सीत आरबेन मयातेन व आलफे मेहरबान पोलिटीकल येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून आंक ६६ सन १८४५ इसवीची यादी आली त्यांत इनाम सरंजाम व देवस्थान धर्मादाय चालत आहे. त्या त्या लोकांच्या सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यांस आहेत ती सनदापत्रें हाजर करून त्या प्रकर्णी माहीतीचा मजकूर लेहून देतो तो खाली लिहील्याप्रमाणे

(१) हाल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील—

१ मौजे नांदणी का।। शिराळे प्रांत रायबाग हा गांव इनामी येथील हक्कदार व बाबती वगैरे खर्च वजा जाता बाकी नक्त पनाळी ४१०१।।-। रु.

२ देशमुखी तो।। तारळे येथील वतनी गाव २ येथील हक्कदार व बाबती वगैरे खर्च वजा जाता बाकी निवळ रुो

१ मौजे पिरळ ता।। मजकूर देहाय १ २१९ नक्त ४।· गला कैली दशेरी मापे ४ खंडी

८८९।। उफगांव मापे सेर नऊ

१ मौजे सावर्डे ता. मजकूर एकूण देहाय १

५९८ नक्त रुपये

८।।=।। गल्ला दशेरी मापें साडे आठ खंडी अडीच मण

१ देशमुखी ता॥ तारळे येथील गावगन्ना देह सुमार १०१॥ येथील इनाम जमीन व नक्त हक्क वगैरेसुद्धा आकार रुपये गल्ला येकूण देह येकशे दीड येकूण आकार नक्त

पनाळी रुपये सतराशे बासष्ट दाहा आणे व गल्ला कैली सदुसष्ठ खंडी पाच मण पावणे आठ्याण्णव व तूप माफी गाव मापे साडे सहा मण सवा सात शेर येणेप्रमाणे येकूण देह ३ व देशमुखी व नाईकीबाबत व ईनाम जमीन बिघे ०।।।१७८३ यास आकार यात नक्त रुमये सहा हजार सातशे अठ्याऐशी सवा नऊ आणे व गल्ला कैली दशेरी मापे साडे सात खंडी २॥ मण व तुप गांव मापे साडे चार मण दीड शेर येणेप्रमाणे उत्पन्न आहे.

(२) सदरहु उत्पन्न संपादन करणाराचे नावे कोणत्या कारणावरून कोणी कधीं दिल्हे, आल्यापासून सतत चालत आहे किंवा कसे त्याचा तपशील

१ मौजे नांदणी क॥ शिराळे प्रात रायबांग हा गांव धारादत्त ईनाम व मौजे मजकूर येथील नाईकीचे वतन व मौजे धरणगुत्ती क॥ शिरहटी येथे मळा बिघे ८१० व मौजे नागांव तर्फ हवेली येथील कुरण उपयोगेचे खर्चास येणेंप्रमाणें आमची मातुश्री कैलासवासी चीमाबाई आकासाहेब यांस कैलासवासी आबासाहेब महाराज यानी करार करुन सनदा करुन दिल्या त्यास सुमारे बत्तीस वर्षे जाहाली त्यापासून आम्ही सतत आनभवीत आहो.

१ मौजे पीरळ व मौजे सावर्डे तर्फ तारळे देशमुखी गावगन्ना ता॥ मजकूर येथील देह सुमार १०१॥ हे पूर्वापार आम्हाकडे चालत आहेत. कैलासवासी संभाजी महाराज यांचे कालकिर्दीत आमचे तर्फेनें वहीवाटदार होता. त्यानें मालकाचा ऊजूर न धरीतां खुद मालकपणें सदरहु उत्पन्न अनुभऊ लागला तेव्हां उत्पन्न जप्तीस ठेऊन चौकशीअंती सदरहु उत्पन्नाचे मालक आम्ही खुद ठरलो तेव्हां कैलासवासी आबासाहेब महाराज छत्रपती यांनी पुन्हा ताज्या सनदा करून दिल्या. त्यास सुमारे वीस वर्षे जाहाली. तेव्हांपासून सदरहु उत्पन्नाची वहीवाट आम्हाकडे सतत चालत आहे.

(३) सदर दुसरे कलमाचे पहिले रकानेत लिहीले उत्पन्न संपादन करणार आमची मातुश्री व दुसरे रकानेंत लिहीले उत्पन्न संपादन करणारी आमची मातुश्री व दुसरे रकानेत लिहीलेले उत्पन्नात विभागी आम्ही खुद व आमचे कनिष्ठ बंधु चिरंजीव राजश्री रामचंद्रराव बीन नागोजीराव पाटणकर हे

सारखे त्रिभागी आहोत व या उत्पन्नाबद्दल सरकारांत चाकरी करण्याची वहीवाट नाहीं नेहमी हजर असावें लागते.

(४) पहीले कलमांत लिहीले उत्पन्नापैकीं सनदापत्रें आम्हाजवळ होती ती हाल्ली हजर केली आहेत त्याचा तपशील

२ मौजे नांदणी का॥ इचलकरंजी येथील नाईकीचे वतनाबद्दल

१ तारीख छ २६ माहे सफर ति॥ मातुश्री चीमाबाई आका पाटणकर याचे नांवे

१ सुमा अर्बा आशरेन मयातेन आलफे छ २६ माहे सदर आज्ञापत्र मोकादमान मौजे माचे नांवे

१ मौजे धरणगुत्ती का॥ शिरहटी येथील मळा जमीन छ १८ माहे सौवनची सनद तीर्थरुप मातुश्री चिमाबाई आक्का पाटणकर यांचे नांवे

१ मौजे पीरळ व मौजे सावर्डे ता॥ तारळे येकूण दोन गांवची सनद येक सुमा सब आशरीन मयातेन व आलफे छ ४ माहे जमादिलाखरची व्यंकटराव पाटणकर म्हणजे खुद्द आमचे नांवची

२ ता॥ तारळे येथील देशमुखीचे वतनाबाबत सुमा सीत आशरीन मयातेन आलफे छ २९ माहे रबीलावलच्या सनदा दोन

१ व्यंकटराव पाटणकर म्हणजे खुद्द आमचे नांवे एक

१ मोकादमानी देहाय गांवगन्ना ता॥ तारळे याचे नांवे एक

येकूण सहा कागद आम्हाजवळ होते ते हजर केले आहेत. बाकी पहिले कलमांत लिहीले उत्पन्नापैकीं मौजे नांदणी का॥ शिराळे का॥ रायबाग या गांव इनामा व मौजे नांगाव बु॥ ता॥ हवेली येथील कुरण यांजबद्दल सनदा होत्या त्या कोणीकडे गैरविलेस गेल्या आहेत त्यांचे ठिकाण लागत नाहीं व सदरहू सहा कागदाशिवाय उत्पन्नाबद्दल आम्हाजवळ सनदपत्र काही येक नाही.

(५) पहीले कलमात लिहीले उत्पन्नाशिवाय आणखी काहीं येक उत्पन्न चालत नाहीं. अवलच्या कलमात लिहीलेल्या सनदापत्राशिवाय सनदापत्रे काहीं येक नाहीं.

(६) सदरी याचें कलमात उत्पन्न वतनदार लेहून दिलेला खरा आहे. यात काहीं कमी जास्ती जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकून सहा कलमे लेहून दिल्ही सही छ २२ माहे शके १७६७ विश्वासुनाम संवंच्छरे तारीख १९ माहे फेब्रूवारी सन १८४६ इसवीं दस्तूर गोविंद कृष्ण काळे नि॥ पाटणकर

सही व्यंकटराव बीन नागोजीराव पाटणकर
द. खुद रामचंद्रराव याचे

साक्ष
१ गोविंद बलाळ जोशी
हल्ली करवीर
१ राघो रामचंद्र कारकून नि॥ लष्कर,

अंताजी बलाळ
सनदापत्राचे चौकशीकडे.



## रघुनाथ बाजी रेणावीकर यांची कैफियत

कैफियत नं. १८ / इ. स. १८४५

कैफीयत रघुनाथ बाजी रेणावीकर उमर वर्षे ४० जात देशस्थ ब्राह्मण कसब सरदारीचे राहाणार करवीर सुमा सीत आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल यजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून अंक ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यात ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या लोकांजवळच्या सनदापत्रें पाहुन कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रें असतील ती दाखवावी व सनदा प्रकर्णी माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिलेप्रमाणें—

(१) आम्हाकडे हाल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील—

८०० मौजे कासार पुतळे ताा तारळे येकूण देहे यक येकूण आकार दरोबस्त गला व नक्त सुद्धां अदमासे रुपये येकूण आठशेहे रुपये आजमासे उत्पन्न आहे. पो वजा बाबती वगैरे ५०० बाकी आकार रुपये ३००.

(२) सदरी कलमांत लिहिले उत्पन्न संपादन करणार आमचे तीर्थरुप यानी सरकार सेवा येकनिष्ठपणानें केल्यावरून शिवाजी माहाराज कृपाळू होवून मौजे मजकूर व मौजे कासारवाडा व मौजे नंदवाल येकूण तीन गांव दिले. ते गांव तीर्थरुप यांचा काल होईपर्यंत आम्हांकडे चालत होते नंतर तीन गांव पो दोन गाव मौजे कासारवाडा व नंदवाल हे शिवाजी माहाराज यांनींच सरकारात घेवून मौजे कासार पुतळे हा गांव आम्हास खुनकाटेबद्दल दिला. यांची हकीगत अशी आहे की— कापशीकर सेनापती घोरपडे यानी माहाराज

सरकाराबरोबर लढण्याचा ईरादा केल्यावरून माहाराज सरकारातून लष्कर रवाना जाहाले त्यावेळी आमचे तीर्थरुप हे लष्करात प्रमुख असून लढाईच्या कामांत जखमा लागोन ठार जाहालेवरुन शिवछत्रपती यांनीं खुद आम्हास सदरहु गाव दिला. त्यावेळीं आम्ही लहान असल्यामुळें सनदपत्र करुन घेण्याचे जाहाले नाहीं. परंतु दिलेपासून व पूर्वी वडिलांचे वेळीपासून आजतागायत सतत सुमार पाऊणशेहे वर्षे आम्हांकडे चालत आहे. शक मितीचे स्मरण नाही—

(३) संपादन केल्याचा मजकूर सदरी कलमांत लिहिला आहे व पहिले कलमांत लिहिलेले उत्पन्नास हिस्सेदार आम्हाशिवाय दुसरा कोणी नाहीं व या उत्पन्नाबाबत म्हणोन चाकरी करावी असें नाहीं परंतु वडिलापासून आम्ही सरकारचे पदरचे सबब येथे राहून चाकरी भले लोकांत करीत आहो.

(४) पहिले कलमांत लिहिले उत्पन्नाबाबत सनदपत्र नसण्याचें कारण दुसरे कलमांत लिहीलेच आहे. सबब सनदपत्र कांहीं नाहीं.

(५) पहिले कलमांत लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी कांहीं येक उत्पन्न आम्हाकडे नाहीं व सनदपत्र कांहीं नाहीं.

(६) सदरी पांच कलमांत उत्पन्न व मजकूर लिहून दिलेला खरा आहे यांत कांहीं कमीजास्ती जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण सहा कलमें लिहून दिली

सही तारीख १९ रमजान शके १७६७ भाद्रपद वा ७ ईंग्रजी तारीख २२ सपटेंबर सन १८४५ ईसवी व फसली सन १२५५

दस्तुर सखाराम बल्लाळ रेणावीकर
पतक बंदुक बारदार मुा करवीर

सही—रघुनाथ बाजीराव रेणावीकर
दस्तुर खुद

साक्ष

१ रघुनाथ कृष्ण सबनीस दस्तुर खुद
१ बापुजी विश्वनाथ निा लष्कर फड दस्तुर खुद

समक्ष जाहाली ताा मजकूर
अंताजी बल्लाळ टिकेकर नी।। सरकार करवीर
सनदा पत्रांचे चौकशीकडे.

## नाईक निंबाळकर वाठारकर घराण्याची कैफियत

कैफियत नं. ४६ / इ. स. १८४५

कैफियत जोत्याजीराव नाईक बिन आप्पाजीराव नाईक निंबाळकर वाठारकर उमर वर्षे ५५ जात मराठे मु. करवीर सुा सबा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आख ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यांत इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे. त्याजबद्दल त्या त्या लोकांच्या सनदापत्रें पाहून कळवावें म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी याचे नांवे डैरी आंख ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरून जी सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आहेत ती सनदापत्रे हजर करून त्या प्रकर्णी माहितीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणें कलम

(१) आम्हाकडे हल्लीं उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

| | |
|---|---|
| १००१।=॥ | इनामगांव मौजे नेज देहे १ येक याचा आकार हल्ली वसूल बेरीज रु. १६५४।॥≡ पैकीं वजा हक्कदार व गांवकर वगैरे ६५३॥.॥ रु. जाऊन बेरीज बाकी |
| ३००५४≡॥ | सरंजामी गांव देहे पांच चालत आहेत त्याचा आकार |
| १६१॥. | मौजे मोरबा प्रांत रायबाग ३५० रु. पैकी वजा गांव खर्च व हकदार वगैरे बाकी |
| १९३॥=) | मौजे येडराव प्रांत रायबाग आज बेरीज रु. ३३७॥=॥ पो वजा गाव खर्च व हकदार वगैरे १४३॥.॥ रु. बाकी व |
| ५२।-॥. | मौजे बेबनाळ प्रांत रायबाग १४० रु. पो वजा गांव खर्च व हकदार वगैरे ८७॥=॥. रु. बाकी |

१३९६॥।≡ मौजे बस्तवाड का। शिरहट्टी आज खेरीज रु. १८९१॥- पो वजा गाव खर्च व हकदार वगैरे ४९४॥= बाकी

१२००॥- मौजे येडराव का। रुकडी आज खेरीज १७५७।= पो वजा गाव खर्च व हकदार वगैरे ५५७८- रु. बाकी

३००५८≡॥

४००६॥=

येकूण इनाम व सरंजाम मिळून गांव सहा याचा आकार दरसाल चार हजार सहा दहा आणे नक्त आम्हास पावतात

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशाकरितां कधी दिले व दिल्यापासून वहिवाट कशी चालत आहे त्याचा तपशील

१ इनामगांव मौजे नेज आमची मातोश्री कैलासवासी भवानीबाई नींबाळकर हे सुा समस अशरीन मयातेन अलफ म्हणजे इंग्रजी सन १८१२ साली श्री मन्माहाराज कैलासवासी बाबासो छत्रपती यांस आमची बहीण आंबाबाई (कैलासवासी) सो महाराज दिली, त्याचे लग्नाकरितां करविरी आली ते समई कैलासवासी शिवछत्रपती महाराज यांनी चोळी काकणाबद्दल इनाम पुत्र पौत्रादी वंश परंपरेने करार करून आमचे मातुश्रीचे नांवे सनदा करून दिल्या त्यास चवतीस ३४ वर्षे जाहाली तेव्हांपासून आजपर्यंत आम्हाकडे सतत अव्याहत वहिवाट चालत आहे.

१ सरंजामी गांव ५ सदरी लिहीले ते पूर्वी आमचे तीर्थरुप कैलासवासी आप्पाजीराव नाईक निंबाळकर पुणें मुक्कामी होते ते वेळी निपाणकर यानीं राजमंडळीस सिलसिला केला होता. तेव्हां कैलासवासी शिवछत्रपती महाराज यांनीं श्री भाऊ महाराज याजला पुण्यास मेहेरबान आलपिष्टन साहेब बहादूर याजकडे पाठविले ते समई सरकारचे कामकाजाचा उपयोग हरबाबे मदत देऊ नये व चाकरी तुम्ही करावी म्हणोन आज्ञापत्रे आली त्याजवरून वडील सरकार कामाचे उपयोगी पडले. तेव्हा शिवाजी महाराज छत्रपती यानी दोन कलमाची

याद दिली त्यात तुम्हास पंचवीस हजार रुपयांचा सरंजाम देऊ म्हणोन लिहिले व सरकारचे हातची चिठी मोकदम्याप्रमाणे राजश्री बहिरजी बापू भोसले याजबरोबर वडिलाकडे पाठविली. पुढे सेवाचाकरीबद्दल सरंजाम महाराजानी द्यावयाचा तो महाराज स्वर्गस्त जाहालेनंतर आमचे वडीलही कैलासवासी जाहाले. पुढे कैलासवासी श्री मन्माहाराज बावासाहेब राज्य करू लागल्यावर आम्ही वाठाराहून थोरले महाराजांनी वचन दिल्याबद्दल मजकूराचे पाठविले ती माहिती या महाराजास होंती. त्याचे स्मरण धरुन आम्हांस सन १२३१ फसली साली आज्ञापत्र आले. त्याप्रमाणें आम्ही आमचे धाकटे बंधू चिरंजीव धोंडजीराव नाईक निंबाळकर यांस हुजूर पाठविले. त्यानंतर महाराजांनी दहा हजार रुपयाच्या सरंजामात देहे सात सन आर्बन अशरीन म्हणजे इंग्रजी सन १८३२ साली चिरंजीवाचे नांवे करार करुन सनदा करुन दिल्या त्यास बावीस २२ वर्षें जाहाली ते गांव स्वाधीन करुन घेतले त्याचा तपशील—

| | |
|---|---|
| १ मौजे हेबाळ | १ मौजे मोरबा प्रांत रायबाग |
| १ मौजे हसूर | १ मौजे येडराव प्रांत रायबाग |
| १ मौजे करवी | १ ” बेबनाळ प्रांत रायबाग |
| १ मौजे यमापूर | |
| ४ | ३ |

येणे प्रमाणें सात गांव चालत होते. पुढें मौजे १ हेबाळ व मांजे हसूर हे दोन गांव मानसिंगराव घोरपडे याचे सबब त्यास दिल्हे. आणी त्यांचे मोबदला इंचल प्रांत मुरगूड हा गांव आम्हाकडे दिला.

हा गांव सन समा अशरीन पो चालले पुढें चिकोडी मनोळी कुंपणी सरकारात गेली. त्यांत आमचे गांव गेले ते

१ मौजे करवी १ मौजे यमापूर १ मौजे इंचल तीन गांव जाऊन बाकी तीन, गांव रायबाग प्रांतातील राहिले ते १ मौजे मोरबा १ मौजे येडराव १ मौजे बेमनाल येणेप्रमाणें तीन गांव राहिले. त्या संधीसच आमचे बंधू

धोंडजीराव नाईक कैलासवासी जाहाले. पुढें आम्हास ये विषई आज्ञापत्र आलेवरून आम्ही हुजूर आलो तेव्हां सदर गांव गेले त्याचा मोबदला आमचे खर्चाचे निर्वाहाबद्दल १ मौजे यडरांव कसबा रुकडी व मौजे, बस्तवाड कसबा शिरहट्टी हे दोन गांव सन तिसा अशरीन म्हणजे इंग्रजी सन १८२८ सालीं सरंजामास दिले. त्याच्या सनदा चिरंजीव राजश्री आप्पाजीराव बिन धोंडजीराव नाईक निंबाळकर आमचे पुतणे यांचे नांवे करुन घेतल्या त्यास आठरा वर्षे जाहाली. येकूण पांच गांव संपादन केल्यापासून आजपर्यंत सतत सरंजामास चालत आहेत.

(३) सदरहू उत्पन्न संपादन आमचे तीर्थरुप व मातोश्री व कनिष्ठ बंधू व आमचे पुतणे असोन हल्ली वहिवाट आम्हांकडे चालत आहे. या उत्पन्ना-बद्दल फारखती होऊन विभाग जाहाले नाहीत एकंदर वहिवाट चालत आहे. सदरहू उत्पन्नास आम्ही व आमचे पुतणे चिरंजीव राजेश्री आपाजीराव नाईक निंबाळकर हिसेदार आहे. सरंजामाबद्दल सरकार चाकरी येक खाश्यानी मानकरी यांचे इरावाने हुजूर करावयाची आहे.

(४) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबद्दल आम्हाजवळ सनदा पत्र होती ती हजर केली आहेत. त्याचा तपशील इनाम गांवे मौजे नेज देहे येक याजबद्दल आज्ञापत्र पांच.

३ राज शके १३९ अंगिरानाम संवत्सरे श्रावण शुा ५ सोमेण वासरची तीन

१ चिरंजीव सौभाग्यवती भवानीबाई यांचे नांवे येक

१ देशमुख व देशपांडे तो आळते प्रांत हुकेरी यांचे नावे एक

१ मोकदमानी मौजे नेज तो अळते प्रांत हुकेरी यांचे नावे येक

२ सुा समस अशेर मयातेन व आलफ छ २६ माहे जमाकरची दोन

१ चिरंजीव सौभाग्यवती भवानी निंबाळकर यांचे नावे एक

१ मोकदमानी मौजे नेज प्रमाणें मौजे अळते याचे नावे एक

२ सरंजामात गांव पांच त्याबद्दल आज्ञापत्र––

१ येक मौजे येडरांव व मौजे मोरबा व मौजे बेबनाल प्रांत रायबाग याजबद्दल सुा आर्बा अशरीन मयातेन व आलफ छ ३ माहे राा खरचे आज्ञापत्र राजश्री धोंडजीराव नाइक

निंबाळकर यांचे नांवें एक

१ मौजे बस्तवाड कसबा शिरहट्टी याजबद्दल सु॥ तिसा अशरीन मयातेन व आलफ छ २९ माहे जिल्हेजचे मोकदमाचे नांवचे एक

० मौजे येडरांव कसबा रुकडी याजबद्दलची सनद सादर जाहाली असोन हल्ली तपास करतां सांपडत नाहीं. सबब हजर करावयास आम्हाजवळ नाहीं.

येकूण सात सनदा आमच्याजवळ आहेत, त्या हजर केल्या आहेत.

(५) पहिले कलमांत लिहीले उत्पन्नाशिवाय कांहीएक उत्पन्न या सरकारातून आम्हांस नाहीं. व चवथे कलमांत लिहील्या सनदा पत्राशिवाय सनदा काहींएक नाहींत.

(६) सदरी पांच कलमांत मजकूर व उत्पन्न लिहून दिलें खरें आहे यांत कांहीं अंतर नाहीं. कलम

येकूण सहा कलम लीहून दिली सई तारीख २ माहे आगस्त सन १८४६ इसवी छ ९ माहे साबान, श्रावण शुा १० रविवार शके १७६८ पराभवनाम संवत्सरे दस्तुर श्रीपत बाबुराव निा भाऊसाहेब नाईक निंबाळकर वाठारकर

साक्ष जोत्याजीराव नाईक निंबाळकर

१ आपाजी आबाजीराव आवळीकर
निा हिमतबहादर दस्तुर खुद्द

१ कृष्णाजी नरसिंव्ह नि॥ राचोजी
सुबराव जाधवराव देसाई नाडगौडा
प्रांत रायबाग दस्तुर खुद्द

अंताजी वामन टिकेकर निा लष्कर
व सनदापत्राकडील काम पाहाणार.

(प्रश्न)

अंताजीराव बिन धोंडजीराव निंबाळकर वाठारकर हे तुमचे पुतणे म्हणोन आकारी लिहितां, तुम्हास करवीर सरकाराकडून इनाम खेरीज करुन जाहागीर गांव ताा

| | |
|---|---|
| १ मौजे येडरांव का। रुकडी | १ मौजे बस्तवाड कसबा सीरहट्टी |
| १ ,, येडराव प्रांत रायबाग | १ मौजे मोरबा प्रांत रायबाग |
| १ ,, बेबनाल प्रांत रायबाग | ० लग |

मिळोन पांच गांव तुम्हीं आपले नांवे चालत आहेत म्हणोन सदरी खातें नमूद केले आहे व तुमचे पुतणे आपले कैफियतीस निराळे लिहून देतात. हे व ते दोन्ही गांव येकच वा निरनिराळे. येकच असल्यास आपआपल्या दाव्याप्रमाणें विभागल्या होय तसें न करितां हे उत्पन्न हल्ली वसूल कोणाकडेंस येते हे तुम्हांस समजावयाजोगे लिहावें.

विनायक रघुनाथ काळे.

( उत्तर )

सदरहू सरंजामी गाव आम्ही लिहून दिले तेच चिरंजीवानी लिहिले. निराळे नाहींत. घराण्यात आपआपल्या दाव्याप्रमाणें विभागल्या हवे तर सदरहू उत्पन्नाबद्दल विभाग झाले नाहींत. येकत्र वहिवाट असोन सदरहूचा हल्ली वसूल कांहीं आम्हाकडे खर्चास व कांहीं चिरंजीवाकडे खर्चास घेतला आहे. येडराव रुकडी हा गांव चिरंजीवाचे ताब्यात व तीन गांव सावकाराकडे चिरंजीवाकडून रद्द कर्जास आहेत. मिळोन त्याचा आमचा विभक्तपणा नाहीं. सबब चिरंजीव व आम्ही तेच गांव लिहीले. वडीलपणा आमचा आहे. ये विषई सर्व हकिगत सदरी कैफियतीत लिहीली आहे.

जोत्याजीराव नाईक निंबाळकर.

## मुजूमदार
## घराण्याची कैफियत

कैफियत नं. ५९ / इ. स. १८४६

कैफियत— आऊबाई कोम दौलतराव भगवंत मुजुमदार दिा पीलखाना उमर वर्षे ४० जात प्रभु वस्ती कसबे करवीर सुा सबा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल एजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक यांजकडून आंख ६६ सन १८४६ ईसवीची याद आली त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे. त्याबद्दल त्या त्या लोकाजवळच्या सनदा पाहुन कळवावे म्हणोन मजकूर त्या खाली मुख्य कारभारी याचे नांवे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरुन सनदापत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हांकडे वतनी ईनाम वगैरे चालते त्याच्या सनदापत्रे मिळाली ती हजर करून याजबद्दल माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिलेप्रमाणें—

(१) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील मौजे कुकुडवाडी ताा तारळे एकूण गाव एक याजबाबत आकार सालगुदस्त उठवली प्रमाणें—

८१।॥=॥ नक्त रुपये २५८।– पो वजा बाबती वगैरे त्याचा

उपशील--

४५॥ माहाली हाकदार

६॥ वर्षासनकरी

१३ गांव नी॥ हकदार

१९ देवस्थान खर्च

४।–।॰ चिलर खर्च

८७॥· हुजूरबाब

१७६।-।

बाकी आम्हाकडे पावतात.

८४८-।. गला केली सदरी मापे ६॥।·॥=

पैकी वजा बाबती वगैरे—

पो वजा बाबतो वगैरे—

१८४॥=॥ माहाली हाकदार

१।· वर्षासनकरी

०।८८॥ गाव नीा हाकदार

०।=। देवस्थान

०।८।≡॥ भांडेखर्च व हकदार निा शिपाई यास

२॥१॥० ·॥

बाकी ४८४८१० यासी आकार दर मणी रुपये १ प्रमाणें

येकूण रुपये

१६६

एकूण आकार येकशेहे सासष्ट रुपये आम्हास गावाकडून पोहोचतात.

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कधी कशाकरितां दिले व दिल्यापासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील—

मौजे कुकुडवाडी ताा तारळे पेटा भुदरगड हा गांव आमचे पणजे सासरे बाळको······यानी मस्तीचा हत्ती सरकार समक्ष धरला. सबब श्रीमन्महाराज छत्रपती संभाजी महाराज कृपाळू होवून बक्षीसी दिला त्यास अदमासे १२५ एकशेहे पंचवीस वर्षे होत आली. तेव्हापासून सदरहु गांव सतत अनभवीत आहो, व गावाबद्दल सनदापत्रे सरकारातून मिळालेली मौजे मजकुरी घर होते. प्राचीन राहाणेची वहिवाट तेथेच होती. तेव्हां दाखलेचे वगैरे कागदपत्राचे रुमाल तेथे होते ते घर दग्ध जाहालेमुळे कागदपत्र वगैरे कांहीएक घरातून निघाले नाही. याजमुळे शक मिती लागत नाही.

(३) सदरी लिहिले उत्पन्न संपादन करणार आमचे पणजे सासरे बाळको······हे असून हल्लीं वहिवाट आम्ही करीत आहो व या उत्पन्नास

हिस्सेदार आम्हाखेरीज दुसरे कोणी नाही व सरकार चाकरी सदर गाव रांड रोटी बद्दल आहे. गावाबाबत चाकरी करावी लागत नाही. हत्ती माहलाकडील लिहिण्याचे चाकरीबद्दल रोजमुरा दरमाहे रुपये ८ व कोठी कडून शेर २ मिळत होते त्या पैकी हाल्ली बारमाहीचे शिरस्तेने तीन रुपये प्रमाणें मिळाले. अलीकडे माहे रमजान व माहे शवल दोन महिने पगार मिळाला नाही. कारखान्यात लिहिणेची चाकरी करीत आहो.

(४) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबद्दल सनदपत्र आमचे आजे सासरे दौलतराव बळवंत हे लढाईत गोळ्या लागून ठार जाहाले त्या वेळेस सदरहु गांव रांडरोटीबद्दल म्हणोन श्रीमन्महाराज मातोश्री जिजाबाईसाहेब यानी सनदा करुन दिल्या होत्या. त्या मौजे मजकूरी घर दग्ध जाहाले याजमुळे कागदपत्री दाखला आम्हापासी राहिला नाहीं. गावची वहिवाट वडिलापासून आजतागायत आम्हाकडे चालत आहे. गावसंबंध कागदपत्र आम्हापासी काही नाही भोगवटा चालत आहे.

(५) सदरी पहिले कलमात लिहिल्या उत्पन्नाशिवाय आणखी सरकारातून कांहींएक नाही. सनदपत्र नाही याजबद्दलचा मजकूर चवथे कलमी लिहिला आहे.

(६) सदरी पाचवे कलमात उत्पन्नाबद्दल मजकूर लिहिला आहे हा खरा आहे यात काही कमीजास्ती जाहाल्यास जे सरकार आज्ञा करतील ती आम्हांस कबूल आहे.

येकूण साहा कलमे मजकूर लिहून दिला

सही तारीख छ ३ माहे जीलकाद शके १७६८ ईंग्रजी तारीख २६ आक्टोबर सन १८४६ ईसवी दस्तूर–बाबाजी अनंत कारकून दि॥ पीलखाना

सहीची माळ

आऊबाई कोम दौलतराव भगवंत मुजुमदार यांचे

हातची दस्तूर–बाबाजी अनंत दि॥ पीलखाना

साक्ष

१ सिवराम आत्माराम कुलकर्णी माजनाळकर

१ रामचंद्र निंबाजी माईणकर नी॥ राघो गंगाधर वैद्य दस्तुर खुद्द

(सही) आप्पाजी लक्ष्मण जोशी सनदापत्राचे काम पाहाणार.

## रामचंद्र पानसे यांची कैफियत

कैफियत नं. ५६१ / इ. स. १८४८

कैफीयत बेहमी रामचंद्र आत्माराम पानशे जात देशस्त ब्राह्मण उमर वर्षे सुमारे २४ राहाणार कसबा तारळ पेटा भुदरगड मुखत्यार नी।। सीताबाई कोम खंडो भगवंत पानशे राहाणार कसबा मजकूर सुमा समान आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल येंजट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आरव ६६ सन १८४५ ईसवीची यादी आली त्यात ईनाम धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या लोकांजवळ सनदापत्र पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांव आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरुन सनदापत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हाकडे ईनाम जमीन आमचे चुलते मयत खंडो भगवंत याजकडे जमीन चालत होती ती हल्ली ते मयत सबब सरकारांतून साल मजकुरी जप्ती जाहाल्यामुळें चालत नाहीं. ते चुलते जिवंत असतां त्याकडे चालते जमीनीबाबत मामलेदार पेटा पनाळा याचे समोर कैफीयत तारीख २४ माहे सपटेंबर सन १८४५ ईसवीची लिहून दिली ती शिरस्त्याप्रमाणें नसल्यामुळें करवीरी हजर होण्याचा हुकूम मे. मामलेदार पेटा भुदरगड यानीं कळवून ता. २२ डिसेंबर सन १८४७ ईसवीचे मुखत्यार पत्रासुद्धा रवाना केले त्याजप्रमाणें हजर होवून आमचे चुलते मयत साल मजकुरी जेष्ठ शुा। रोजीं मयत पावले ते जिवंत असतां त्याजकडे जमीन चालत होती त्याजबाबत सनदापत्रावरुन व माहितीचा मजकुर लिहून देतो ती कलमें—

(१) आमचे चुलते याजकडे जमीन साल गुदस्ता सन सबा आरबेन पर्यंत चालत होती त्याचा आकार साल गुदस्तप्रमाणें.

१७॥ मौजे कुडित्रें ताा तारळ येथे जमीन बिघे ८५ याचे उत्पन्न गल्ला खंडी १ यासी दर अदमासे मणी येक रुपयाप्रमाणें एकूण रुपये २० पो वजा ईनाम पटी बद्दल दर बिघा ०॥ प्रो एकूण रुपये २॥ बाकी रुपये

१९ कसबा तारळ येथे जमीन भात रोप ८२ व माळ जमीन ८४ येकूण जमीन सहा बिघे पैकी उत्पन्न गला एक १ खंडी येकूण आकार दर सदरहुप्रमाणें पैकी वजा भात रोप जमीनीस वजई दर बिघा ०॥ प्रो येकूण रुपये बाकी

१३॥· मौजे कळकवाडी ताा तारळ येथे जमीन ८३ पो उत्पन्न गल्ला ०॥। दरमणी येक १ रुपया प्रो येकूण रुपये १५ पो वजा ईनाम पटी बद्दल रुपये १॥ बाकी रुपये १३॥·

६ मौजे कथेवाडी ताा तारळ येथे जमीन बिघे ८२ पो उत्पन्न गला ०॥ दरमणी रुपया १ प्रो येकूण रुपये १० पो वजा ईनाम पटीबद्दल दर बिघा रुपये २ प्रो येकूण रुपये ४ बाकी रुपये

२ मौजे मानवड तर्फ तारळ येथे जमीन बिघे ८२ पो उत्पन्न गल्ला ०।० येकूण रुपये ५ पो वजा ईनाम पटी दर बिघा रुपये १॥ पो येकूण रुपये ३ बाकी रुपये

२ मौजे घुडेवाडी ताा तारळ येथे जमीन ८३।३॥ पो उत्पन्न गला ८२ येकूण रुपये

६० जमीन तेरीज येकूण गला ३॥२ पो वजा
८२१!≡।। ईनामपटी ·॥· बाकी ३

येकूण साठ रुपयाचे उत्पन्न संपादन केलेपासून साल गुदस्त पर्यंत आमचे चुलते खंडो भगवंत याजकडे बीन हरकत चालत आले साल मजकुरी जेष्ठ मासी खंडो भगवंत मयत जाहाले सबब साल मजकुरी जमीन जप्तीस सरकारातून ठेविली करिता मयत यांची बायको व आम्ही उभयता मीळोन आमची जमीन अम्हांस मिळावी म्हणून अर्ज करणेस आलो आहे.

(२) सदरी पहिले कलमी उत्पन्न लिहून दिले ते उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशाकरितां दिले, दिलेपासून वहिवाट कोणत्या प्रकारे चालत आली म्हणोन आज्ञा त्याचा जाब—

१ मौजे कुडित्री येथे जमीन ८५ व का। तारळ येथे जमीन ८२ व मौजे कळकवाडी येथे जमीन ८३ येकूण दहा बिघे मिळाली त्याचे कारण आमचे चुलते मयत खंडो भगवंत याचे पणजे शामजी रुद्र यासी कैलासवासी शंभू राजे छत्रपती माहाराज यानी किले पनाळ्यास बादशहाचा वेढा पडला होता त्यावेळेस शामजी रुद्र हे सरकार कामास उपयोगी पडल्यामुळें माहाराज कृपाळू होवून ईनाम मौजे कथेवाडी ८१० व मौजे होरवाड येथे ८१० येकूण जमीन वीस बिघे देवून सनदा करुन दिल्या त्याप्रो आमचे आजे भगवंत रामचंद्र याचे कारकीर्दीपर्यंत जमीन चालत आली. पुढें चिटकोपंत कमावीसदार तारळेकर याचे व आमचे चुलते खंडो भगवंत याचे बदमानस आले. सबब खंडो भगवंत परागंदा होवून मौजे तिटवे येथे राहिले. सबब सदरहु जमीन सरकारात वीस बिघे आमानत होती. त्यास आमचे चुलते तिटवेहून का। तार्ले येथे आलेनंतर कै।। बाबासाहेब माहाराज यासी अर्ज केल्यावरुन वीस बिघे जमीन पो मोबदला दाहा बिघे जमीन सदर तीन गावी देवून सन खमस सलासीन मयातेन व आलफ म्हणजे इंग्रजी सन १८३५ ईसवीच्या करुन दिल्या त्यास वर्षे सुमारे १३ जाहाली तेव्हापासून आमचे चुलते साल मजकुरीं मयत जाहाले तारखेपर्यंत बीन हरकत चालत आली.

१ कसबा तारळ येथे जमीन साहा बिघे पो दोन बिघे जमीनीचा तपशील सदरीं लिहिला आहे. बाकी चार बिघे माळ जमीन मिळाली त्याचे कारण का। मजकूर येथील सरकारचा वाडा आमचे चुलते खंडो भगवंत यास गावकर यानीं सांगून जबाब दिला त्याजबद्दल किले पनाळे येथील मामलेदार यास गावकर यानी विनंती केली की मशार नीले यास वाडे संमंधे खर्च पडला सबब चार बिघे माळ जमीन देणेची आज्ञा व्हावी. म्हणून त्याजवरुन मामलेदार यानी सदरहु जमीन देवून सन खमस सलासीन मयातेन व आलफ म्हणजे इंग्रजी सन १८३५ ईसवी सनद करुन दिली त्यास वर्ष सुमारे १३ जाहाली त्या पासून साल गुदस्त पर्यंत चालत आली.

१ मौजे कथेवाडी ता। तारळ येथे जमीन ८१० दाहा बिघेची सनद

सरकारातून दिली त्याज पो दोन बिघे जमीन पदरी पडली. सदरहु जमीनीबद्दल कैलासवासी शंभू छत्रपती यानी आमचे चुलते खंडो भगवंत यांचे पणजे शामजी रुद्र यास राज शके ५१ क्रोधीनाम संवत्सरे चालत आहे.

१ मौजे मानवड ता। तारळ येथे जमीन ८२ दोन बिघे आम्हाकडे चालत आहे परंतु ती जमीन कोणी दिली व कोणी मिळविली याची आम्हास माहिती नाही व सनदापत्रही आम्हाजवळ नाही. याजमुळें शके मिती लागू शकत नाहीं. परंतु आजमासें सोळा वर्षे वहिवाट चालली आहे.

१ मौजे घुडेवाडी ता। तार्ळे येथे जमीन ८३।३॥ कोणी दिली व कोणी मिळविली याची माहिती नाहीं. व याजबद्दल मागील कागदपत्र नाहीं. आलीकडे सुमा खमस सलासीन मयातेन व आलफ म्हणजे इंग्रजी सन १८३५ ईसवीची ताकीद पनाळे कडून आमचे चुलते खंडो भगवंत यांचे नांवे मिळाली त्यास वर्षे सुमारें १३ जाहाली तेव्हांपासून सदरहु जमीन बीन हरकत चालत आहे.

(३) सदरहु पहिले कलमी लिहिले उत्पन्न संपादन करणार कोण व या उत्पन्नास विभागी किती आहेत व याजबद्दल सरकारात चाकरी करावी लागत होती किंवा कसें. त्यास संपादन करणार शामजी रुद्र, खंडो भगवंत यांचे पणजे व खंडो भगवंत असे दोन असामी असून हल्ली वारस खंडो भगवंत यांची स्त्री सीताबाई व पुत्र दोघे एक पांच वर्षाचा व एक दोन वर्षाचा असे आहेत. व या उत्पन्नास विभागी—

| | |
|---|---|
| १ लक्ष्मण भगवंत पानसे | १ खुद्द रामचंद्र आत्माराम |
| १ खंडो भगवंत यांची स्त्री | १ बापु भगवंत हल्ली मयत वर्षे सुमारे ३ जाहाली |

येणें प्रमाणें विभागी बरोबर असून ईनाम जमिनीबद्दल चाकरी वगैरे करणेची वहिवाट नव्हती.

(४) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाबद्दल सनदा हाजर केल्या त्याचा तपशील पेटा पनाळा येथे खंडो भगवंत यानी कैफीयेत देतेवेळी सनदा सुमारें १७ हजर केल्या त्याज पो मौजे होरवाड येथे जमीन बिघे ८१० ची सनद मिळाली. परंतू जमीन चालत नसल्यामुळें सदर जमिनीची सनद राजे शके ५१ क्रोधीनाम संवत्सरे शंभु छत्रपती यांनी दिलेली सदर उत्पन्नास लागू

नसल्यामुळें रोज मजकुरी पावती लिहून देवून सनद परत घेतली. बाकी सनदा १६ हल्ली उत्पन्नास लागू आहेत त्यांचा तपशील—

९ मौजे कुडीत्रे येथे जमीन बिघे ८५ व का। तार्ले येथे ८२ व मौजे कळकवाडी येथे ८३ येकूण दाहा बिघे जमिनीच्या सनदा

५ हुजुरच्या सु॥ खमस सलासीन मयातेन व आलफ माहे शाबान छ ९ पो।

१ खंडोजी भगवंत यांचे नांव

१ राणोजी दळवी, नाना जाधव व सदाशीव आप्पाजी किल्ले पनाळा यांचे नांव

१ मोकदमानी मौजे कुडीत्रीचे नांव

१ मोकदमानी का। तार्लेचे नांव

१ मोकदमानी मौजे कळकवाडीचे नांव

४ किल्ले पनाळेकडून सुमा खमस सलासीन मयातेन आलफ माहे साबान छ १२ पो

१ खंडो भगवंत याचे नांव

१ मोकदमानी मौजे कुडुत्रीचे नांव

१ मोकदमानी का। तारळेचे नांव

१ मोकदमानी मौजे कळकवाडीचे नावे

१ का। तार्ले येथे माळ जमीन बिघे ८४ त्याची सनद मोकदमानचे नांव किले पनाळे कडील सु॥ खमस सलासीन मयातेन व आलफ माहे शाबान छ १२ तारखेची सनद एक

४ मौजे कथेवाडी येथे जमीन ८१० व मौजे होरवाड येथे जमीन ८१० येकूण वीस ब्रिघेच्या सनदा असून दोन ब्रिघे जमीन कथेवाडी येथे चालत आहे. दोन ब्रिघे जमीनीबद्दल दुसरी सनद मिळाली नाही त्याजकरीता पूर्वी मिळाल्या सनदा दाखल केल्या त्या राज शके ५१ क्रोधीनाम संवत्सरे

२ श्रावण बहुल २ भानुवासरे

१ व कारकून वर्तमान याचे नांव

१ शामजी रुद्र याचे नांव

२

२ भाद्रपद श्रुा १३ भृगुवासरे

१ देशमुख व देशपांडे यांचे नांव

१ मोकदमानी मौजे कथेवाडीचे नांव

२ मौजे घुडेवाडी येथे जमीन ८३।३।। त्याजबदली किल्ले पनाळे कडील सनदा दोन सुमा खमस सलासीन मयातेन व आलफ छ २९ सवालच्या

१ खंडो भगवंत याचे नांव

१ मोकदमानी मौजे घुडेवाडीचे नांव

१६ येकूण सनदा सोळा चालते उत्पन्नाबद्दल हजर केल्या आहेत.

५ सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय दुसरे उत्पन्न नाही व चवथे कलमी दाखल केल्या सनदाशिवाय दुसरे सनदपत्र काहीं नाहीं.

६ सदरी पांच कलमी मजकूर लिहून दिला हा खरा आहे यात कांहीं कमीजास्त जाहाल्यास सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण सहा कलमी मजकूर लिहून दिला सही तारीख छ २५ माहे मोहरम शके १७६९ प्लवंग नाम संवत्सरे इंग्रजी तारीख ३ माहे जानेवारी सन १८४८ ईसवी दस्तुर–चिमाजी सखाराम

मही रामचंद्र आत्माराम पानसे मुखत्यार नी ।।

सीताबाई कोम खंडो भगवंत पानसे

साक्ष

१ कृष्णा नरसिंह नी।। घोरपडे

१ मोरो दिनकर राहाणार करवीर दस्तुर खुद

सवाल

सदरी चवथे कलमी तुम्ही १६ सोळा सनदा नमूद केल्या पो राज शके ५१ क्रोधीनाम संवत्सरे भाद्रपद श्रुा १३ भृगुवासरे रोजीं छत्रपती श्री राजा शंभु स्वामी यांनीं देशमुख व देशपांडे यांस राजश्री शामजी रुद्र पानसे याजकडे ईनाम जमीन मौजे कथेवाडी ८१० व मौजे होरवाड ८१० एकूण वीस बिघे वंशपरंपरे चालविणे विषयीं दिली ती सनद पाठीमागे दोन ओळी लिहून पुरी जाहली तेथे शिरस्त्याप्रमाणें मोर्तब १ असोन या मागील दोन ओळीवर दुसरा एक चार बोटे रुंदीचा कागद चिकटविलेला आहे त्याजवर सरकारचे निशाण व मोर्तब येक १ दिसते हे कोठील व दुसरा कागद कोणी कधी कशाकरितां चिकटविला ते सविस्तर लिहून देणे

जबाब

सदरहु सनद जीर्ण होवून मध्येच उभी फाटली म्हणून मजबुती करितां मागलें बाजूने दोन ओळी लिहिल्या आहेत त्या सुद्धा दुसरा रद्दी कागद चिकटविला तो आमचे चुलते मयत खंडो भगवंत यांचे वेळचा पेट्याकडे सनदा गुजरल्या त्याचे अगोदर पासून आहे. हा रद्दी कागद सरकारच्या ताकीदी वगैरे रद्दी दाखल होता त्याचा फाडून लाविला त्याच कागदावरचे निशाण व मोर्तब दिसते. आम्ही नवीन मोर्तबा केले किंवा करून घेतलेली नाही. दुसरे सनदेचा रद्दी कागद जाहाला तोच फाडून मोर्तबा निशाण सुद्धा या सनदेस लाविला असे

येणेप्रमाणे प्रश्नाचे उत्तर लिहून दिले सही तारीख सन मजकूर

सही

रामचंद्र आत्माराम पानसे मुखत्यार
निा सीताबाई कोम खंडो भगवंत

साक्ष

१ गोविंद नारायण बागेवाडीकर

कैफियत खंडो भगवंत पानसे राहाणार कसबा तारळे हे मयत जाहाले कारणानें उत्पन्न जप्त जाहाले सबब कीर्दीस जमा न होता सनदा अमानतीत असलेप्रमाणें राहून कैफीयत दप्तरी होती. सबब मयताचे उत्पन्न अमानत जाहाले या कारणानेंच कैफीयेत जमा जाहाली नसेल, तर हल्ली ते उत्पन्न मयताचे स्त्रीकडे चालू वा कसे व चालू जाहाले असेल तर मग ही पूर्वी सन १८४८ ईसवी साली आपलेकडे जाहालेली कैफीयेत अमानती पो सनदा सुद्धां खास करावे लागतील. यास्तव तपशीलवार खुलासा लिहून येणे या विषयीं रावबाहादुर मुख्य कारभारी नी॥ सरकार करवीर यासी नंबर २४ तारीख २६ माहे जून सन १८५१ ईसवीचे पत्र गेल्या साली भुदरगड मामलेदार मार्फत काम चालून अखेर रावबाहादुर याजकडून ईनाम चौकशी प्रकर्णी नंबर ५५ तारीख १३ माहे जुलई सन १८५१ ईसवीचे उत्तरांत उत्पन्न खुले होवून बाईकडे चालते तेव्हां कागदाचा निकाल आपलेकडून होणे आहे म्हणोन लिहून आल्यावरुन आज तारीख १६ माहे जुलई सन १८५१ ईसवी रोजी कीर्दीस कैफीयेत सनदा पत्रा सही जमा खास करण्यात आली असे—तारीख मजकूर सन मजकूर

नाना मोरोजी

## सर्जेराव विचारे यांची कैफियत

कैफियत नं. १६ / इ. स. १८४५

कैफियत सर्जेराव बिन आबाजीराव विचारे येलेवाडीकर उमर वर्षे २० जात मराठे रा. येलेवाडी सुरू सन सित आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकियाल एजंटसाहेब बहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आंख ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी याचे नावे डेरी आंख ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्याजवरुन सनदापत्रे प्रकर्णी माहितगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहील्याप्रमाणे

(१) आम्हांकडे हल्ली उत्पन्न मौजे येलेवाडी तो मलकापूर हा गांव चालत आहे. याजबद्दल उत्पन्नाचा तपशील—

दुतर्फेमुळे किले विशाळगडाकडे ऐवज जाऊन बाकी राहातील तो अजमास खाली लिहिल्याप्रमाणें

२८।≡।।। जे दान आकार रुपये १०२।।।– पो जे विशाळगडाकडे पंचद्वाही हिशे दोन वजा जाऊन बाकी ऐवज पो गाव बाबती व सरकार बाबतीसुद्धा एकंदर खर्च वजा होऊन बाकी आम्हाकडे

० गला कैली १८१८≡।। पैकी वजा सदरी लिहिलेप्रमाणे बाबतीकडे आदा होऊन बाकी आम्हाकडे ८४।–

२८।≡।।। ८४।–

(२) संपादन करणार आमचे आजे सुभानराव विचारे हे कैलासवासी श्री शिवाजीमहाराज यांचे कालकिर्दीत लढाईत गोळ्या लागून जखमी जाहालेवरून महाराज कृपाळू होऊन मौजे येलेवाडी तर्फ मलकापूर हा गांव इनाम करून देविल्य तागायत आजपावेतो सतत आम्हाकडे चालत आहे. सदरहु सनदपत्रे दिलेली, आमचे घर दग्ध जाहाले त्यावेळेस येकंदर जिंदगीत दग्ध जाहाली व गांव कधी दिला याचे शक मितीचे स्मरण काही नाही.

(३) सदरी पहिले कलमांत लिहिलेलें उत्पन्न संपादन करणार आमचे आजे सुभानराव विचारे असोन हल्लीं वहिवाटही आम्हीच करीत आहोत व या उत्पन्नास हिशेदार आमचे चुलते दौलतराव विचारे आहेत. त्यास सदरहू उत्पन्नापैकी निम्मा हिस्सा द्यावा लागतो व या उत्पन्नाबद्दल आम्हास सरकारस्वारी बाहेर गेल्यावेळीं चाकरीस यावे लागते व करवीर मु॥ हुजूरचे आज्ञापत्र आले असता येणेची वहिवाट आहे.

(४) पहिलें कलमांत लिहिलेले उत्पन्नाबद्दल सनदपत्र आम्हाजवळ काहीं नाहीं.

(५) पहिले कलमांत लिहिलेले उत्पन्नाशिवाय आणखी आम्हाकडे काहीं उत्पन्न नाहीं व चवथे कलमात लिहीलेप्रमाणें सनदपत्रही नाहीं.

(६) सदरी पांच कलमात लिहून दिले हें खरें आहे. यांत कमीजास्ती जाहल्यास सरकार आज्ञा करतील ती आम्हांस कबूल आहे.

येकूण सहा कलमें लिहून दिली सही तारीख छ २५ माहे जिलकाद शके १७६७ ते दि. २६ माहे नोव्हेंबर सन १८४५ इसवी दस्तुर लक्ष्मण गंगाधर शेवडे मु॥ करवीर

साक्ष — सहीची निशाणी सर्जेराव विचारे यांचे हातची दस्तुर लक्ष्मण गंगाधर शेवडे

१ बाबाजी बापोजी फडणीस
नि. द. खु.

१ लक्ष्मण शामराव दि॥
हशमे दस्तुर खुद्द

दप्तरी दाखल ता. २६ नोव्हेंबर सन १८४५
अंताजी वामन टिकेकर नि॥ लष्कर

## हिंदुराव घोरपडे गजेंद्रगडकर घराण्याची कैफियत

कैफियत नं. १८९ / इ. स. १८४७

कैफीयत कृष्णराव नरसिंह देशपांडे परगणे पेनगोडा निसबत श्रीमंत राजश्री दौलतरांव साहेब घोरपडे हिंदूराव संस्थान गजेंद्रगड सुमा समान आरबेन मयातेन व आलफे मेहेरबान पोलीटिकल येजंट बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आंरव ६६ सन १८४६ इसवीची याद आली त्यांत इनाम सरंजामी धर्मादाय चालत आहेत त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळ सनदानपत्र पाहून कळवावी म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आख ५५० सन १८४६ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्र अस्सल दाखवावी म्हणोन हुजूरचे आज्ञापत्र घोरपडे यांचे नांवे छ २९ रजब छ ३० रमजान सन १८४७ इसवीचे आज्ञापत्र सादर जहाले. त्याचे उत्तर करवीर सरकारास आमचे नांवे मुखत्यारी कैफीयत वगैरे लिहून सही करुन देतील त्यास आम्ही मान्य आहो, म्हणून सन मजकूरचे छ २ जिलकादचे विनंतीपत्र आले ते हुजूर हजर केले.

शेरा नंबर १७८४ तारीख २३ माहे आक्टोबर सन १८४७ इसवींचा जाहाल्याप्रमाणें आम्ही घोरपडे हिंदूराव याजकडून मुखत्यार होऊन घोरपडे मजकूर यासी इनाम गांव व महाल सरदेशमुखी वगैरे वतन बाब सरकारातून मिळून आजपर्यंत चालत आहे त्याजबद्दल हकीकत कळवून लिहून देतो असें की

(१) कलम पहिले

५२४७।।-।।।· नक्त उत्पन्न अखत्यार खर्चसुद्धा आकार सर्व

१६९८।०। मौजे सांगवडे कसबा सावगांव प्रांत हुकेरी या गांवचे एकंदर जमीन ६। ११८=।।०

१ मौजे सांगवडे वतनी इनाम बाबत

१ उंस दर मोळेस २५ प्रमाणें
१ रसाची घागर दर मनेस १ प्रमाणे
१ गुळाची साय दरमनास ८४८ प्रमाणें
१ चांभाराकडून चर्मी जोडा
१ महाराकडून राबनुक
१ गुरवापासून २०० पत्रावळी
१ सदरप्रमाणें कुंभार माल कुंभाराकडून
१ सुतार लव्हार काम लागेल तसे
१ मळे निहाय मळेतील कडीळे सरकारी
१ तांबोळ्यापासून दररोज विड्याची पानें
१ गावी रयत वगैरेचे घरी लग्नमुहूर्त वगैरे कार्य जाहल्यास माफक येतात

१ चैत्रमासी यात्रेत पद्धतीप्रमाणें दर दुकानीं चीरमुरे व खारीक व मिठाई व काकण व गुरुवापासून नारळ पांच व दर गाडी रु ।· चार आणे जसेजसे ज्या यात्रा भरले तसतसे उत्पन्न येते

१ शिवाय कसबदार व बलोतदार वगैरे जे असतील त्यापासून कार्यावार व राबनूक वगैरेसुद्धां.

१ सदर देशमुखी वतनांत नक्ती व गला खेरीज करून बाबी चालतात ते—

१ खालसा गांवे १९३ पैकी—

१ देह ४३ दरगांवास
१ पत्रावळी २०० प्रो
१ चर्मी जोडा १ प्रो
१ कुंभार माल १ प्रमाणें
१········भार १ प्रमाणें

१ दुमालेगांव १६२ या गांवावर
१ देह सुमार १२ तर्फ हवेली
१ पत्रावळी २०० प्रमाणें
१ कुंभार माल १ प्रमाणें
१ ····भार १ प्रमाणें
१ चर्मी जोडा १ प्रमाणें
१ देहे ५ चर्मी जोडा १ प्रमाणें
१ कसबा मीकापूर येथे मुकाम
१ देह १६२ यासी शिपाई वसूलास कोठे कामास गेले असतां पोटगीबद्दल शिदा देणेची. त्याचा स्वस्ताई महागाईने आकार लेहु सकत नाहीं.

१ श्री महालक्ष्मी क्षेत्र करवीर निवासनी याचे संस्थानातून मिळणेचे—
१ आश्विन महिनेत नवरात्रास
१ दररोजीना प्रसादिला ताट
१ पूर्णावतीचा नारळ
१ चैत्रमासी रथ उछाहाचा नारळ

१ सरकार श्री मन्महाराज छत्रपती यांचे दरबारात सदर सालात कचेरी जाहाले वेळी दसरा दिपवाळी व गुडीचा पाडवा असोन वगैरे लग्नमुहुर्त वेळी कचेरीत मानाचा विडा प्रथम व कारणपरत्वें वस्त्र व दसरा मान करीता प्रथम विडा वगैरे

(२) पहीले कलमांत लिहीले उत्पन्न संपादन कोणी केले व कशाकरिता कधी कोणी दिल्हे ते दिवसापासून वहीवाट कशी चालत आहे म्हणोन आज्ञा. त्यांचे उत्तर.

आमचे यजमानाचे संस्थानातील मुळ पुरुष माहालोजीराव घोरपडे यांस श्रीमन्महाराज शिवछत्रपती हे तक्ताभिषेकाचे वक्ती मागील वगैरे शूरत्वामुळें कृपाळू होऊन वतन वगैरे इनाम करून दील्हे. त्याबद्दल व त्यानंतर राजशक १८ प्रज्यापतीनाम संवत्छरे श्रीमन्महाराज राजाराम छत्रपती व राजशके ४३ दुर्मुखी-नाम संवत्छरे श्रीमन्महाराज शंभु छत्रपती इत्यादी महाराज छत्रपती यानी दिले ते

सुद्धां कालपरत्वेन चालणेचे खेरीज करून हाली चालणेची पहीले कलमांत लिहिले आहे. परंतु सर्व देणगीबद्दल सनदपत्र दाखवावा, तर सनद एकवेळ महाराजांनी कृपाळू होऊन दिले असल्यास त्या सनदे बरहुकूमयाच प्रांतात राहून जरी वतन बाब किंवा सरंजामी असेल तर कागदपत्र जपून ठेवणेस सोय असतां महाराजांचे प्रतापानें चौहुकडे मुल्कावर स्वारी वगैरे करून लढाई ईत्यादी साहस कार्य करून राज्यच काबीज केल्या कारणावरुन बहुतेक वेळा स्वामी कृपाळू होऊन पत्र वगैरे दिले होते ते व संस्थानातील कागदपत्र मागले वगैरेचे दंग्यात गैरविले पडीले. कितीएक कागदपत्रें टीपू व सुरापूरकर व पेशवे इत्यादीकांचे राज्य धांदलीमुळे मुळगांव वगैरे लुटित कागदाची अफरा तफर जाहाली.

पुरातन सादणे होती तेवरून मुळपुरुष महालोजी घोरपडे हे फौजेचे सरदार आणि त्यांचे चिरंजीव संताजी व बहीरजी व मालोजी असे तिघे भाऊ. तिघांनी आपआपले मरातब वगैरे मिळवून महाराजांचे आज्ञापत्र व सनदापत्रे वगैरे सर्व बाळगणेचे इरादा ठेवून छत्रपती महाराज आपले रुजु शिकेनिशी दिल्हेले. वडील भाऊ संताजी घोरपडे यांजला सेनापतीपद होते. ते समंधे सरंजाम अष्टप्रधानात त्याजला स्वामींनी जवळ बाळगीले आणि बहीरजी घोरपडे हिंदूराव व मालोजीराव घोरपडे अमीररुल उमराव हे आज्ञावरून गजेंद्रगड व कोकण प्रांताबाहेर वगैरे मुलुक काबीज करणेस निघाले. ते समई कागदपत्र वडील संताजी घोरपडे यांजपासी सर्व दौलत राहून बाहेर निघाले. ते दिवसापासून आमचे संततीचा पुरुष यक ठिकाणी न राहातां परदेशात राहणे पडले. या कारणावरून कागदपत्र त्यांच्या घराण्यात राहीले. ज्याचे कागद त्याजपासी घ्यावे असे जर म्हणेन तर, घोरपडेचे घराणेत वाटणीचा सिरस्ता नाहीं. सबब त्याचेकडून न घेता आम्ही आमचे मनगटाचे जोरावर देश मिळविले. या सबबेवरुन जुनी कागदपत्रे आमचेपासी न राहतां सेनापतीचे घराणेत राहीले असे आमचे वडील सांगत आले. त्याच ठिकाणी आतां लागलेस एकंदर कागदपत्र सांपडेल. अशा प्रकारच्या कारणावरून गैरविलेस पडलेले शोध लागत नाही. म्हणून सदरी उत्पन्न संपादन कोणत्या पुरुषानें केले व कोणी दिले त्यांचे शके सन लिहीण्यास बराबर लागत नाही. परंतु आमचे घोरपडे यजमानाची कितीयक प्रकर्णे, कांही हाकीकत व दौलतीस कधी वडीलांनी आमचे यजमानास सांगत आले व काहीं लिहीले ऐकीव आहे, त्यास सरकारास हकीकत मामला जाहीर करीतो ते कलम

१ आमचे यजमानाचें पूर्वज म्हणजे हल्ली गजेंद्रगडास आसणार यापासून सातवे पुरुष म्हालोजी घोरपडे हे शिवशाहीचे पूर्वी बादशाई तक्तेचा चाकर होते. त्याने त्या राज्यात मरदुमी केली. घोरपड कंबरेस दोरी बांदोन कुबल गड किल्हेचे जागी त्या आधाराने आंगजे करून हाल्ले केलेवरुन बादशहाचे साहीब नजर होऊन घोरपडे म्हणोन किताब देऊन त्याबाबद आबदागिरी व निशाणीचा मरातब दिल्हा, तो आजवर चालत आहे. आणि त्यावेळचे बादशाई बहुत मेहेरबानगी येऊन इजतेने जवळ बाळगीत असे. वडीलांचे मुखी ऐकीव आहे कीं कितीयेक देशांत वतन बाब करून दिल्हा तो आंमल घालमिलीमुळे काही राखणेकरिता आवतारीक श्री मन्महाराज शिवछत्रपती यांचे शेवेशी आलो. कलम

२ बादशां तक्त मोडकळीस आल्यासमई म्हालोजीराव घोरपडे व शककर्ते श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांचा त्याचा रीनानबंद घडोन ते आपले राज्य स्थापनेचे मसलतीस मदतीबद्दल चाकरीस ठेविले व परम विश्वासानें म्हालोजीराव घोरपडे यांनीं हरएक कामांत कितीएक प्रसंगी मरदुमकीची मेहनत व मशागत तलवारीने करून बादशाई फौजा पराभविल्या. त्याजवरून महाराज बहुत संतोशी होऊन राज्ये बे राज्ये आपल्या राज्यात मोठे योग्यतेस आणिले आणि पुढे श्री मन्महाराज राजाराम छत्रपती यांचे वेळी तुळापुर मुक्कामीं आवरंगजेब पादशहा याचे फौजावर चाल्डन जाऊन खुद्द जातीने म्हालोजीचे पुत्र संताजी, बहीरजी, मालोजी हे त्रिवर्गानी शत्रुचे खास डेरेवर पडोन हातबळे करून डेरेतले दांड उपटून बहुतेक खराबी शत्रूची करून जयप्रत होऊन रायगडास महाराजाचे दर्शणांस आले. तेव्हां माहाराजानी त्यांचे पराक्रम चित्तांत आणून त्रिवर्गास किताब दिल्हे ते शके १६१०

१ आमचे वंशीक म्हणजे बहीरजीराव घोरपड्यास हिंदूराव म्हणून किताब दिला.

१ त्याचे वडील भाऊ संताजीराव घोरपडे यास सेनापतीचा किताब दिल्हे.

१ कनिष्ट भाऊ मालोजीराव घोरपडे अमीरुल उमराव म्हणोन किताब दिल्हे.

येणेप्रमाणें तिघे भाऊस तीन किताब दिल्हें आणि या करवीर इलाख्यात सरदेशमुखी वतन व कितीयेक ठिकाणी चौथाई घास दाणा व किरकोळ बाब वतन त्या बाबत इसाफत गांव मौजे सांगवडे हे इनाम वंशपरंपरेने मिळाला. त्या दिवसापासोन भोगवटा आजपावेतो सरकारातून बीनदिकत सुरळीत चालले आहे. या खेरीज महाराज सरकारचे आज्ञावरून कर्नाटक प्रांत सर करण्यास आमचे यजमानाचे सहावे पुरुष बहीरजीराव हिंदूराव, पाचवे पुरुष शिदोजीराव हिंदूराव ममलकत मदार, चौथा पुरुष दौलतराव हिंदूराव, यांचें वडील भाऊ मुराराव हिंदूराव घोरपडे ममलकत मदार व सेनापती, असे घोरपडे चौघे पुरुष मोठे शूर होत आणि या मंडळीवर. छत्रपती महाराजाचे पूर्ण अन्तःकर्ण या लोकांच्या मस्तकी होते. म्हणून तुंगभद्रेचे अलीकडे गजेंद्रगड प्रांत मुलुक व हैद्राबादपर्यंत चौथाई आंमल व घास दाणा अशे बाब, तुंगभद्रेपलीकडे गुत्ती वगैरे मुलुक, बहुत श्रम साहास करून संपादिले. त्याहून बहुतेक मुद्धक कितीयेक पेशवाई वगैरे राज्यक्रांतीच्या योगाने जाऊन अवशेष इनाम वगैरे गांवसुद्धां गजेंद्रगड हे कुंपणी इलाखेत चालत आहे व पटवर्धन इलाखेत वतनी कमाविशी व वडगांव आजमासे दोनशे रुपयेचा असे चालत आहे. याजबदल दाखला नसल्याचे प्रकार सदरी दर्शविला असोन राज्य आमचे पूर्वजानी कोणते शुरत्वाने, दुसरेचे मदत नसोन मुद्धक संपादन केले हे आम्हीच जाहीर करावे असे नाही. सरकार महशूर असतील म्हणून बयाण करणेची गरज दिसत नाही.

३ आणखी आमचे संस्थान प्रकर्णी कागदपत्र भाऊबंद घोरपडे मानकरी सरकारचे पदरी आहेत त्यांजपासी कागदपत्र वगैरे हकीकत व तहनामासुद्धा असावे असे आमचे यजमान यांचे बहुत कार्य सांगावे यावरून समजते. त्यांस त्या कैफीयत होते वक्ती व आधीक उणे असेल तो मजकूर सरकारास जाहीरात येतील. कैफीयत वडील

घराण्यातून व्हावे, परंतु सरकार प्रश्नास कागदपत्र नसल्यामुळे येकीव वडीलाचे तोंडी त्या मानाने कळविले आहे. क्षमा असावी. आमचे सरंजाम मोंगलाईचे तोंडी आहे. यामुळे कागदपत्रांची जतनुकी बराबर राहीली नाही. म्हणून सरकारात यथायोग्य लिहून कळविले आहे.

सदरी तीन कलम. दुसरे कलमाच्या पोट कलमातील अभिप्राय.

( ३ ) सदरी पहीले कलमात लिहीले उत्पन्न संपादीक हल्ली अनभव करणार याचे नातेने कोण होते, त्या उत्पन्नास विभागी किती आहेत व चाकरी काय करावी लागती यातील मजकूर कसा काय तो लिहून देणे म्हणोन आज्ञा त्याचे उत्तर. मिळवणारे हे पुरुष हल्ली आनभव करणार दौलतराव घोरपडे हिंदूराव यांचे सातवे पुरुष. सबब नातेनें आमचे नीपणजेचे आजे होत—

१ माहालोजीराव घोरपडे सरनोबत हे मूळ पुरुष
२ त्यांचे पुत्र बहीरजीराव घोरपडे हिंदूराव
३ शिदोजीराव घोरपडे हिंदूराव ममलकत मदार व सेनापती
४ दौलतराव घोरपडे हिंदूराव
५ बहीरजीराव घोरपडे हिंदूराव
६ भुजंगराव घोरपडे हिंदूराव
७ हाली सांप्रत काली आहेत ते दौलतराव घोरपडे हिंदूराव यांसही पुत्र भुजंगराव घोरपडे हिंदूराव आहे.

येणे प्रमाणें सातवे पिढीचे पुरुष म्हणजे पणतुचे पणतु आम्ही होय. चुलते वगैरे भाऊबंद आहेत ते आमचे—

१ चुलते आनंदराव बाळासाहेब घोरपडे,
१ शिदोजीराव, सापत्न आजे
१ संभाजीराव नानासाहेब घोरपडे
१ चुलतभाऊ सिदोजीराव आबासाहेब घोरपडे
१ चुलत पुतणे बहीरजीराव घोरपडे
२ सावत्र बंधु १ नरसिंगराव घोरपडे १ सुबराव घोरपडे

येणे प्रमाणे बाप भाऊ आहे. परंतु आमचे घराणेत विभाग होणेची चाल नाहीं. कारण आमचे जुमामर्दी म्हेणतीने मिळविलेले दौलत परंपरा वडीलपण

ज्याजकडे येईल त्याने दौलत अनभऊन बाकी भाऊस चेरीतार्थपुरते दौलतीचे आजमासाने देणेची वहीवाट आहे. सबब हल्ली सदरी मंडळीस पोटगीबद्दल नेमणुक करून देऊन चालवीत आहो व चाकरी विषई मजकूर असा आहे की प्रथम राज्याभिषेक झाला त्यावेळी आम्हास कृपाळू होऊन छत्रपती महाराज यांनी जातीचे इनाम दिले. त्याजवर आमचा हल्लेतील कितीयेक राज्ये काबीज करुन फौज वगैरे बाळगून त्याजला सारखे हल्ले ठेऊन प्रथम देशांतरी किले वगैरे बळकाऊन राज्य करीत होते. छत्रपती स्वामींनी मोहीमीचे लवाजीमा नेमून आज्ञा करीतील ते क्षणीं स्वामी शेवा करीता हाजर होऊन जिकडे लढाई करणेस हुकूम होईल तिकडे जाऊन काम बजावीत होतो. त्याजबद्दल खर्चीची तजवीज महाराज सरकाराकडून परवानगी होत होती आणि लढाईस जाऊ तेथे........ मिळऊनही हमेशा सारी खटपट करीत होतो. जर मालीक बरोबर येतील तर आमचे इतमाम खर्च चालवावे व जातीचे खर्च हुजूर असे. असे प्रकारे वेवस्था सरकारातून होत असून वतन जो दिल्हा त्या बद्दल चाकरी वगैरे करणेचा करार नाही व करणेची वहीवाट नाही.

(४) पहीले कलमात लिहून दिल्हे उत्पन्नाबद्दल सनद हजर करावी म्हणोन आज्ञा त्यास उत्तर—

बहुत दिवसाचे मिळविले वतन त्यांस आलीकडे दावे दंगे बंडाचे वगैरे बहुतेक होऊन आमचे दौलत व दौलत ठाणाही कागदपत्रे व स्वामी आज्ञापत्र सुधा राखणेस फुरसत न होता तसनस होऊन गेले. तशात वतनाबद्दल सनद जपणे करीता त्या काळासारखे विचार व आवसरही जाहाले नाही. अशा प्रकारे बहुत मुष्कीलीने सर्व कागद सनदा बताऊनही काही कारणे वडील वडीलानी लपून ठेविले. ते कागदसुद्धा अलीकडे श्रीरंगपटणचे टीपू वगैरे व सुरपूर बेरड व मोगल आणी कितीयेक बंडाई पेशवे याचे तह वगैरे मुळे मुल्क सुटले. असे प्रकारचे कारणावरून जिकडे होते तिकडे ते कागद गेले. याजबद्दल हकीकत पहिले कलमाच्या दुसरे पोट कलमात जाणविले आहेच. परंतु या सरकारातील उत्पन्नाचे कागदपत्राखेरीज आणखी आम्हास छत्रपती महाराज यांनी दयावंत होऊन चाकरीस येकनिष्ठ समजून इंदापूर व कुरुंदवाड व चिकोडी असे जागेवरचे दिला असे. त्याबद्दल सनद हल्ली शोध करून सापडले ते हजर आहे. ते लिहीणेचे कारण छत्रपतीसाहेब महाराज यानी चौकडे आमचे

उदय होऊन लोकास समजणे करीता दिल्हे ते सनद महाराजाचे कानावर जाण्यासाठी जाणविले असे.

(५) पहिले कलमात लिहून दिले उत्पन्न खेरीज या सरकारातून दुसरे काही उत्पन्न आहे की काय म्हणोन आज्ञा त्याचे उत्तर. या सरकारात मेहेरबानी होऊन आपले राज्यात घासदाना व चौथाई बाब वगैरे इनायत करून चालवीत होते. हल्ली मौजे सांगवडे मजकूर देशमुखी याज शिवाय छत्रपती महाराज यांचे प्रतापाने व शिपाईगिरीचे मर्दुमकीने यकंदर दौलत गुत्ती व गजेंद्रगड हैदराबाद वगैरे मुलकात मिळोन पन्नास साठ लक्ष रुपयेचे दौलत आम्हाकडे महाराजांचे सेना चालत आला तोपर्यंत चालत आला. पुढें पेशवे व मोगल व हैदर, टिपू असे सरकारी ........ काहीं काही तालुका व प्रांत परगणे व गांव जसजसे ज्याचे जोर पोहचेल तसें तहात गुंतले गेले. ते आता काळपरत्वे यकंदर दौलत जाऊन गजेंद्रगड मोगलाई सरदेश आहे. सबब सदरहु गड वसाहत होते ते वसाहत करून तेथेच राहाणेचे सबब वगैरे दुसरे कलमात लिहिले. गजेंद्रगड वगैरे पंचवीस हजाराचा तालुका आनभवीत आहो व पटवर्धन इलाखा सांगली ताबेतील अजनी वतनी कमाविशी व वडगांव आजमासे दोनशे रुपयाचे आम्हाकडें आसे. येकाशिवाय सरकार दौलतीत इनाम गाव मौजे सांगवडें व महाल सरदेशमुखी पेठ्यानिहाय चालत आहेत. सदरी लिहिले आहे त्याचा आकार आजमास सात हजाराचा आहे. त्यात खर्ची वगैरे बाबी आहे. त्याचा तपशील वर पहिले कलमात निवळ आकारसुद्धा लिहिले आहे.

(६) सदरी पांचवे कलमात लिहून यथायोग्य जाणविले आहे तो मजकूर खरा आहे. औंदा सरकारात चौकशी होईल तर त्याचा जबाब करू व आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणूक करु.

येणेप्रमाणे सहा कलमे घोरपडे हिंदूराव गजेंद्रगडकर यांचे दौलतीबद्दल हकीकत. सही तारीख ८ माहे दिजेंबर सन १८४७ ईसवी सन १७६९.

साक्ष १ नारायण गुंडो कारकून नि॥ राजोउपाध्येबुवा
१ गोपाळभट बीन बाळंभट गोटणकर द. खुद

कृष्णराव नरसिंह देशपांडे परगणे पेनगोडा नि॥
दौलतराव घोरपडे हिंदूराव संस्थान गजेंद्रगड द. खुद

विनायक रघुनाथ काळे

## हरी रामचंद्र देशपांडे पनाळा यांची कैफियत

कैफियत नं. १३१ / इ. स. १८४७

कैफीयत बेशमी हरी रामचंद्र देशपांडे प्रांत पनाळा यांचे मुखत्यार त्यांचे बंधु कृष्णाजी रामचंद्र देशपांडे सुमा समान आरबेन मयातेन व आलफ सन १२५७ फसली मेहेरबान पोलीटिकल येजंट साहेब बाहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आंख ६६ सन १८४५ ईसवीची यादी आल्या त्यांत ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आली त्याजबद्दल लोकांची सनदापत्रें पाहुन कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्यांस खाली मुख्य कारभारी याचे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्याजवरून आम्हाकडे देशपांडेपणा व कुलकर्णपणा बद्दल जमीन व हक्क नक्ती गल्ला केली व तुप मापी व मानपान व ईनामी गांव चालत आहे. त्याजबद्दलच्या सनदा आहे त्या दाखवून माहीतगारीचा मजकूर लिहिला तो खाली लिहीलेप्रमाणें—

(१) हाल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा आकार साल तीघस्त सन सीत आरबेन मयातेन व आलफ सन १८४५ ईसवी गावचे हक्क वगैरे पट्याचे आकार बादी खर्चास पडल्याप्रमाणें—

ता॥ तारळे कर्यात सीवर्धन देह २६ सवीस येथील उत्पन्न सदरी लिहिलेप्रमाणें आम्ही आनुभवीत असोन त्यांस सरकारी काहीं हरकत नसता गांवकरी ऐवज देत नाही. त्यातील कारण असे कीं, आमचे घरगुती भाऊ वाटणीचे खटलेमुळें परागंदा पर ईलाखेत का॥ आष्टे व मौजे मालखेडे वगैरे गावगन्नास गेलो होतो. याजकरतां ता॥ मजकूराचा वसूल करण्यास तिकडे जाणे जाहाले सबब सुमारे वीस वर्षे राहिला. कांहीं दिवसावर आमचा घरगुती खट-

त्याचा निकाल जाहाला. नंतर आम्ही गांवी येऊन तर्फ मजकुरास पूर्व वहिवाटीप्रमाणें माहालकरी ऐवज मागणेस पाठविला असतां गांवकरी यांनीं विनाकारण हरकत करून मामलेदार यांचे हुकुमाची नड सांगून वसूल दिला नाही. म्हणोन तेथील त्यावेळचे मामलेदार राजश्री रावजी वाकनीस होते त्यांस कळविले. परंतु त्यांनी आमची दाद घेऊन हक्क देविला नाहीं, म्हणोन पुढें श्रीमंत राजश्री मुख्य कारभारी येथे आल्यावर त्याजपाशी सदरहु हक्क तर्फ मजकुराचा प्राचीन पासून चालिलेला श्रीमन्माहाराज यांचे सनदेप्रमाणें देवावा म्हणोन फिर्याद साल गुदस्त केली. त्याची चौकशी होऊन हुकूम पन्हाळा पेट्याचे मामलेदाराकडून आला आहे. सदरहु तर्फेचा हक्कास सरकारी वगैरे दुसरी काहींच हरकत नाहीं. दरम्यान गावकरी यानीं दरसालीना सदरी लिहिलेप्रमाणें उत्पन्न आम्हाकडे न देतां व सरकारचे हिशेबाचे खर्ड्यास आजपर्यंत आमचे नावे जमा न लावता मोफत गाववालेकडे बाकी राहिली आहे याबद्दल सनदा खाली चवथे कलमी हजर केल्या आहेत. सदरहुची चौकशी होवून हक्क मिळावयाचा आहे.

सदरहू उत्पन्नापैकी देशपांडेपणाचे उत्पन्नातील सदरी लिहिलेले कर्यात सावर्धन मात्र अलीकडे जुजबी दिवस वाद विनाकारण आहे त्याबद्दल सदरी मजकूर लिहिला आहे बाकीचे उत्पन्न चालत आहे व याखेरीज परईलाखेत म्हणजे सातार ईलाखेत मौजे मामले ता। सातवे येथील देशपांडेपण चालते व गावगन्नानी घरे व गवताची कुरणे चालत आहे.

( २ ) सदरहु उत्पन्न कोणी संपादन केले व कोणी दिले व दिल्यापासून वहिवाट कशी चालती त्याबद्दल तपशील लिहितो—

१ देशपांडेपणा व कुलकर्णपणाबद्दलचे उत्पन्न हे फार दिवसाचे प्राचीन तेव्हा कोणी दिले व कोणी मिळविले त्याचा तपशील लागणे व तारीख सन शक वगैरे लागणे कठीण तथापी विजापुराहून आमचे मूळ पुरुष या ईलाखेत आले त्यासी अकरा पिढ्या जाहाल्या तेव्हापासून पूर्ववतप्रमाणें वंशपरंपरेने सतत चालत आहे. त्यापूर्वीची माहिती पक्की मिळत नाहीं. परंतु सदरहु उत्पन्नापैकीं ता। तारळे देह सवीस यासी फार दिवसाखाली रामाणा लक्ष्मण देशपांडे देह शाहात्तर ता। मजकूर यानी आमचे वतन पूर्वपार असतां आम्ही नसल्याची संधी पाहून किल्ले प्रसिद्धगडचे मुक्कामी हुजूर गैरवाका मजकूर समजोन-देवून

राजपत्रें करून घेतली नंतर आम्ही, म्हणजे आमचे चौथे पुरुष गंगाधर महादेव हे आमचे नीपणजे यांनीं, किल्ले पनाळेचे मु॥ फिर्याद ता॥ मजकूरचे वतन पूर्ववतप्रमाणें मिळावे म्हणोन केलेवरून सरकारानी चौकशी मनास आणोन आमचे वतन प्राचीन असें ठरले-वरुन रामाणा लटिका जाहाला. सबब त्याचे इनायत पत्र येऊन ते पत्र व श्रीमन्माहाराज शंभु छत्रपती यानी शके ४१ जयनाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वितीया रोजी दुमाला सनद दिल्ही.

ईनामी गांव मजरेवाडी चरण हा आमचे तिसरे पुरुष म्हणजे रामाजी गंगाधर व पौसा महादेव हे आमचे चुलत नीपणजे चवथे पुरुष यानीं संपादन केले ते राजे शंभु छत्रपती यांनी आमचे चालवणेब॥ राजशके ५७ साधारणनाम संवत्सरे म्हणजे ईसवी १७३१ साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ११६ जाहाली तेव्हांपासून वंश-परंपरेने आनुभवीत आहोत.

सदरहू उत्पन्न त्यापैकीं ईनामी संपादन करणारे आमचे पणजे रामाजी गंगाधर व चुलत नीपणजे पौसा महादेव चवथे पुरुष यानी सनदा करून घेतल्या आहेत त्याचे व सदरी उत्पन्न देशपांडेपणाचे लिहिले त्यास विभागाचा तपशील —

१ मजरे वाडी चरण हे गांव आम्ही व आमचे चुलते गोपाळ आत्माराम निम्मे प्रमाणे करीत आहो.

१ देशपांडेपणापैकी ता॥ बोरगांव मात्र आमचे खुद्द हिशेस आम्हा-कडे (फाटून गेले आहे.) उभयता निम्मे प्रमाणे आनुभवीत आहो.

(३) येणेप्रमाणें वहिवाट आम्ही करीत आहो व माझे जातीचे हिशेस विभागी तीन बंधु आहोत व आम्ही सदरी यकंदर उत्पन्न लिहिले आहे हे फक्त आमचे हिशेचे. याखेरीज आमचे घराण्यातील वडगांवकर देशपांडे हे आहेत ते आपले उत्पन्नाब॥ निराळी कैफियत देतील त्यात उत्पन्न दाखल होईल.

(४) सदरी पहिले कलमी उत्पन्न लिहिले त्याबद्दल सनदा आहेत त्या हजर केल्या आहेत त्याचा तपशील—

७ मजरे वाडी मौजे चरण ता। सातवे याजबाबत

३ हुजुरुन शंभु छत्रपती स्वामी यानीं राजशके ५१ साधारण नाम संवत्सरे श्रावण शु॥ प्रतिपदा रोज भानुवासरेच्या तीन

१ पौसा माहादेव व रामाजी गंगाधर देशकुलकर्णी यांचे नावे येक नोंदणी नंबर १६३८

१ देशमुख व देशपांडे ता। सातवे प्रांत पनाळा यांचें नावें येक नोंदणी नंबर १६३९

१ कोंडाजी भोसले सुभेदार व सीतो माहादेव दी॥ खासकील यांचे नावे येक नोंदणी १६४०

३ भगवंतराव रामचंद्र अमात्य यानीं सुमा सन ईहिदे सलासीन मया आलफ छ ७ माहे सफरच्या तीन दिल्या त्या

१ पौसा माहादेव व रामाजी गंगाधर देशकुलकर्णी प्रांत पनाळा यांचे नावे येक नोंदणी १६४१

१ देशाधिकारी व कारकून व वर्तमान व भावी यांचे नावे येक नोंदणी १६४२

१ मोकदमानी मौजे चरण ता। सातवे यांचे नावे येक सुभा प्रांत पनाळा नोंदणी १६४३

१ किले पनाळेकडून मोकदमानी मौजे चरण ता। सातवे यांचे नांवे सुमा ईहिदे सलासीन मया आलफ छ १६ सफर नोंदणी १६४४

२ देशपांडेपणाचे उत्पन्नापैकीं कर्यात सावर्धन येथील हक मागील वहिवाटीप्रमाणें चालवणें ब॥ दुमाला सनदा मिळाल्या त्याब॥ दुसरे कलमीं सदरी मजकूर दाखल केला आहे.

१ हुजूरची शके ४१ जयनाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वितीया श्री राजा शंभु छत्रपती यानी शामजी नरसिंव्ह व गंगाजी महादेव देशकुलकर्णी प्रांत पनाळा यांचे नावे येक नोंदणी नंबर १६४५

१ रामचंद्र निळकंठ हुकूमतपनाह पंत अमात्य यासी देशाधिकारी व देशलेख वर्तमान व भावी सुभा प्रांत तारळे यासी सुमा खमस

आशर मया आलफ ता। ९ जिल्हेजची नोंदणी नंबर १६४६

९

(५) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाब।। चवथे कलमी सनदा हजर केल्या. त्याशिवाय सनदा नाहींत. आमचे खुद हिशेचे उत्पन्न करवीर ईलाखेत नाही.

(६) सदरी पाच कलमी उत्पन्न लिहिले ते च मजकूर लिहून दिला हा खरा आहे यात तफावत जाहालेस सरकार आज्ञेप्रमाणें वर्तणूक करु.

एकूण साहा कलमी मजकूर लिहिला हा खरा आहे हे लिहून दिले सही ४ माहे आगष्ट सन १८४७ ईसवी दस्तुर कृष्णाजी रामचंद्र देशपांडे प्रांत पनाळा.

हरी रामचंद्र देशपांडे यांचे मुखत्यार
त्याचे बंधु कृष्णाजी रामचंद्र देशपांडे

साक्ष

१ सदाशिव अनंत घाटे हल्ली मु।। करवीर दस्तूर खुद
विनायक रघुनाथ काळे काम पाहाणार.

## कादीर मुजावर
## यांची कैफियत

कैफियत नं. १३३ / इ. स. १८४७

कैफीयत–कादीर वल्लद ईनुस मुजावर जात मुसलमान उमर वर्षे ३२ कसब हजरत पीर साहीब खताल यांची पूजा करणार किल्ले पेटा पनाळा येथील फाथा करणार सुमा समान आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल येजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक यांजकडोन आंख ६६ सन १८४५ ईसवीची यादी आली त्यांत ईनाम सरंजाम धर्मादाय चालत आहे, त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदा पत्रे पाहून कळवावी म्हणोन वगैरे मजकूर या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदा पत्रें असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यासी आम्हाकडे ईनाम गांव गन्नानी जमिनी वगैरे चालत आहे याजबद्दलच्या सनदा हजर नाहींत बंडाईत गेल्या परंतु माहीतगारीचा मजकूर लिहून देतो ती कलमे

(१) आम्हाकडे हजरत पीर दरगा याचे सफरा व फकीर फुकरा दर्ग्यात येतात त्यांसी रोटीपाणी देणे व उदी फात्या करणेबद्दल खर्चास गाव ईनाम मानगुड येथींल आकार साल गुदस्ता सन सबा आर्बेन म्हणोन सन १८४७ व १८४६ ईसवीचे जमाबंदी अन्वये खाली लिहून देतो

८१ हाजरत पीर दर्गा पनाळा यासी ईनाम गांव मानगुड ता ठाण

२६ नक्त रुपये

१५ पटीबाबत

११ बिघावणीबद्दल

२६

५५ म्हासली गला केली २॥· पावणेंतीन खंडी यासी आकार दरमणी रुपये एक प्रमाणें

७॥ आम्हास मुजावर लोकास दर्ग्याचे खिरापतीबद्दल वंशापरंपरा चालत आली ती जमीन ईनाम—

७॥ जमीनी बाबत

१॥· मौजे नेबापुर ता। सातवे येथे ईनाम जमीन ८१ याचा खंड गला केली ८१॥·
यांचा आकार रुपये दरमणी येक प्रमाणें

२ मौजे आपटी ता। सातवे येथे ईनाम जमीन बिघे ८१ यांचा खंड गला केली ८२ याचा आकार रुपये

४ मौजे सालसी ता। सातव येथे जमीन बिघे ०२ याचा खंड गला केली ८४ याचा आकार रुपये दरमणी येक प्रमाणें

७॥·

० आम्हांस मुजावरी बद्दल ता। ठाण माहेकत गावगन्ना आठ आणे चार आणे असे गांव पाहून पेशजी म्हणजे बंडाई होणेचे पूर्वी वसूल येत होता तो हाल्ली चार वर्षे येत नाहीं व त्याजबद्दल सनद नाहीं.

० मौजे आतकिरि ता। रुकडी हा गांव ईनाम हजरत पीराकडे श्री राजा शंभु छत्रपतीचा राजशके ४८ साली दिल्हे होता परंतु आमचे जन्मापासून चालत नाही परंतु सनद आहे.

० मौजे सिपे ता। सिराले येथे ईनाम जमीन ८१ बिघा म्हणोन किल्ले पनाळेची सनद सन समान सलासीन मया आलफ साली मौजे मजकुरी दिली त्यासी ती जमीन वडिलार्जित चालत होती हल्ली आमचे जन्मापासून चालत नाही. सनद आहे.

१५ उरुसाचे खर्चाबद्दल पेटा पनाळे सरकारातून रुपये पेशजी पावत आले ते सन आर्बा आरबेन पावेतो. तेही बंडाईपासून बंद.

१०३॥· एकूण जमीन ८४

तपशील
४१ नक्त रुपये
६२॥। गले बाबत

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशा करितां दिले. दिल्हेपासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील—

१ ईनामगांव मौजे मान गुड ता। ठाण हा गांव साहेब खताल हाजरत पीर पेटा पनाळा यासी पूर्वी बाछयाई याचे कारकीर्दीत दिला असे आमचे वाडवडील सांगत आले. त्याज विषयी सनदापत्र काही नाही. तेव्हा पासून दर्ग्याची खिसमती वडील करीत आले व हाल्ली आम्हीही करीत आहो. सबब सनद नसलेमुळे साल व शके व कोणी कधी दिले ते शोध लागत नाहीं.

१ मौजे नेबापुर ता। सातवे येथे जमीन एक बिघा ८१ बाछयाई याचे कारकीर्दीत वाड वडिलांस दर्ग्याचे नोकरीबद्दल दिला वडील वडील सांगत आले त्यासी सनदपत्र कांहीं नाहीं. वंशपरंपरा चालत आली आहे.

१ मौजे आपटी ता। सातवे येथे ईनाम जमीन ८१ बिघा बाछयाई याचे कारकीर्दीत मिळाली तेव्हांपासून वंशपरंपरा चालत आली आहे. सनदपत्र काही नाही ?

१ मौजे साळसी ता। सातवे येथे ईनाम जमीन दर्ग्याचे नोकरीबद्दल बाछयाई यांचे कालकीर्दीत वाडवडिलास मौजे मजकूरी जमीन ८१ बिघे दिली त्यासी सनदपत्र कांहीं नाही वंशपरंपरा चालत आली आहे.

येणेप्रमाणे संपादन केल्यापासून सदर दर्ग्याची खिसमती करुन वंशपरंपरेने सतत आनुभवीत आहो.

(३) सदरहू उत्पादन संपादक पुरातन दर्ग्याचे व फकीर फकरातीच्या खर्चाबद्दल आमचे वाडवडिलानी संपादिले त्याप्रमाणें दर्ग्याची खिसमती करून उपभोग आमचे वंशपरंपरेनें करीत आलो आहो. या उत्पन्नांत सदर दर्ग्याचा खर्च भागून कांहीं थोडे राहिल्यास उपभोग करणेस हिस्सेदार मी व आल्ली वल्लद रहिमान व साधू वल्लद हुसेन व सुलतान वल्लद मुजावर असे

चौघे सारखे भागीदार विभागी आहो. त्याचे पोटी आणखी भाऊबंद पुष्कळ हिशेदार आहेत.

(४) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाबाबत सनदा होत्या परंतु बंडाईचे वर्षी म्हणजे सन खमस आर्बेन मयातेन व आलफ साली किलेवर कंपनी सरकारचा हल्ला चढला ते समई सर्व कागद सनदपत्र वगैरे गेले. कांहीं येक राहिले नाही.

(५) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय दुसरे उत्पन्न नाही व चौथे कलमी सनदापत्र नाही म्हणून लिहिलेच आहे. याशिवाय आम्हाकडे सदरी लिहिले त्या शिवाय कांहीं येक नाहीं.

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न व मजकूर लिहून दिला हा खरा आहे. यांत कांहीं कमी पेश जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील त्यासी मान्य आहे.

येकूण सहा कलमी मजकूर लिहिला हा खरा आहे. लिहून दिले सही छ २८ माहे साबान तारीख १० माहे ऑगस्ट सन १८४७ ईसवी शके १७६९
दस्तुर नारो रामचंद्र पाटील गारगोटीकर सही

कादीर वलद ईनुस हातची रेघ
आली वलद रहिमान याचे हातची
साधु वलद हुसेन याचे हातचा
सुलतान वलद मुजावर हातचा

साक्ष—

१ माणीक व॥ पीरखाना हबीब त॥ ठाण राहाणार मौजे हेरले दस्तुर खुद्द.

१ जगनाथ शामजी कवटेकर दस्तुर खुद्द.

विनायक रघुनाथ काळे काम पाहाणार

## जाधव हवालदार
## घराण्याची कैफियत

कैफियत नं. ४७ / इ. स. १८४६

कैफीयेत नारायणराव बीन दौलतराव जाधव हवालदार उमर वर्षे २० जात मराठे राहाणार का। करवीर सुमा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलीटिकल एजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक यांजकडून आंख ६६ सन १८४६ ईसवीची याद आली. त्यात ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रें पाहुन कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांचे नावे डेरी अंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा जाहाला त्यावरून सनदापत्र असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हाकडे वतनी ईनाम वगैरे चालत त्याच्या सनदापत्र मिळाली ती हजर करून त्याजबद्दल माहितगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे—

( १ ) आम्हाकडे हाल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील—

येकुण रुपये एक हजार नऊशेहे सत्तेचालीस दोन आणे देहे दोन व जमीन दोन च्यावर चार बिघे साडेच्यार पांड व गवत सुमारे ब्याऐंशी हजार ८२००० येणेप्रमाणे येत आहे,

( २ ) सदरहु उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कधी कशाकरिता दिले व दिलेपासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील

१ मौजे लिंगनूर प्रांत रायबाग हा गाव आमचे नीपणजे संताजी बीन रेखोजीराव जाधव याचे पुत्र बहिरजी जाधव हे किल्ले प्रसिद्धगड हाल्यात चीत जाहाले. मातोश्री जिजाबाई साहेब यांनी खुनकाटाबद्दल करार करून सन तिसा सीतीन मया व आलफ म्हणजे ईंग्रजी सन १७६८ साली सनद दिली त्यास वर्षे सुमारे ७८ जाहली. तेव्हापासून आम्ही आनुभवीत आहो परंतु

निपाणीकर यांच्य दंग्यात निपाणीकर याजकडे व त्याजकडून तालुकेची मोकळीक जाहालेनंतर काही सरकारात होता तो पुर्वत प्रों आमचे गांव आम्हाकडे दिले त्यास सुमारे २३ वर्षे जाहाली तेव्हापासून आम्हाकडे आनुभवीत आहो.

१ कसबा रुकडी येथील नाईकीचे वतन आमचे आजे नाथाजी बीन रेखोजी जाधव हे कसबा सावगांव येथील निपाणीकराचे लढाईत स्वामी कार्यावर खर्च जाहाले. आमचे चुलते सुबराव जाधव याजवर शिवछत्रपती माहाराज यांनी कृपाळू होऊन खुनकाटाबद्दल मौजे वटार येथील नाईकी व मौजे भेंडवड येथील जमीन करार करून दिले त्यास वर्षे सुमारे ३६ जाहाली त्या वतनाची वहिवाट सुमारे २५ वर्षे केली पुढे कैलासवासी बावासाहेब माहाराज छत्रपती यांनीं मौजे वठारची नायकी हरीभक्त परायण त्रिंबक गोसावी संस्थान मौजे मजकूर याजकडे देवून त्याचे मोबदला का। मजकूर येथील जमीनीच्या सनदा सन खमस सलासीन म्हणजे सन १८३४ ईसवीस करून दिले त्यास वर्षे सुमारे ११ जाहाली तेव्हापासून सतत आनुभवीत आहो.

१ मौजे लिंगनूर येथील पाटीलकीचे वतन आमचे आज्ये जीवराव जाधव याजवर बावासाहेब माहाराज यानी कृपाळू होऊ सन १८३२ साली सनदा करून दिले त्यास सुमारे १३ वर्षे जाहाली तेव्हापासून सतत आनुभवीत आहो.

१ मौजे भेंडवाड येथील जमीन बिघे ८२५ श्रीमन्महाराज शिवछत्रपती माहाराज यानी खुनकाटाबद्दल आमचे चुलते सुबराव जाधव याचे वडील नाथाजी जाधव हे कसबा सावगावचे लढाईत स्वामी कार्यावर खर्च जाहाले. सनद करून दिली ती हाल्ली गैरविलेस सबब सन शके लागत नाही परंतू आजमासे वर्षे सुमारे ३६ जाहाली तेव्हांपासून सतत आनुभवीत आहोत.

१ मौजे शिरोली ता। ठाणे येथे जमीन बिघे ०।० तीस आमचे वडील दौलतराव जाधव यांजवर बावासाहेब माहाराज छत्रपती यांनी कृपाळू होऊन जमीन ईनाम सन आरबे सलासीन म्हणजे सन १८३३ ईसवीस सनदा करून दिले त्यास वर्ष १३ जाहाली तेव्हापासून सतत आनुभवीत आहो.

१ का। करवीर येथे ईनाम जमीन—

१ भाऊ हिस्से पो। संपादन करणार आमचे नीपणजे यांचे वडील रखोजी बीन नरसोजी जाधव यानी येकनिष्ठपणे राजारामसाहेब माहाराज यांची

सेवा केली सबब जमीन बिघे ०।० तीस याच्या सनदा राजशके ४७ म्हणजे सन १७२० ईसवी साली करून दिले त्यास वर्षे सुमारे १२५ जाहाली पो वजा भाऊ हिस्सेकडे जमीन

४१५ निम्मे आप्पाजीराव जाधव व धोंडजीराव जाधव व सखाराम जाधव या त्रिवर्गाकडे आहे.

४७॥ चौथाई माधवराव व केशवराव व बहिरजीराव व नीलकंठराव जाधव या चौघाकडे आहे. बाकी आम्हाकडे चौथाई जमीन ४७॥ तेव्हांपासून आनुभवीत आहो.

१ किला जमीन ४॥· बावासाहेब माहाराज यानी आमचे आजे जीवराव जाधव यासी सुमा समान आशरीन म्हणजे सन १८२७ ईसवी साली सनदा करून दिले त्यास वर्षे सुमारे १९ जाहाली तेव्हापासून सतत आनुभवीत आहो.

१ जमीन बिघे ४=॥।· आमचे वडील दीपकराम जाधव याजवर श्रीमन्महाराज बावासाहेब छत्रपती कृपाळू होवून ईनाम बाग करणेस दिली सनद गैरविल्हेस सबब सन शके लागत नाही. परंतु सुमारे २० वर्षे सतत आनुभवीत आहो.

१ नदी मळी किनारा कुरण शिवछत्रपती माहाराज यानीं सनद दिली ती गैरविल्हेस सबब सन शके लागत नाही परंतु दिलेपासून सुमारे ४० वर्षे सतत आनुभवीत आहो.

भाऊहिशे पो मौजे बालिंग ता॥ हवेली येथील डोंगरी गवताची जागा ईनाम करार करून सनदा सादर जाहाल्या होत्या त्या गैरविल्हेस गेल्या सबब सन शके लागत नाही परंतु बहुत वर्षे दिलेपासून सतत आनुभवीत आहो.

सेवेबदल ईनाम चालतो त्याचा तपशील—

१ मौजे राशिवडे खुर्द ता॥ तारळ हा गांव आमचे नीपणजे संताजी बीन रकोजी जाधव याचे वडिलांनीं शिवछत्रपती महाराज यासी राज्याभिषेक जाहाला तेव्हांपासून पर्णशाळेकडील दरखी हावलदारीचे काम पाहात असतां पुढें शंभु छत्रपती माहाराज यांचा काल जाहालेनंतर मातोश्री जिजाईसाहेब महाराज यांनीं आम्हाकडे पूर्वी गांव मौजे परखदळे तो कलहे वतनी होता हुजूर धर्म संस्थानाकडे ठेवून मौजे मजकूर हा गांव सर्व बाब ईनाम करुन सन तीसा सीतेन मया व

आलफ म्हणजे सन १७६८ ईसवी साली सनदा दिले त्यास सुमारे ७८ वर्षे जाहाली तेव्हांपासून सतत आनुभवीत आहो.

१ मौजे सावगांव खुर्द प्रांत हुकेरी येथील जमीन शिवछत्रपती माहाराज यानीं आमचे पणजे रकोजी बीन संताजी जाधव यासी बिघे ८१५ ची सनद करून दिली होती ती गैरविलेस सबब सन शके लागत नाहीं परंतु मिळाले-पासून सतत अनुभवीत आहो.

१ मौजे सडोली तो हवेली येथे जमीन ८१० बिघे कोट करवीर येथील सरदारकीचे अ॥ बद्दल शिवछत्रपती माहाराज यांनी आमचे पणजे रकोजी बीन संताजी जाधव यासी सनद बिघे ८५ जमीनीची करून दिली होती ती गैरविलेस गेली सबब शके मिती लागत नाहीं. त्या शिवाय जमीन बिघे ८५ ची सनद सुमा मयातेन व आलफ म्हणजे १७९९ ईसवी साली करून दिली त्यास वर्षे सुमारे ४८ जाहाली मिळोन दहा बिघे जमीन मिळालेपासून सतत आनुभवीत आहो.

१ मौजे शिरोली तो ठाणे येथे जमीन—

१ शिवछत्रपती माहाराज यानी आमचे आजे नाथाजी बीन रेखोजी जाधव यासी सुमा आरबा मयातेन व आलफ म्हणजे सन १८०३ ईसवी साली सनद बिघे ८२५ करून दिली त्यास वर्षे सुमारे ४३ जाहाली पैकी आदा जमीन ८१७ चालत आहे. बाकी आदा नाही. दिले पासून सतत आनुभवीत आहो.

१ आमचे वडील दौलतराव जाधव यांजवर श्रीमन्माहाराज बावासाहेब यानी कृपाळू होऊन जमीन बिघे ८१५ आबदागीरी बद्दल करार करून सन समान आशरीन म्हणजे सन १८२७ ईसवी साली सनदा करून दिले त्यास वर्षेसुमारे १८ जाहाली

१ कसबा करवीर येथे जमीन बिघे प्राचीन वगैरे—

१ आमचे पणजे रेखोजी बीन संताजी जाधव यासी शिवछत्रपती महाराज यांनी सरदारकीबद्दल जमीन दिली त्याचा तपशील—

८९।४॥ प्राचीन सनद गैरविलेस गेली सबब सन शके लागत नाही.

८१२ किता जमीन सुमा मयातेन व आलफ म्हणजे सन १७९९ साली सनद करून दिली त्यास वर्षे सुमारे ४६ जाहाली

तेव्हांपासून सतत आनुभवीत आहो.

८२१।४॥

१ आमचे वडील दौलतराव जाधव यांजवर बावासाहेब माहाराज कृपाळू होऊन गायी चराऊ रान सिंगणापुर नजीक आहे ती आमची गुरे चरणेस करार करुन दिली पासून सतत चालत आहे. सनद नाही सबब सन शके लागत नाही.

१ सावरीचे कुरणा पो गवताचा डाग चाळीस हजाराची जागा आम्हाकडे सरंजामात गाव चार चालत होती ती सर्व सरकारात जप्त करून घेतली व आम्हास सरकारातून मोहीनी गवत येत होते ते बंद केले. व आमचे कणेरी येथील गवताची डाग सरकारात गेली ते समई अर्ज केल्यावरून श्रीमन्माहाराज बावासाहेब छत्रपती सदरहु प्र॥ चालवीत होते. याचा दाखला पाहुन शेवेबद्दल करार करून सन ईहिदे आरबेन म्हणजे सन १८४० ईसवी साली सनद करुन दिली त्यास वर्षे सुमारे ६ जाहाली. तेव्हांपासून सतत आनुभवीत आहो. येणेप्रमाणें उत्पन्न संपादन केल्या तागायत आजपर्यंत आम्हाकडे वहिवाट चालले याचा तपशील सदरी लिहिला आहे.

(३) सदरी लिहिले उत्पन्न संपादन करणार आमचे नीपणजे यांचे वडील रकोजी बीन नरसाजी जाधव याचे पुत्र आप्पाजी व संताजी व सुभानराव, व कृष्णाजी, व नरोजी. एकूण पो आमचे नीपणजे संताजी बीन रकोजी जाधव याचे पुत्र रेखोजी, व बहीरजी जाधव. पैकी बहीरजी रंगणेवर ठार जाहाले. त्याचे पोटी पुत्र नाही. रेखोजी बीन संताजी जाधव यांचे पुत्र बहीरजी व नाथाजी व जीवराव जाधव पो बहीरजी व जीवराव जाधव याचे पोटी पुत्र नाही. आमचे आजे नाथाजी बीन रेखोजी याचे पुत्र सुबराव व दौलतराव या पो सुबराव जाधव यासी पुत्र नाही. आमचे वडील दौलतराव जाधव व आम्ही खुद्द या उत्पन्नास दुसरा कोणी विभागी नाही. सरकारात चाकरी खासे घोड्यानिशी हमेशा हजर असोन ईतर मानकरी लोकाप्रमाणें स्वारी बाहेर गेल्यास समागमे असोन चाकरी विषयीं आज्ञा होईल ती मान्य करावी लागती व सरकारातून खर्चास मीळणेची वहिवाटही आहे. व पर्णशाळेचे दरसा-बद्दल सरकारचे विड्याचा डबा घेऊन विडे कचेरीत देतेसमई सरकार सेवेत असावे लागते. कोट करवीरचे सरदारकीबद्दल गंगावेशीचे दरवाज्याचे

रखवालीस बारगीर घेवून पारेवर हमेशा एक अ॥ शिपाई असणेची वहिवाट आहे. वतनी नायकी व पाटीलकी वगैरे आहे. त्याजविषयी वतनदारीचे ईराद्यानें वतनी शेवा करावी लागती.

(४) सदरी पहिले कलमांत लिहिले उत्पन्नाबाबत सनदापत्र हजर केली आहे.

एकण एकवीस सनदा चालते उत्पन्नाबाबत आम्हाजवळ होत्या त्या हजर केल्या आहेत. याशिवाय मौजे सावगांव खुर्द येथील जमीन बिघे ८१५ व मौजे सडोली येथील जमीन बिघे ८५ व मौजे भेडवड येथील बिघे ८२५ व क॥ करवीर येथील सरदारकीबद्दल ८९।४॥ व किता जमीन ८~॥। व गाई चराऊ रान व नदी किनारा गवत येणेप्रमाणें सनदा गैरविल्हेस गेल्या त्याचा तपास करिता कोठे सांपडत नाहीत. भोगवटा चालल्याचा दाखला सरकारचे खडर्थास व गावाकडे दाखला आहे व भाऊ हिस्साचे चौथाई जमीन क॥ करवीर येथे ८७॥ व मौजे बालिंगे ता॥ हवेली येथील डोंगरी गवत जागा येणेप्रमाणें वतनी सनदा निलकंठराव जाधव याजकडून दाखला येणेचा.

(५) सदरी पहिले कलमांत लिहिल्या उत्पन्नाशिवाय आणखी सरकारातून काहींएक उत्पन्न नाहीं व चवथे कलमांत लिहिले सनदपत्राशिवाय चालते उत्पन्नाबाबत सनदपत्र नाहीं.

(६) सदरी पांच कलमात वतन समंध सरकारातून ईनाम वगैरेचे उत्पन्न व मजकूर लिहून दिलेला खरा आहे. त्यांत काहीं कमीजास्त जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हांस कबूल आहे.

येकूण सहा कलमें लिहून दिली सही तारीख छ १८ माहे रमजान शके १७६८ पराभवनाम संवत्सरे मु॥ तारीख १० माहे सपटेंबर सन १८४६ ईसवी दस्तुर जयराम हरी आहटकर नी॥ जाधव हवालदार

सही – नारायणराव बीन दौलतराव जाधव
हवालदार दस्तुर खुद्द.

साक्ष १ सखाराम बलाळ कारकून नी॥ तोफखाना—
सरकार करवीर दस्तुर खुद्द

## राजोपाध्ये घराण्याची कैफियत

कै. नं. ८२ / इ. स. १८४६

कैफीयत सदाशिवराव बीन नारायणराव राजोपाध्ये उमर वर्षे ३३ जात देशस्थ ब्राह्मण रा करवीर सुा सबा आरबेन मयातेन व आलफे मेहरबान पोलिटिकल यजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक याजकडून यादी आंक ६६ सन १८४५ इसवीची आल्या त्याखाली मुख्य कारभारी यांचे नावे डेरी आंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हाकडे ईनामी गाव व वतने व जमिनी वगैरे चालतात त्याज बाबतच्या सनदा हजर करून माहीतगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे—

(१) हाल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा आकार बंदा आन्वये (येथे उत्पन्नाचा व जमीनीचा तपशील)

(२) सदरह्र उत्पन्न संपादन कोणी कशाकरीता कधी दिल्हे व दिल्यापांसून वहिवाट कशी चालत आहे याचा तपशील

कैलासवासी राजा संभु छत्रपती स्वामी यानी आमचे निपणजे सदाशिवभट बीन लक्ष्मण भट आरवीकर यासी दिल्हे ते बीतपशील

१ मौजे म्हारुळ तर्फ आसनडोली हा गांव आणेदिव (?) पर्वकाळी सह हिरण्योदक धारादत्त इनाम सर्वमान्य करार करून राजशक ४२ म्हणजे सन १७१५ इसवी साली दानपत्रे करून दिल्ही त्यास वर्षे १३० जाहाली.

१ मौजे येळवडे तर्फ तारळे हा गाव मार्गशीर्ष शुद्ध १५ चंद्रग्रहण पर्वकालीसह हिरण्योदक धारादत्तपूर्वक इनाम सर्वमान्य करार करून

राजशक ४९ म्हणजे सन १७२२ इसवी साली सनदा करून दिल्या त्यांस वर्षे १२३ जाहाली.

१ मौजे नाडगोडीचे वतन तर्फा तीन, स्वामीचे कुलगुरु यास्तव स्वामी कृपाळू होऊन तर्फ सातव व कोडोली या दोन महालचे वतनास राजशक ५२ म्हणजे सन १७२५ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे १२० जाहाली. तर्फ वडगांव महालाचे वतनांस राजशक ५९ म्हणजे सन १७३२ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ११३ जाहाली.

१ मौजे वाटार तर्फ वडगांव हा गांव सर नाडगोडीचे वतनासंमंधे इनाम आजरामत करार करून राजशक ५९ म्हणजे सन १७३२ इसवी सालीं सनदा करून दिल्या त्यास वर्षे ११३ जाहाली.

१ मौजे चिंचवड तर्फ रुकडी येथील वतनी कमाविसी राजशक ७४ म्हणजे सन १७४७ इसवी साली सनद करून दिल्ही त्यास वर्षे ९९ जाहाली.

१ मौजे·······ताा कळे हा गाव इनाम कैलासवासी जिजाबाईसाहेब महाराज यानी करार करून सुाा खमस खमशेन म्हणजे सन १७५४ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ९१ जाहाली.

१ इनाम जमीन मौजे दिडोर्ली येथे बिघे ८५ व बाग करवीर येथे बिघे ८९ मिळोन बिघे ८१४ करार करून राजशक ८१ म्हणजे सन १७५४ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ९१ जाहाली.

१ वरडी आब्रवणे तर्फ खानापूर हा गाव ईनाम सर्वमान्य करार करून राजशक ८३ म्हणजे सन १७५६ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ८९ जाहाली.

१ किले पन्हाळा येथील वतनी फडणीशी राजशक ८५ म्हणजे सन १७५८ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ८७ जाहाली.

कैलासवासी शिवछत्रपती स्वामी यानी दिल्याचा तपशील—

१ आमचे चुलत पणजे आनंदराव राजोपाध्ये सातारकर याशी धर्मदाय इनाम जमीन दिल्ही ती त्याची त्याजकडे चालत आहे.

१ मौजे तुरबे येथे बिघे ८५ व मौजे सरवडे येथे बिघे ८५ व मौजे

शिरोली येथे बिघे ८५ व मौजे वटार येथे बिघे ८५ मिळोन बिघे ८२० च्या सनदा सुा इसने मयातेन आलफे म्हणजे सन १८०१ इसवी सालीं करून दिल्या त्यास वर्षे ४४ जाहाली.

१ मौजे दानवल येथे बिघे ८२५ व मौजे शेळेवाडी येजे बिघे ८५ मिळोन बिघे ·।· याच्या सनदा गैरविलेस सबब शके मिती लागत नाही. परंतु सदरी २० बिघे जमीन बराबर मिळाली. सबब वर्षे ४४ जाहाली.

आमचे आजे सदाशिवभट बील शामभट आरवीकर यासी दिल्हे ते.

१ किल्हे मनोहर येथील वतनी फडणीसी राजशक ११० म्हणजे सन १७८३ इसवी साली सनद करून दिल्ही त्यास वर्षे ६२ जाहाली.

१ मौजे मडलगे बु॥ ·तर्फ खानापूर हा गांव आग्नहोत्राचे बेगमीस हीरोण्योदक धारादत्त करार करून राजशक ११६ म्हणजे सन १७८९ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ५६ जाहाली.

१ राजशक १२१ म्हणजे सन १७९४ इसवी साली दिल्ही त्यास वर्षे ५६ जाहाली तपशील

१ मौजे मडीलगे बु॥ येथील पाटील कुलकर्ण्याचे वतन करार करून सनदा करून दिल्या.

इनाम जमीन करार करून सनदा करून दिल्या त्याचा तपशील.

१ मौजे सिंगणापूर येथे बिघे ८१०
१ मौजे चिंचवड येथे बिघे ८१५
१ का। वडगांव येजे बिघे ८५
१ मौजे पारगांव येथे बिघे ८५
१ मौजे बोरपाडळे येथे बिघे ८५

वतनी कमाविसीच्या सनदा करून दिल्याचा तपशील

१ मौजे कळंबे तर्फ ठाणे येथील
१ मौजे कुरड्ड तर्फ हवेली येथील

वतनी आसाम्या करून देऊन सनदा करून दिल्याचा तपशील

१ प्रसिद्धगड येथील फडणीसी
१ जरूड तर्फेचा हक्क

१ कोट करवीर येथील फडणीसी

१ समसमुली कडील फडणीसी

हुजूर जोतिषाचे वतन देऊन सनदा करून दिल्या.

येकूण सदरहू काली दिल्हे त्यास वर्षे ५१ जाहाली.

१ चिंचवड येथील कुरण जमीन बिघे १० व कात्यायणी जमीन कुरण बिघे ८२० व बोरपाडळे येथे कुरण बिघे ८१० मिळोन आजमासे बिघे ८१० व भुदरगड येथील वतनी सुभेदारीची आसामी याच्या सनदा गैरविलेस सबब शक मिती लागत नाही. परंतु पुरातन पासून चालत आहे. त्यांस आदमासे ६० वर्षे

१ पावणगड येथील फडणीसी व सामानगड येथील फडणीसी राज शक १२१ म्हणजे सन १७९४ इसवी साली सनदा करून दिल्या त्यांस वर्षे ५१ जाहाली व सोनगड येथील फडणीसी आसाम्या तीन सन खमास आरबेन सालापासून वहिवाट चालत नाही.

सबब आमचे तीर्थस्वरुप नारायणराव बीन सदाशिवभट यासी इनाम जमीन मौजे टोप प्रांत रायबाग येथे ८२० बिघे व मौजे पटण कोडोली का। ईचलकरंजी येथे बिघे ८२० मिळोन बिघे ०।१० करार करून राज शक १३४ म्हणजे सन १८०७ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ३८ जाहाली.

येणेंप्रमाणें उत्पन्न संपादन केल्यापासून आजतागायत सतत भोगवटा चालत आहे.

(३) सदरहु उत्पन्न संपादन करणारे आमचे पणजे व आजे व तीर्थरुप आसोन हल्लीं आम्ही खुद्द वहिवाट करीत आहो. या उत्पन्नात आमचे पणजे आनंदराव यांची जमीन बिघे पनास सदरी लिहिलेप्रमाणे त्यांचे ते वहिवाटीतात बाकी झाडेनिशी उत्पन्नात आम्हाखेरीज दुसरा कोणाचा हिस्सा नाही व आम्ही सरकारचे पुरोहित सबब पुरोहितपणाचे अधिकाराबद्दल सदरहु उत्पन्न इनाम धर्मादाय करार करुन दिल्याप्रमाणे अनभवीत आहो.

(४) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबाबत सनदा दिल्या आहेत त्याचा तपशील

२ मौजे म्हारुळ तर्फ असनडोली याजबाबत राजशक ४२ मन्मथनाम संवत्सरे श्रावण शुद्ध ४ शंभु छत्रपती यांनीं

१ देशाधिकारी व कारकून तर्फ तारळे याचे नांवे नंबर ७३५ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ शिवछत्रपती यानी

१ गावचे नावे नंबर ७३६

१ देशमुख व देशपांडे यांचे नावे ७३७

६ मौजे यलवडे तर्फ तारळे याजबाबत राजशक ४९ शुभकृत नाम संवत्सरे मार्गशीर्ष बहुल प्रतिपदा शंभु छत्रपती यांनीं

१ साली सदाशिवभट यांचे नावे नंबर ७३८

१ पंत अमात्य यांचे नावे नंबर ७३९

१ देशाधिकारी व कारकुनाचे नावे नंबर ७४०

१ देशमुख देशपांडे यांचे नावे नंबर ७४१

राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ३ शिवछत्रपती यानी

१ देशमुख देशपांडे यांचे नावे नंबर ७४३

१ गावचे नांवे नंबर ७४२

५ मौजे वाठार तर्फ वडगांव याजबाबत ३ राजशक ५९ प्रमांदी नाम संवत्सरे आषाढ शुद्ध १ संभु छत्रपती यानीं

१ खुद्द सदाशिव भट यांचे नांवे नंबर ७४४

१ देशाधिकारी लेखन याचे नांवे ७४६

१ गावचे नांवे नंबर ७४५

२ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ शिवछत्रपती यानी

१ देशमुख व देशपांडे याचे नांवे नंबर ७४७

१ गावचे नांवे राजशक १२० नंबर ७४८

४ मौजे घरपण ता। कळे याजबाबत २ सन खमास खमसेन मया आलफे छ १९ रजब कैलासवासी जिजाबाईसाहेब यानी

१ खुद्द सदाशिव भट याचे ७५०

१ गावचे नांवे नंबर ७४९

२ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ शिवछत्रपती यानीं

१ देशमुख देशपांडे याचे नांवे ७५१

१ गांवचे नांवे नंबर ७५२
२ पनाळे येथील फडणीसी बाबत
१ राजशक ८२ बहुधान्यनाम संवत्सरे पौष बहुल पंचमी शंभुछत्रपती यानी नरसिंगराव दिल्ही नंबर १५०९
१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ श्री शिवछत्रपती यांनी आम्रोजी दळवी नामजाद व आबाजीराव व कारकून याचे नांवे नंबर १५१०
२ किले मनोहर येथील फडणीसी बाबत
१ राजशक ११० शोभाकृत नाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ११ शिवछत्रपती यांनीं पिराजी साळोखा मुद्राधारी व गोविंदराव कारकून याचे नावे नंबर १५११
१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ शिवछत्रपती यांनी रावजी निंबाळकर मुद्राधारी व व्यंकांजी नारायण सबनीस व कारकून याचे नांवे नंबर १५१२
१ खासगी मुद्रक फडणीसीबावत राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ शिवछत्रपती यानीं शिदरामराव भोसले सुभेदार यांचे नांवे नंबर १५०८
१ कोट करवीराकडील फडणीसीबाबत राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ श्री शिवछत्रपती यांनीं गोदाजी भोसला हवलदार व सदाशिव कृष्ण व कारकून यांचे नावे नंबर १५१३
२ मौजे कळंब येथील कमाविसी वतन याजबाबत गांवचे नांवे
१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ३ शिवछत्रपती यांनीं नंबर ७९१
१ सुा आर्बा समानेन छ३ रमजान नंबर ७९०
३ मौजे चिचवड येथील वतनी कमाविसी बाबत गावचे नांवे
१ राजशक ७४ प्रभावनाम संवत्सरे आश्विन शुद्ध विजयादशमी शंभु छत्रपती यांनीं नंबर ७८६
१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ३ शिवछत्रपती यांनीं नंबर ७८९

१ सुा आर्बा समानेन छ ३० फसली नंबर ७८८

२ मौजे कुरड्डू येथील कमाविसी वतनी याजबाबत गांवचे नांवे

१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ३ शिवछत्रपती यांनीं नंबर १५१४

१ सुा आर्बा तिसैन छ ६ जिलकाद नंबर १५१५१

२ सरसनदा

१ राजशक ११० शोभाकृत नाम संवत्सरे भाद्रपद शु॥ ११ शिवछत्रपती यांनी किले पनाळा येथील सबासदाची आसामी व जंजीरे शिंदूदुर्ग येथील फडणीसी व किले पनाळा १ येथील फडणीसी पनार १ तर्फेचा हक्क याजबाबत खुद्द सदाशिवभट यांचे नांवे नंबर १५१८

१ राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद्र शु॥ ३ शिवछत्रपती यानी किलेच्या फडणीसीचे नांवे व खास किलेकडील व कोट कोल्हापूर व जंजीरे माचि फडणीसीचे

येथील पोतनीसी व किले पनाळेकडून सबासदाचे आमचे वतनांत मौजे हलेवाडीचा हवाला व चिचवाड, कुरड्डू व कळंबे येथील वतनी कमाविसी याजबाबत खुद सदाशिवभट यांचे नांवे नंबर १५१९

२ जकायतीचे रहदारीबाबत

१ राजशक ५९ प्रमादीनाम संवत्सरे आश्विन बहूल द्वितीया शंभु छत्रपती यांनीं कमाविसीदारानी व लोकांनी जकायेत बैलसर१२ चे माफीबद्दल नं. ८२९

१ राजशक १२७ रौद्रनाम संवत्सरे कार्तिक शु॥ १ शिवछत्रपती यांनीं सदरहु प्रमाणें बैलसर २५ चे माफीबद्दल नंबर ७३०

२ यकमणी पचोत्र्याची बाबत माफी कैलासवासी जिजाबाईसाहेब महाराज यांनी मौजे यलवडे १ व मौजे महारूळ १ व मौजे वटार १ व वाडी आंबवे येथे गांव ४ याजबाबत सु॥ आर्बा समासीन मया आलफे छ २९ रबिलाखर

१ खुद्द सदाशिवभट यांचे नांवे नंबर ८२७

१ धारराव यादव हवलदार यांचे नांवे व त्याजकडून सदर गांवास आलाहिदा पत्रे नंबर ८२८

न चालल्या उत्पन्नाबद्दल सनदांच्या नकला राजशक १२१ आनंदनाम संवत्सरे भाद्रपद शु।। ३ शिवछत्रपती यांनीं दिल्हे ते

१ आंग्रोजी दळवी नामजाद यांचे नांवे पनाळे येथे सबासदाचे आसामीचे वतनात हलेवाडी तर्फ तारळे हा गांव पडसर सबब सनदा नाहीत.

२ सन खमास आरबेन साली बंडाई जाहाले पासून वहिवाटी फडणीसीच्या सुरु नाहीत.

१ पावणगड येथील फडणीसी केदारजी निकम मुद्राधारी यांचे नांवे

१ सामानगड येथील फडणीसी बहीरराव जाधव मुद्राधारी यांचे नांवे

येकण तीन सनदांच्या अस्सल ब।। नकला दिल्या आहेत

शिवाय पंत अमात्य व पंत सचिव व सेनापती यांनी आपआपल्या बाबती गांवगन्नाच्या माफी करून पत्रे करून दिली आहेत.

येकूण सनदा एकशे एकोणीस व असल हजर केल्या आहेत.

(५) कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी छत्रपती सरकारचे इलाख्यात चालते उत्पन्न नाही. व चवथे कलमी लिहिल्या सनदाशिवाय चालत्या उत्पन्नाच्या सनदा आम्हापासी नाहीत.

(६) सदरी पांच कलमी उत्पन्न व मजकुर लिहून दिला हा खरा आहे. यांत कम पेष यावयाचा नाहीं.

एकूण कलमे सहा लिहून दिली सही तारीख छ ११ माहे जिल्हेज उर्फ मार्गशीर्ष शु।। १३ शके १७६८ पराभवनाम संवत्सरे तारीख १ माहे दिजेंबर सन १८४६ इसवी

दस्तूर आबाजी नि।। राजोपाध्ये ब।।

समक्ष सदाशिवराव राजोपाध्ये

१ जुवूभट शिराळकर

१ आत्माराम दिक्षित लाटकर, १ विनायक रघुनाथ काळे

## बहिरजी भोसले यांची कैफियत

कैफियत नं. ९ / इ. स. १८४५

कैफीयत बरहीजी बीन रामचंद्रराव भोसले उमर वर्षे ७५ जात मराठे कसब सरदारीचे रा. करवीर सुा सन शित अरबेन मयातेत व आलफे मेहेरबान पोलिटिकल येजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक यांजकडून आंक ६६ सन १८४५ इसवीची यादी आली त्यांत इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे. त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांचे नांव डेरी आंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरुन सनदापत्रें असतील ती दाखवावी व सनदा प्रकर्णी माहीतगारी यांजकडून लिहून घेणे म्हणोन आज्ञा त्याजवरून लिहून देतो तो मजकूर खाली लिहून दिले प्रमाणें

( १ ) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

येकूण तेराशे एकोणीस रुपये नऊ आणे व गल्ला केली सदरी मापे पावणेपाच खंडी दोन मण पावणेतीन पायली व तूप वजन दोन धडे पावणेनऊ शेर येणेप्रमाणे उत्पन्न आम्हाकडे चालत आहे.

( २ ) सदरी कलमात लिहिले उत्पन्न संपादन करणार खुद्द आम्हीच अहो त्याचे कारण खाली लिहिल्याप्रमाणें

१ आम्ही महाराज सरकारांत हमेशा स्वारी समागमे राहातो या कारणावरून श्री महाराज शिवछत्रपती यानी कृपाळू होऊन मौजे बोरबडे तर्फ सातवे हा गांव स्वामी शेवा करून पुत्रपौत्रादी अनभव करणे म्हणोन सनद मिळाली ती सनद घाळ झाली. आता आम्हाजवळ नाही परंतु गांव दिल्हेपासून आजतागायत सुमोरें चाळीस वर्षे

आम्हाकडे चालत आहे. शके मितीचे स्थान नाही,

१ आमचे बंधु बळवंतराव बीन रामचंद्रराव भोसले हे निपाणीकर यांचे दंगेत लढाईचे वेळी हुजूर स्वारी समागमे लष्कराबरोबर होते. तेव्हांच लढाईचे कामात नेजा मुक्कामी तोफेचा गोळा लागून ठार जाहाले. त्याजवरून शिवछत्रपती महाराज कृपाळु होऊन मौजे बावडा कसबा हवेली या गांवी खुनकाटबद्दल जमीन बिघे बत्तीस येकूण आकार रुपये दीडशेची दिल्ही ती आजतागायत सुमारे ३७ वर्षे पर्यंत सतत आम्हाकडे चालत आहे. सदरबाबतचे सनदपत्र मिळालेले गहाळ जहाले शके मितीचे स्मरण नाही.

१ आम्ही स्वामी शेवेत फार येकनिष्ठपणाचे चाकरीची वागणूक पाहून श्रीशिवछत्रपती महाराज कृपाळू होऊन नाईकीबद्दल इनाम जमीन पाटील याचे दाखले बरहुकूम बिघे तीस मौजे चिपरी तर्फ आळते या गांवी इनाम देऊन सनद गावास व आम्हास पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने वतनाची वहिवाट करणे म्हणोन दिल्ही. ती सनद गहाळ जाहाली. त्याचे शके मितीचे स्मरण नाही. परंतु सदरहू जमिनीचे उत्पन्न आजतागायत सतत चाळीस वर्षे आम्हाकडे चालत आहे.

येकूण पोटकलमे तीन लिहिली यात मिळाले उत्पन्नाचे कारण लिहून सनदा गहाळ जाहाल्याचा मजकूर लिहिला त्याचा तपशील असा आहे की मौजे चिपरी येथे नाईकीचा वाडा सरकारातून आम्हाला मिळाला त्या वाड्यात सदरीच्या उत्पन्नाबद्दल सनदापत्रे होती ती सन सलास आशरीन साली वाडा जळाला त्याजमुळे दरोबस्त जिंदगी जळाली त्याबरोबर या उत्पन्नाबाबतच्या सनदाही जळाल्या.

( ३ ) संपादन करणार आम्हीच खुद्द आहो म्हणून सदरी दुसरे कलमात लिहीलेच आहे या उत्पन्नास हिश्येदार आम्हाशिवाय दुसरे भाऊबंद कोणी नाही.

( ४ ) पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबाबत सनदापत्रे गहाळ जाहाल्याचा मजकूर दुसरे कलमाचे पोटकलमात लिहिले आहे. परंतु करवीर मुक्कामी खासगत वाड्यात दप्तरी मिळालेल्या त्या सनदा

१ आज्ञापत्र मोकादमाने मौजे बावडे कसबे हवेली यांचे नावे छ ४ माहे शवल सन तिसा मयातेन व आलफेचे

१ आज दिवाण कोट कोल्हापूर प्रांत मोकादमे मौजे बावडे कसबे हवेली यांचे नावे छ ११ माहे शवल सन तिसा मयातेन व आलफेचे

एकूण दोन कागद सदरी लिहिल्याशिवाय पहिले कलमात लिहिलेल्या उत्पन्नाबाबत सनदपत्र आता आम्हाजवळ काही नाही.

(५) पहिल्या कलमात लिहिल्या उत्पन्नाशिवाय आणखी काही एक उत्पन्न आम्हाकडे नाही व चौथे कलमात लिहिले कागदाशिवाय उत्पन्नाबाबत सनदपत्र काहीएक नाही.

(६) सदरी पाच कलमात मजकूर व उत्पन्न लिहून दिल्हे हा मजकूर खरा आहे. यात काहीं कमीजास्ती जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास कबूल आहे.

येकूण सहा कलमात लिहून दिल्हे सही तारीख छ १६ माहे रमजान भाद्रपद वद्य ४ इंग्रजी तारीख १९ माहे सपटंबर सन १८४५ इसवी

द. रामचंद्र बापू आलासकर

साक्ष नि॥ बहीरजी भोसले राहाणार करवीर

बहीरजी भोसले दस्तूर

दाजी केशव निंबाळकर

निशानी कट्यार खाली पहातेची

१ आबाजी केशव मजुमदार
मु॥ करवीर दस्तूर खुद्द

१ गणेश सखाराम कामत
रा. करवीर दस्तूर खुद्द

❧

## आप्पाजीराव गायकवाड यांची कैफियत

कैफियत नं. ४१ / इ. स. १८४६

कैफीयत बेसमे आप्पाजीराव वीन भोवानराव गायकवाड नींा वसनागर जामदारखाना जात मराठी उमर वर्षे २९ काा करवीर सुाा सीत आर्बेन मयातेन व आलफ अैसीजे मेहेरबान पोलीटिकल येजंट सोा बहादुर प्रांत कर्नाटक यांजकडून आंख ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यात ईनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकाजवळची सनदापत्रे पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंख ५५० सन १९४५ ईसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदा पत्रें दाखवावी म्हणून आज्ञा त्यास आहे ती सनदापत्रें हजर करून त्या प्रकर्णी माहितीचा मजकूर लिहून देतो खालील प्रमाणें—

(१) हाल्ली आम्हाकडे उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

३० ताा शिरोळ सुभा मलकापूर येथील नाडगौडीपणाचे वतनाबाबत देहाय सुमारी २८ पो भाऊ वाटणी दत्ताजीराव गायकवाड याजकडे देहे दाहा १० व सुभानराव गायकवाड आरलेकर याचे घराणे त्यात देहे सुमारी ९ एकूण देहे १९ भाऊ हिस्सेकडे चालतात. ते वजा होऊन बाकी गाव सुमारी ९ आम्हाकडे आहेत त्याचे उत्पन्न गल्ले सुद्धां आदमासे नक्त रुपये

| | | |
|---|---|---|
| १ मौजे सुपुत्रे ३॥।· | १ डोणोली ३ | १ सोबत २ |
| १ बाबवडे ३॥।· | १ सरूड १०॥ | १ वडगाव २ |
| १ आमोणी २ | १ आकुर्ले २ | १ मोलावड २ |

६० किल्ले पनाळा येथील सरनाईकीचे वतनाबाबत तर्फे दोन पो ठाणे

तर्फेची गाव सुमारी ३० भगवंतराव गायकवाड आरलेकर याजकडे चालतात ते वजा होऊन तर्फ बोरगांव देहाय सुमार ३० आम्हाकडे चालतात त्याचा आकार नक्त गले सुद्धा तपशील

सदर उत्पन्ना पो आमचे मातुश्रीनी भारत व भागवताची समाप्ती केली याबाबत वेदशास्त्री बालाचार्य कटी पुराणिक राहाणार का करवीर यांस मौजे कौताली ता मजकूर येथील हक्क व जमीन बिघे ८२॥ अडीच दान पत्रें करून देऊन चालविली आहे त्या शिवाय सदर वतनाचे उत्पन्न रुपये ६० साठ आम्हांस येतात. किले पन्हाळा येथील सरनोबतीचे बाबत जमीन बिघे ८१८॥· कुरणासुद्धा याचा आकार

४३ नक्त पनाली रुपये
२७ गल्याचा आकार दरमणी एक रुपया
७० प्रो येकूण गल्ला १।≈ केली

पो वजा किले मजकुराकडे कांबळे पायतानाबाबत साल मजकुरी घेतले ते रुपये ३५ बाकी रुपये ७५० ईनाम गाव मौजे मजले तो आळते येथील धर्मादाय आमचे आज्ये बहीरजी बीन म्हालोजी नाईक यांनी वेदशास्त्र राजेश्री माणीकभट जोशी करवीरकर यास बिघे ८५ व गोपाल रुद्रकर राहाणार करवीर यांस बिघे ८२ येकूण बिघे ८७ सात व आमचे मातुश्रीनी वेदशास्त्र राजेश्री आबाभट पलुसकर यास बिघे ८३ येकूण १० दाहा बिघे दानपत्रें करून देऊन चालविली आहे. ती वजा होऊन बाकी लागणी अन्वये जमा रुपये १३०० पो गाव हक्कदार व हुजुर हक्कदार व बाबती बगैरे खर्च रुपये ५५० वजा होऊन बाकी साल मजकूर आदा रुपये आदमासे रुपये

१०५ मौजे अर्जुनवाड का शिराळे येथील नाईकीचे वतनाबाबत आकार रुपये
८० जमीन बिघे ८२६ चराऊ वहिवाटी आहे त्याचा आकार अजमासे रुपये
२५ हाक्कदारी बा॥ गावाकडून नक्त रुपये येतात
५५ मौजे घुणकी ता वडगांव येथे बक्षिसी बा॥ जमीन बिघे ८२५ आहे त्याचा खंड रुपये

५५ मौजे शिरोली ता। ठाणें येथील ईनाम जमीन बिघे ८१५ पो। दोन बिघे आमचे वडिलांचे अंतकाळी वेदशास्त्र राजेश्री रघुनाथभट सिनोलीकर जोशी यास दान देऊन चालविली आहे ती वजा होऊन बाकी बिघे ८१३ आंम्हाकडे चालत आहे त्याचा आकार बागाईत सुद्धा नक्त रुपये

८० मौजे अर्जुनवाड का। शिरोळ येथे बक्षीसी ब।। जमीन बिघे ८१३ यांचा आकार घराऊ वहिवाटीसुद्धां आदमासे रुपये

१५० का। कुंभोज येथे जमीन बिघे ०।७ चालत आहे त्याचा तपशील

६० प्रत बिघे २ ८१बक्षीसीब।। ईनाम याचा खंड नक्त रुपये

९० प्रत बिघे ८२५ सेवेबद्दल चालत त्याचा आकार खंडाचे नक्त रुपये

येकूण रुपये तेराशेहे वीस त्याचा तपशील गाव येक व वतन तीन आ। येक सुद्धां जमीन बिघे एकसेहे बत्तीस याजबाबत उत्पन्न गल्लेसुद्धां नक्त रुपये आदमासे आम्हांस पावत आसेत.

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कशाकरितां दिले व दिलेपासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील

१ आमचे नीपणजे यशवंतराव बीन म्हालोजीराव गायकवाड यास कैलासवासी संभाजी महाराज यानी दिलेचे कारण

१ शककर्ते थोरले शिव छत्रपती महाराज यांचे वेळेपासून एकनिष्ठपणे सेवा करीत आले म्हणून तर्फ शिरोळ येथील नाडगौडीचे वतन करार करुन दिले. राजशके ५९ साली सनदा जाहल्या. त्यास वर्षे सुमारे ११३ जाहाली सनदा आहेत.

१ शिरोळचे मु।। मोर्चेत बहुत करुत केली........पुन्हा जन्म जाहाला करितां किल्ले पन्हाळा येथील सरनाईकीचे वतन करार करून राजशके ८० चे सालीं सनदा करुन दिले त्यास वर्षे सुमारे ९२ जाहाली.

१ तटफणसी किले पन्हाळा येथील सरनोबती सनदा मिळोन सुमारे १२५ वर्षे जाहाली परंतु हाल्ली सनद नाही. सबब शके मिती व कारण लागत नाही.

१ आमचे पणजे म्हालोजी बीन यशवंतराव गायकवाड याजवर कैलासवासी संभाजी महाराज कृपाळू होऊन मौजे मजले तो। आळते हा गाव करार करून दिले त्यास सुमारे वर्षे ९० जाहाली. हा गाव मिळणेचे पूर्वी मौजे सावर्डे तो। शिरोळ हा गाव आमचे नीपणजे यशवंतराव बीन म्हालोजीराव याचे नावे नाडगौडी तो। शिरोळचे वतन दिले त्या सोबत राज शके ५९ साली सनद मिळाली त्या सनदेत दाखल होऊन चालत होतो ती सनद हाल्ली हजर आहे. तेणेकरून काल-क्षेप न चाले सबब पंजे यानीं हुजूर विदित केले वरून सदर गाव हुजूर घेऊन बदला मौजे मजले तो। आळते हा गाव करार करून ईनाम सनदा दिले त्या सनदा हाल्ली नाहींत. किले पन्हाळे येथील घरीं होत्या त्या साल गु॥ लुटीत गेल्या. सबब शके मितीचा ठिकाण लागत नाहीं. वहिवाट सुमोरें ९० नव्वद वर्षे निर्वेद चालली आहे.

१ आमचे आजे बहीरजी बिन म्हालोजी नाईक यास कैलासवासी शिव-छत्रपती यानी दिलेचे कारण—

१ मौंजे अर्जुनवाड का। शिरोळ येथील नाईकीचे वतन कृपाळू होऊन दिले त्यास सुमारे ३० तीस वर्षे जाहाली यांचे पूर्वी प्रथम राजशके ११६ साली मौंजे बावडे तो। हावेली येथील नाईकीचे सनदा आमचे आजे बहीरजी बीन म्हालोजी यांचे नांवे मिळोन अनुभवीत असतां ते वतन न माने म्हणून विदित केलेवरून मौजे रांगोळी का। नेजच्या सनदा राजशके १३३ च्या सादर होऊन आनभवु लागलो. पुढे रांगोळीं हा गांव इचलकरंजीकर घोरपडे याजकडे सबब अर्जुन-वाड येथील नाईकीच्या वतनाच्या सनदा सु॥ सीत आशरे मयातेन व आलफ साली सादर जाहाल्या त्यास वर्षे सुमोरें ३० जाहाली.

१ मौजे घुणकी तो। वडगांव येथील जमीन बिघे ८२५ व मौजे शिरोली तो। ठाणे येथे जमीन बिघे ८१५ सावगावचे लढाईत कैलासवासी शिवछत्रपती महाराज घोड्यावरून पडोन गाळात रुतले तेथे बहुत कस्त केली जाणून साहेब कृपाळू होऊन बक्षीसीबद्दल सदर जमिनीच्या सनदा करून दिले त्या सनदा हल्ली नाहीत. सबब शके मिती लागत नाही. परंतु सुमारे वर्षे ३८ जाहाली आदमासे

१ आमचे वडील भोवानराव बीन बहिरजी गायकवाड यांस कैलासवासी बाबासाहेब महाराज यानी दिलेचा तपशील—

१ सावगावचे लढाईत कैलासवासी शिवछत्रपती महाराज घोड्यावरून पडोन गाळात रुतले तेव्हा आमचे वडिलानी बहुत कस्त करुन काढून आणिले म्हणून अर्जुनवाड प्रांत शिरोळ येथे जमीन बिघे ८१३ व क्या कुंभोज येथे जमीन बिघे ८१२ एकूण पंचवीस बिघे बक्षीसीबद्दल करार करून सनदा करून दिले त्यास सुमारे २५ वर्षे जाहाली· हल्ली सनदा आहेत.

१ क्या कुंभोज येथील जमीन बिघे ८२५ सेवेबद्दल करार करून सनदा करून दिले त्यास चोवीस वर्षे जाहाली. सनदा आहेत.

एकूण उत्पन्न संपादन केले तागायत आजपर्यंत सतत वहिवाट चालली आहे व ज्या उत्पन्नाच्या सनदा हाल्ली नाहीत म्हणून सदरी लि॥ त्या सनदा साल गुदस्ता बंडाईचे दिवसांत किल्ले पनाळे येथे आमचे घरी होत्या. त्या हल्ल्याचे वक्ती लुटीत गेल्या.

( ३ ) सदरहु उत्पन्न संपादन करणार आमचे निपणजे व पणजे व आजे व वडील असून हाल्ली वहिवाट आम्ही खुद्द करीत आहो व या उत्पन्नास आम्हाखेरीज दुसरा हिस्सेदार कोणी नाही व सरकारात सेवा चाकरी करणेचा प्रकार असा आहे की, स्वामी सनिध हमेशा असून सेवेचाकरी करावी व म॥ वसनागर जामदारखानाचे काम पाहावे व स्वारी बाहेर जाहाल्यास बरोबर जावे लागते त्याज ब॥ खर्चास वगैरे शेर व चंदी आठरा कारखानेकडून देणेची वहिवाट आहे.

( ४ ) सदर पहिले कलमात लि॥ उत्पन्नाबाबत सनदापत्रें आम्हांजवळ होती ती हजर केली आहेत. त्याचा तपशील—

२ तर्फ शिरोळे येथील नाडगौडीपणाचे वतनाबाबत राजशके ८९ चित्रभानूनाम संवत्सरे आश्विन शु॥ विजया दशमी ईंदुवासरेच्या सनदा दोन.

१ खुद्द यशवंतराव बीन म्हालोजी गायकवाड नाडगौडा यांचे नांवे येक

१ देशमुख व देशपांडे तो शिरोळ सुभा मलकापूर याचे नांवे येक

३ किल्ले पन्हाळा येथील सरनाईकिचे वतनाबाबत राजशके ८०

श्रीमुखनाम संवत्सरे पौष बहुल पंचमी रविवासरेच्या सनदा तीन

१ खुद्द यशवंतराव बीन म्हालोजी गायकवाड सरनाईक किल्ले पनाळा याचे नावे येक व

१ देशमुख व देशपांडे तो॥ ठाणे यांचे नांवे एक

१ मोकदमानी देहाये तो॥ बोरगांव यांचे नांवे येक

२ मौजे अर्जुनवाड का॥ शिरोळ प्रांत रायबाग येथील नाईकीचे वतनाबाबत सु॥ सीत आशरे मयातेन व आलफ छ ५ माहे मोरमाचे सनदा दोन

१ रायाजी जाधव जप्तन मुद्धक यास एक

१ मोकदमानी मौजे अर्जुनवाड का॥ शिरोळ यास आज्ञापत्र येक

१ मौजे अर्जुनवाड का॥ शिरोळ येथे बक्षीसी ब॥ जमीन बिघे ८१२ बाबत सु॥ आरबा आशरीन मयातेन व आलफ छ २७ शोवालचे मोकदमानी मौजे मजकूरचे नांवे एक

२ का॥ कुंभोज येथे बक्षीसीब॥ जमीन बिघे ८१२ बाबत सु॥ आरबा आशरीन मयातेन व आलफ छ २७ माहे शोवालचे सनदा दोन.

१ खाजगी मामलेचे नावे येक

१ का॥ मजकूरचे नांवे येक

१ किता का॥ कुंभोज येथे सेवेबद्दल जमीन बिघे ८२५ याजबाबत सु॥ ईसने आशरीन मयातेन व आलफ छ १२ माहे रमजानचे मोकादमान का॥ मजकूरचे सनद येक

येकूण अकरा आज्ञापत्रे चालते उत्पन्नाबाबत आम्हांजवळ होती ती हजर केली आहेत. याशिवाय तटफणसी किले पन्हाळा येथील सरनोबतीबाबत व मौजे मजले तो॥ आळतेबाबत व मौजे घुणकी येथील पंचवीस ८२५ बिघे जमिनीबाबत व मौजे सिणोली येथील पंधरा ८१५ बिघे जमिनीबाबत सनदा सादर जाहाल्या असोन साल गु॥ हाल्याचे वक्ती पन्हाळेवरील आमचे घरी होल्या त्या लुटीत गेल्यामुळे नाहींत. कारणपरत्वे करवीरी आणल्या होल्या त्या काहीं पन्हाळे वरील घरांत मिळाल्या होल्या त्यासुद्धा सनदा अकरा हजर केल्या आहेत.

सदरी पहिले कलमांत लि॥ उत्पन्नाशिवाय आणखी चालती उत्पन्न काहीं

एक नाहीं व चौथे कलमात लि।। सनदेशिवांय चालते उत्पन्नाबाब सनदे काहींएक आम्हाजवळ नाहीं.

( ६ ) सदरी पांच कलमे उत्पन्नाचा मजकूर लिहून दिले तो खरा आहे. त्यांत कांहीं कमीजास्त जाहल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हाला कबूल आहे.

येकूण सहा कलमे लिहून दिली सही ता। छ २४ माहे जमादिलावल शके १७६८ मु।। ता।। २१ माहे मे सन १८४६ ईसवी द. खुद्द

सही—आप्पाजीराव गायकवाड नी।।
वसनागर हुजूर दस्तुर खुद्द

साक्ष

१ बापुजी विश्वनाथ नी।। लष्करकडे

१ कृष्णाजी देवराव कारकून नी।। पागा कोटी द. खुद्द

समक्ष जाब लि।। ता मजकूर अंताजी वामन



## बापूजी शिंदे
## यांची कैफियत

### कैफियत नं. ९३ / इ. स. १८४७

कैफीयत बापुजी बीन बळवंतराव शिंदे कोनवडेकर उमर वर्षे अदमासे ५० जात मराठे कसब सरदारीचे रा. मौजे कोनवडे ता॥ खानापूर सु॥ सब आर्बैन मयातेन व आलफे मेहरबान पोलिटिकल येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून आंक ६६ सन १८४५ ईसवीची याद आली त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आले त्याजबद्दल त्या त्या लोकाजवळच्या सनदा पत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नांवे डेरी आंक ५५० सन १८४५ इसवीचा सेरा जाहाला. त्याजवरुन सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन अज्ञा त्यास आम्हाकडे वतनी इनाम वगैरे चालते त्याच्या सनदापत्रे मिळाली ती हजर करून त्याजबद्दल माहीतगारीचा मजकूर देतो तो खाली लिहिले प्रमाणे—

(१) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील येकूण यकंदर उत्पन्न आम्हांस पावत असतं तेच दोनशे पावणे येकवीस सदरी लिहिले प्रो.

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कोणी कधी कशाकरिता दिल्हे. दिल्हेपासून वहिवाट कशी चालत आली त्याचा तपशील खाली लिहिल्या प्रो.

१ मौजे कोनवडे ता॥ खानापूर हा गाव इनामी आमचे बाप बळवंतराव शिंदे यासी श्रीमन्महाराज राजे शिवछत्रपती यानी दिला. गांव देणेचे कारण पटवर्धन यांची लढाई कसबा आळतेवरी जाहाली ते समई राजश्री आपासाहेब पटवर्धन यांसी धरून आणिले ते समई जखमा

खुद्द पटवर्धन यांचे हातची लागली. लढाईचा सन आर्बा तीसेन मया व आलफेस शके १७१५ मार्गशीर्ष शु॥ १० दशमीचे दिवशी धरून करवीरास आणले सबब हा गांव ईनामी करून दिला त्या दिवसापासून आम्हाकडे सतत भोगवटा चालला आहे. साल वर्षे ५३ झाली.

२ जमिनी इनाम बिघे ४१० याचा तपशील

१ मौजे वडगांव ता॥ हवेली येथील जमीन आमचे वडील बळवंतराव शिंदे राजश्री परशराम रामचंद्र पटवर्धन यांची लढाई शके १७१२ त क॥ बावडेचे माळावरी लढाई जाहाली ते समई भालेची जखम कुसीस लागली व घोडीस गोळी लागून ठार जाहाली. सबब श्रीमन्महाराजे शिवछत्रपती यांनीं मौजे मजकूरी लागवड येकपिकी काळी जमिनीची सनद करून देऊन जमीन आमचे स्वाधीन केले पासून आजपावेतो सतत भोगवटा चालला आहे. त्यांस वर्षे ५६ जाहाली कलम

३ मौजे कोनवडे येथील जमीन बिघे ८५ ही आमचे वडिलास मौजे सुळकूडचे मु॥ निपाणीकरांचे लढाई जाली ते समई जखमा मानेस भालेची लागली सबब श्री मन्महाराज श्री शिवछत्रपती यांनी मौजे मजकूरी होती ती इनामी करून दिली सन तीसा मयातेन व आलफे शके १७३० साली दिलेपासून सतत भोगवटा चालला आहे त्यास वर्षे ३८

याप्रमाणे आमचे वडीलानी संपादन केल्यापासोन सतत भोगवटा आजपावेतो चालत अहे.

(३) सदरी लिहिले उत्पन्नाबद्दल खासे घोडेनिशी सरकार स्वारी बाहेर निघालेस बरोबर जावे लागते. स्वारी समागमें बाहेर गेलेस दरमहा खर्चीस देणेची वहिवाट आहे. जी आज्ञा होई त्या प्रमाणे शेवा करावी लागती सदरहू उत्पन्नास हिश्येदार खाली लिहिले प्रमाणे

१ खुद्द बापूजीराव शिंदे
१ आमचे बंधु दौलतराव शिंदे
१ केदारजी बीन नारायणराव शिंदे

येणेप्रमाणे हिश्येदार बराबर तीन आहो

(४) सदरी पहिले कामात लिहिले उत्पन्नाबद्दल सनदापत्रें होती ती शके १७३० सन तिसा मयातेन व आलफे सालीं निपाणीकरांनी मौजे कोनवड ता।। खानापूर हा गांव लुटून फस्त केला ते समई आमची जिनगी सर्वस्वी गेली. सबब दाखवणेस कांहीं राहिले नाहीं. भोगवटा गावचा व जमिनीचा सतत चालला आहे.

(५) सदरी पाहिले कलमात लिहिले उत्पन्नाशिवाय सरकारातून काही येक नाही

(६) सदर पाच कलमात मजकुर लिहून दिला खरा आहे. त्यांत काही कमजास्त जाहालेस सरकार आज्ञा करतील ती मान्य आहे

येकूण सहा कलमात लिहून दिली

सही तारीख छ १६ माहे मोहरम शके १७६८ पराभवनाम संवत्सरे ता. ५ माहे जानेवारी सन १८४७ इसवी.

सही बापुजीराव शिंदे कोनवडेकर

दस्तुर खुद्द

साक्ष

१ जयराम हरी आंदीळकर द. खु. रुजु विनायक मुकुंद काळे.



## परशराम भोसले हवालदार यांची कैफियत

कैफियत नं. १११ / इ. स. १८४७

कैफीयत बे।। परशरामराव बीन हैबतराव भोसले हवालदार दि।। देवघर उमर वर्षे ९ राहाणार क।। करवीर याचे पाल ग्रहण करणार प्रत्यक्ष मातुश्री पिरताबाई भो सु।। सब आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलिटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून आंख ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे, त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी यांचे नावे डेरी आंख ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हांकडे वतनी इनाम वगैरे चालत त्याच्या सनदा गहाळ जाहल्या सबब माहितगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे

(१) आम्हाकडे हल्ली उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील

२६४।।। मौजे होरवडे खेडीच ता।। तारळ पेटा भुदरगड हा गाव इनामी चालत आहे. त्याचे उत्पन्न सन खमसचे दाखले वरुन नक्त जमाबंदी गावे आकार

५१३।।।. जमीन बिघे ·।≈।।। पो

२५।।। नक्त बाब

३३ वजई सनदे वगैरे

१९ वेळीत इनाम पट्टी

५९१।।

पो वजा परभारे खर्च

३५१।। हुजूर देणेस पेटा पनाळाकडे

४९।। हल्ली हकदार

३७।। जिल्हे बाबतींत बावडेकर याजबद्दल देणे ते बावडेकर याजकडून आम्हास माफी आहेत. सबब आम्हाकडे पावत आहे

६ भाव हकदार पाटील ४ जोशी २

१ धर्मादाय

२१ देवस्थानाकडे

२२ पितारखर्च गावासंबंधी

२ सनदे ब।। क २

४९०।।

बाकी रसदी बारी जे १०१

२५ कमाविस नेमणूक

७६ रसद आम्हाकडे येणेची

१२९।. गला जमा गाव आकार

११।≡ जमिनीब।। आकार उत्पन्न

।≡।।६ डोंगर पाहाणी व भागसुधा

पो परभारे खर्च

०।।।१।≡।। हुजूर बाळकृष्ण कोटीबाबती पो

१।१।= म्हाली हकदार

१ जिल्हेबाब बावडेकर पो आम्हांकडे

१।=८=।।. सदर हकदार याचे गल्यात दसेरी मापास व गाव मापास व करवीरास येथील पावती येणेस तूट वगैरे भात एकंदर खंडी चार दर अडीच मणा प्रो

.।।।≡।।१।। गावखर्च देवस्थान व धर्मादाय व सादिलवार जे व खर्च वगैरे-पीतार खर्चसुधा

बाकी रसदी गला गाव मापे

दरमणी रु. १ प्रो नक्ती आकार

२॥ तूप सुमारे मापी ४॥· अर्धा मण त्याचे खर्च
३२ मौजे भावरी येथे अर्जो इनाम जमीन बिघा १॥
आम्हाकडे चालत आहे त्याचा उत्पन्न
१८ गला गाव माप ·॥।≡ दर १
१४ नक्त रुपये

११७ इनाम जमीन व वतनदारी गावगन्ना वगैरे चालत आहे त्याचा तपशील

७५ इनाम जमिनी गावगन्ना

५० मौजे बावडा तो हवेली येथे प्राचीन सनद बिघे ४२५ पो वजा आमचे आजे रघुनाथ भो यांनीं धर्मादाय जमीन दिली ती संभू गिरबा गोसावी यांस ४२ बिघे व बाळकृष्ण भिकाजी बडवे श्री क्षेत्र पंढरपूर यांस ४१ व श्री वाडी नरहरी पुजारी यांस ४१ येकूण चार बिघे जाता बाकी जमीन ४२१ आम्हांकडे चालत आहे त्याचे उत्पन्न गावगन्ना गला कैली हर जिनसी खंडी २ येत आहे. त्याचा नक्ती आकार मणी सव्वा रुपयाप्रमाणे येकूण अजमासे

२५ मौजे हातकणंगले पेटा आळते येथे सनद जमीन बिघे ७ याचा आकार खंड रुपये

४२ वतनदारी

३२ नाइकी बा। वतनदारी कोट करवीर येथें आहे, त्याजबद्दल उत्पन्न

२१॥ मौजे उचगांव तो हवेली

२० जमीन बिघे ६ याचा भाग दर जिनसी .॥।१ दरमणी सव्वा रु. प्रमाणे

१॥ हक गावाकडून नक्ती सालाबादी पो साल गु॥ पासून निम्मे ४॥ मौजे तांबगाव ता। म॥

३ जमीन बिघे २ याचा खंड मिरची ४३ दरमणी रु. १ प्रमाणें

१॥ नक्ती हक गावकीकडून सालाबाद ३ प्रमाणें निमे

१ मौजे वसगडे गावकीकडून नक्ती सालाबादी रु. २ प्रमाणे निम्मे

२ मौंजे मुडशिंगी गावकीकडून नक्ती रु. ४ पो निंमे

दुमाला गाव

० मौंजे वरलेवड ता। हवेली येथे जमीन ८१ बिघा व नक्ती हक रु. ४ येत आहेत ते आमचे वडिलाने हैबतराव भो यानीं वेाा राजश्री श्रीपादभट पोरे यास धर्मादाय करून दिली त्यास वर्षे सुमारे १२ जाहाली त्या दिवसापासून त्याजकडे चालत आहे.

३ मौंजे नरली येथे गावकीकडून हकाबद्दल नक्त रुपये सालाबाद प्रो येत आहे.

१० मौंजे पोव्हाळ पेटा करवीर येथील पाटीलकीबद्दल दरसाल खंड येतो.

० दखलबाज कलम हवलदारीबद्दल देवघरातून श्रीचे सतकेबद्दल नक्त रुपये व नैवेद्य वगैरे प्राचीन वहिवाटीप्रमाणें चालत आहे.

येकूण देहे १ यक व जमीन बिघे येकूण चाळीस याचे नक्ती आकार तीनशे पावणे ब्याऐंशी रुपये आम्हाकडे चालत आहे

(२) सदरहू उत्पन्न कैलासवासी संभू शिवछत्रपती महाराज यांनी आमचे आजेसासरे गोविंदराव भो व सख्खे सासरे रघुनाथराव भो हवालदार यास इनाम करुन देऊन सनदा दिल्या होत्या. मिरजकर कोनेरराव याचा दंगा जाहला त्यास वर्षे सुमारे ७२ जाहली. त्या दंग्यात मौंजे बावडे ता। हवेली येथे आमचे घर होते. तेथील जिनगी व करवीर घरापैकी जिनगी श्री स्वामीचे मठात नेऊन ठेविली ती पटवर्धन यांनी श्रीचा मठ लुटून नेला त्यातून आमची जिनगी सर्व कागदपत्रसुद्धा गेली. व बावडे येथील घर जाळले. सबब सनदापत्र गेल्यामुळे कधी कशाकरिता दिले याचा तपशील व शके मिती कळत नाही. परंतु प्राचीन आमचे आजे सासरे यानी संपादन केल्यास सुमारे शंभर सवाशे वर्षे जाहली म्हणोन सांगत आले व हे देणे प्राचीन सरकारात महशूर आहे.

(३) सदरी लिहिलेले उत्पन्न संपादन करणार आमचे आजे सासरे गोविंदराव व त्याचे पत्र आमचे सख्खे सासरे रघुनाथराव भो हवालदार यांनी मिळविले. त्याचे पुत्र गोविंदराव, गिरजोजीराव, आमचे यजमान हैबतराव असे त्रिवर्गापैकी दोघांस संतती नाहीं. तर गोविंदराव कंपूच्या वेढ्यांत मृत्यु पावले. त्यात गिरजोजीराव याची बायको आम्हाजवळ आहे. हल्ली अमचे यजमान

स्वर्गस्थ जाल्या पाठीमागे मी व माझा औरस पुत्र परशराम बीन हैबतराव भो हावलदार मालीक आहो, दुसरे कोणी भाऊबंद भागीदार नाहीत. सदर उत्पन्नाबाबत सरकारांत शेवा करावी लागती. हवालदारी ब।। श्री देवघरांत खुद सरकार संनिध असावे व नाइकी ब।। कोट करवीर येथे कोटकरी लोक चाकरीवर असतात. त्याप्रमाणे येक असामी चाकरीवर असणेची वहिवाट आहे. त्याप्रमाणें येक आसामी आम्हा नि।। हल्ली लष्कर फडाकडे चाकरी करीत आहे.

(४) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबद्दल सनदापत्रे होती ती मिरजकर पटवर्धन यांचे दंग्यात गहाळ जाहाली हा मजकूर दुसरे कलमी लिहिला आहे. सबब आम्हाजवळ सनदा नाहीत. भोगवटा प्राचीन आहे.

(५) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी सरकारातून काहीयेक हत्पन्न नाही व चवथे कलमात सनदपत्र गेल्याचा मजकूर लिहिला आहे त्याशिवाय चालते उत्पन्नाबद्दल सनदपत्र नाही.

(६) सदरी पाचवे कलमात इनाम वतन संबंधे सरकारातून इनाम वगैरेचे उत्पन्न व मजकूर लिहून दिलेला खरा आहे त्यात काही कमजास्त जाहाल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हांस कबूल आहे.

येकूण सहा कलमे लिहून दिली सही तारीख छ २० माहे रबिलाखर शके १६५९ प्लवंगनाम संवत्सरे मु।। तारीख ७ माहे एप्रिल सन १८४७ इसवी दस्तुर जयराम हरि आष्टेकर रा. का करवीर

सही परशरामराव बीन हैबतराव भो
हवालदार याचे पाल ग्रहण करणार

प्रत्यक्ष मातुश्रीं पिरताबाई कोम हैबतराव भो हावलदार याचे हातची तुळसीची माळ खु।।

साक्ष

१ चिंता जिवाजी कारकून
नि।। नारायणराव जाधव हावलदार

१ बाबाजी धोंडदेव कुलकर्णी मौजे महे दस्तुर खुद. सदर सही व साक्षी समक्ष जाहल्या आहेत. ता. मा गणेश लक्ष्मण किबे कारकून नि।। सनदा बुक विनायक रघुनाथ काळे काम पहाणार इनाम कमेटी.

❀

## हणमंतराव खेडकर यांची कैफियत

कैफियत नं. १३६ / इ. स. १८४७

कैफीयत हणमंतराव आबाजी खेडकर उमर वर्षे ५३ जात कऱ्हाडे ब्राह्मण राहाणार किले पनाळा करवीर सु॥ सबा आरबेन मयातेन व अलफ मेहेरबान पोलटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडोन आंख ६६ सन १८४७ ईसवीची याद आली त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्र पाहून कळवावे म्हणून वगैरे मजकूर त्याखाली मुख्य कारभारी यांच्या नावे डेरी अंख ५५० सन १८४६ इसवीचा शेरा जाला त्याजवरून सनदापत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा त्यास आम्हाकडे वतनी इनाम वगैरे चालत आहे त्याच्या सनदापत्र मिळाली ती हजर करून त्याजबद्दल माहीतगारीचा मजकूर लिहून देतो ती खाली लिहिल्याप्रमाणे

कलम

( १ ) आम्हाकडे हल्लीं उत्पन्न चालत आहे त्याचा तपशील सन सबा अर्बेन सालीं पावले ते—

( २ ) सदरी लिहिलेले उत्पन्न कोणी कशाकरिता कधी दिले, दिल्यापासून वहिवाट कशी चालत आहे त्याचा तपशील खाली लिहिल्याप्रमाणे

१ आमचे चवथे पुरुष विठ्ठल सुरो यासी शककर्ते शिवाजी महाराज स्वामी यानी सिंहासनारुढ होणेच्या पूर्वी मौंजे असुर्डे तो रत्नागिरी येथून विठ्ठलपंत व त्यांचे कनिष्ठ पुरुष बंधु बाळाजी सुरो उभयता लिहिणार चांगले सबब स्वारीत आणोन ठेविले. पुढे स्वामी सिंहासनारुढ जाहालेनंतर इमानी सेवक येकनिष्ठपणाची वागणूक पाहून दर येक किल्यास उभयतास आसामी व घाटाखाली दरवीण

गाव इनाम पुत्रपौत्रादीं वंशपरंपरानें करुन दिलेवर काही दिवसानी संस्थाने दोन जाहली व गोपाळ विठ्ठल हे या संस्थानात राहून आसाम्याची वहिवाट करीत आले. संपादन करणार विठ्ठलपंत हे आमचे निपणजे दाखला बेहेडेस आहे.

१ किले पन्हाळे येथील फडणीसीची आसामी यास उत्पन्न गुदस्त सालीं मिळाले ते नक्त रुपये १२६ व गवता बा॥ ८ व जमिनीतील उत्पन्न ११११४– जमीन बिघे ८२७॥।३ येकरुप दिले. कलमात दाखल केले आहे. वहिवाट आमचे कनिष्ठ बंधु रावजी आबाजी यांचे मार्फत आहे सनद नाही. शक अमुक लावण्यास होत नाही. अदमासे वर्षे १५२

किले भुदरगड येथील फडणीसीची आसामी यासी उत्पन्न पहिले कलमात दाखल केले आहे. ते नक्त रुपये ५० व जमिनीबद्दल ६१॥ जमीन ब्रिघे ८२४ सनद नाही. वर्षे अजमासे १५२

आमचे तिसरे पुरुष सदरी येथे आले. पणजे गोपाळ विठ्ठल यास कैलासवासी संभु छत्रपती स्वामी यानी कुटुंबाचे योगक्षेमास मौंजे बेतवडे तो॥ असंडोली पेटा पन्हाळा येथे खापऱ्याचे वाडीनजीक जमीन बिघे ८२० पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने अजरामत इनाम करुन दिली. राजशक ५२ म्हणजे सन १७२५ इसवी, शालिवाहन शक १६४७ सालात सनदा करून दिल्या त्यास वर्षे १२२ जाहाली.

आमचे तीर्थरुप आगाजीराम यासी कैलासवासी शिवाजी महाराज स्वामी छत्रपती यांची एकनिष्ठपणे सेवा केली खासा स्वारी कृपाळू होऊन स्वास्था करून दिली ती खाली लिहिल्याप्रमाणे पेटा पन्हाळा

१ मौजे देवाळे तो॥ हवेली येथे बादे नजीक खानगी जमीन बिघे ८६ करून दिली. त्याजप्रमाणे चालत असता अलीकडे म्हणजे बावा-साहेब महाराजांचे कालकीर्दीत सन खमस सलासेन साली म्हणजे इंग्रजी सन १८३४ सात बाबाजी गाइकवाड आरलेकर यानी हुजूर गैरवाखा समजाविला की सदर जमीन ही आरलगाव आम्हाकडे चालत आहे त्या गावच्या सीमेची म्हणोन समजावून देऊन सदर जमिनीच्या सनदा करुन घेतल्या हा मजकूर आम्हास कळताच त्याच वेळी स्वामी छत्रपतीस अर्ज केला की सदर जमीन आम्हास

पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें करुन दिली असोन गाईकवाड गैरवाखा समजवितात म्हणोन विनंती करिता गाइकवाड यानी सनदा करुन घेतल्या म्हणोन त्यास म्हणजे गाइकवाड यासी मनाई आज्ञापत्र देऊन आमचे नावे भोगवटेस पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने पूर्ववत इनाम पत्रे सन खमस सलासेन म्हणजे इंग्रजी सन १८३४ इसवी राजशक १६१ साली सनदा करुन दिल्या त्यास वर्षे १२ जाहली. जमीन पेशजी दिल्यापासून आम्हाकडे भोगवटा सतत चालत आहे.

आमचे बंधु नारायण आबाजी यासी कैलासवासी शिवाजी महाराज छत्रपती स्वामी यानी पन्हाळे येथे जमेनिसीची आसामी वतनी पुत्रपौत्रादी वंश-परंपरेने स्वामी छत्रपतीची स्वारी पन्हाळ्यास सिंद्याकडील कंपूचा वेढा करवीरी बसला त्यावेळी होती. त्यावेळी स्वारी खर्चाची वगैरे तजवीज चांगले प्रकारे ठेवून सरकार उपयोगी पडलो त्यामुळे स्वारी करवीरास येतेसमई आसामीची सनद छ ४ सन इसिदे (?) मयातेन व अलफ म्हणजे इंग्रजी सन इसवीची भोगवट्यास करून दिली. त्यास वर्षे जाहली. त्याजबद्दल जमीन ८२१८३ एकूण उत्पन्न ९७ रुपये व इतलाख नेमणूक १२० रुपये चालत आहे ते पहिल्या कलमात दाखल केले आहेत.

खुद्द आम्हास कैलासवासी बावासाहेब महाराज छत्रपती स्वामी यानी सेवेबद्दल इनाम पडजमीन पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने करुन दिली. जमीन बिघे ३० त्याचा तपशील व उत्पन्न पहिले कलमात दाखल केलेले आहे. त्याजबद्दल सनद सु॥ सन सबा सलासेन मयातेन व अलफ म्हणजे इंग्रजी सन १८३६ इसवी राजशक १६२ ची भोगवटेस करून दिली त्यास वर्षे ११ दिल्यापासून सतत चालत आहे.

आमचे कनिष्ठ बंधूचे चिरंजीव आबाजी सदाशिव आमचे पुतणे यास कैलासवासी बावासाहेब महाराज यानी किले पन्हाळा येथील सभासदीची आसामीची परवानगी प्रयाग मुकामी हुजूरची खासा स्वारी सन समान सलासेन साली नगारखानेचे दगड करवीरास नावेतून रवाना करून देणेस होती त्या वेळी आम्ही व गडकरी वगैरे किलेहून हुजुरच्या दर्शनास आलो. त्या समई बहिरजी कंक म्हणोन सदर बारगिरात होता. तो मयत. त्याची आसामी पडसर होती. त्य आसामीची जमीन बिघे ३॥ ती सदर आसामीस देणेविषयी आज्ञा समक्ष

जाहाली. त्यापासून सदर जमीन चालत आहे. त्याजबद्दल रुपये १५ सालबाद वजा पडोन त्यास नऊ वर्षे जाहली. परवानगी जाहाल्यापासून आजपर्यंत सतत चालत आहे.

(३) सदरहू उत्पन्न लिहिले हे संपादन करणार आमचे निपणजे व पणजे तीर्थस्वरुप व ज्येष्ठ बंधू व आम्ही व आमचे पुतणे असोन हली वहिवाट सर्व एकत्र चालत असून आम्ही व आमचे कनिष्ठ बंधू रावजी आबासाहेब व बापू, पुतणे ज्येष्ठ बंधूचे चिरंजीव मोरो नारायण व बाळकृष्ण व माधवराव व कनिष्ठ बंधूचे चिरंजीव आबाजी सदाशिव असे मिळून उत्पन्न सदरी लि॥ त्याचा उपभोग करीत आहो. विभक्तपणा जाहलो नाही.

(४) पहिले कलमी लिहिले उत्पन्नाबद्दल सनदा हजर केल्या आहेत.

(५) सदरी पहिले कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय आणखी काही येक उत्पन्न नाही व चवथे कलमात लिहिले उत्पन्नाशिवाय चालते उत्पन्नाबद्दल सनदपत्र आम्हाजवळ नाही.

(६) सदरी पाच कलमी उत्पन्न व मजकूर लिहून दिला हा खरा आहे. यात काही कमपेश जाहल्यास जी सरकार आज्ञा करतील ती आम्हास मान्य आहे.

येकूण सहा कलमे लिहून दिली सही तारीख छ ३० माहे साबान शके १७६९ प्लवंगनाम संवत्सरे दस्तुर नारो केशव मावलकर राहाणार किले पन्हाळा तारीख १२ माहे ऑगस्ट इसवी १८४७.

साक्ष हणमंतराव बाबाजी सोनवडेकर मामलेदार

१ केसो निलकंठ कर्दे चिटणीस दस्तुर खुद्द

२ रावजी नारायण हर्षे चिटणीस दस्दुर खुद्द

दाखल तारीख १३ ऑगस्ट सन १८४७.

## हैबंती चव्हाण हुजरे यांची कैफियत

कैफियत नं. २८९ / इ. स. १८४८

कैफीयत बेशमी हैबती बिन सुभानजी चव्हाण हुजरे पोटजात कुणबी राहाणार मौजे गारगोटी तालुका खानापूर उमर वर्षे ४५ सु॥ तिसा आर्बेन मयातेन व अलफ ऐसाजे मेहेरबान पोलटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून यादी आल्या नं ६६ सन १८४५ इसवीची आली त्यांत इनाम धर्मादाय देवस्थान वगैरेच्या सनदा पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी रावबहादूर याचे नांवे डेरी अंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा सादर जाहाल्यावरून सनदा हजर करून हकीगत लिहून देतो ती खाली लिहिले-प्रमाणे तपशील

(१) हल्ली आम्हाकडे जमीन वगैरे उत्पन्न चालत आहे.

(२) सदरहू जमीन माझा आजा रत्नाजी बिन खंडोजी चव्हाण याने संपादन केली त्याचा तपशील

१ मौजे गारगोटी तो खानापूर येथील ८५ बिघे मातुश्री आईसाहेब देवाज्ञा पावली त्याचे अर्धेबद्दल महायात्रेस रवाना केला होता. तेथून यात्रा करून आला. याजवरून महाराज खुश होऊन पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने इनाम सर्वमान्य करार करून शंभु छत्रपती स्वामी यानी राजशके ७८ म्हणजे सन १७५१ इसवी साली सनदा करून दिल्या. त्यास वर्षे १०६ जाहाली. तेव्हापासून चार बिघे स्वाधीन जाहाली. ती सतत वंशपरंपरेने अनुभवीत आहे.

का। खानापूर येथील बिघे ८३ हे महाराज श्री आबासाहेब यानी कैलास-वास केला. त्याची आण देऊन महाराजास पाठविले. यात्रा करून गंगोदकाच्या कावडी हुजूर घेऊन जाण्याकरिता शिवछत्रपती स्वामी कृपाळू होऊन पुत्रपौत्रादी

वंशपरंपरेने चालविण्या विषई राजशके ८९ म्हणजे १७६२ इसवी साली सनदा करून दिल्या त्या पासोन सदरी लिहिले भाऊबंद अनुभव करीत आहेत.

येणेप्रमाणे सनदा दिल्या तागायत आजवर सतत अनुभवीत आहो.

( ३ ) सदरी पहिले कलमी लिहिली जमीन माझा आजा रंभाजी चव्हाण हल्ली उपभोग करीत आहे त्याचा तपशील—

१ मौंजे गारगोटी येथील पाच बिघ्या पो चार बिघे स्वाधीन जाहले त्याची वहिवाट माझे आज्यापासोन वंशपरंपरेने मी करून पाळीप्रमाणे सरकारात हुजरेपणाचे नोकरीवर हजर आहे.

१ का। खानापूर येथील ८३ बिघे मिळाल्यापासून माझे सख्खे चुलते बाबू व मावया बिन रंभाजी चव्हाण याजकडे भाऊ वाटणीस गेली. सबब त्याचे वंशाकडे चालत आहे. त्याचा तपशील पहिले कलमी नमूद केला आहे. त्यास नोकरी करावी लागत नाही.

येणेप्रमाणे अनुभव करीत आहो.

सदरील जमीन सनदे इनाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने आहे. परंतु मुळापासून सरकारची सेवा करणेची वहिवाट आहे. त्याप्रमाणे करीत असतो ते सदरी लिहिले आहे.

( ४ ) सदरी पहिले कलमी लिहिल्या जमिनीबद्दल सनदा सादर जाहलेल्या हजर आहेत.

( ५ ) पहिले कलमी लिहिले उत्पन्नाशिवाय चालते उत्पन्न नांही व चवथे कलमी लिहिले सनदाशिवाय चालते उत्पन्नाबाबत सनदपत्र आम्हाजवळ नाहीं.

( ६ ) सदरी पाच कलमी उत्पन्नाचा मजकूर लिहून दिला हा खरा आहे यात कमजास्त जाहल्यास जे सरकार आज्ञा करतील ते आम्हास कबूल आहे.

येकूण कलमे सहा लिहून दिली सही तारीख १ माहे आगस्ट सन १८४८ इसवी.

दस्तूर बापोजी गोविंद फडणीस दिवाण हुजरे राहाणार करवीर

सही हैबती बिन सुभानजी चव्हाण हुजरे खुद्द हातची

साक्ष

१ बाळकृष्ण यशवंत उदगांवकर

दस्तुर खुद्द

सही गणेश लक्ष्मण किले कारकून सनदा पाहाणार.

## रामचंद्र भट प्रधान यांची कैफियत

कैफियत नं. ८६ / इ. स. १८४६

कैफीयत रामचंद्र भट बीन सखाराम भट प्रधान श्री करवीर नित्रासी उमर वर्षे सु॥ २० जात देशस्थ ब्राह्मण कसब वैदिकी राहाणार को सावगाव हल्ली बा॥ कोल्हापूर वर्षे अजमासे १५० सुा सबा आरबेन मयातेन व आलफ मेहेरबान पोलिटिकल येजंट साहेब बहादुर प्रांत कर्नाटक याजकडून आंख ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यात ईनाम व सरंजाम देवस्थान व धर्मदाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्र पाहून कळवात्रे म्हणोन वगैरे मजकूर याखाली मुख्य कारभारी याचे नावे डेरी आंख ५५० सन १८४५ ईसवीचा शेरा लिहून आला त्याजवरून सनदा पत्र असतील ती दाखवावी म्हणून येविषयी आम्हाजवळ आहेत ते सनदा पत्र हजर करून सनदा प्रकर्णी मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे

(१) श्रीकडे हल्ली उत्पन्न चालत असून आम्ही वहिवाट करीत आहो त्याचा तपशील—

(२) सदरहू उत्पन्न संपादन कोणी कशाकरिता कधी दिले व दिलेपासून वहिवाट कशी चालत आहे त्याचा तपशील—

१ श्री वास्तव्य करवीर हे अनादि क्षेत्र त्यास अवांतराचे योगास्तव बहुत दिवस पूर्वी देवालय सोडून पुजारी याचे घरी होती तेव्हा आमचे निपणजे बो॥ नरहरभट यासी श्रीचा साक्षात्कारे प्रेरणा पूर्वीलप्रमाणे देवालयात आपले स्थळी नेवून स्थापना करणेविषयीं आज्ञा जाहाली त्याजवरून आमचे निपणजें यानी किले पनाळेचे मुक्कामी शंभु छत्रपती महाराज यासी जाऊन वृत्त विदित केल्यावरुन स्वामीनी राजेश्री

हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यासी श्रीचे स्थापनेविषयी आज्ञा जाहाली त्याजवरून मशारनिले करवीरास येऊन मन्मथनाम संवत्सरे आश्विन शु॥ विजयादशमी ईंदुवासरी श्रीचे आज्ञेप्रमाणे श्रीची स्थापना पूर्ववत देवालयात आमचे निपणजे नरहरभट यांचे हातून करवून तेथील श्रीच्या पारपत्याचे प्रधान त्याचा अधिकार पुत्रपौत्रादी वंशपरंपरे आमचे निपणजे यासी देऊन श्रीस पूजाअर्चेच्या खर्चास मौजे कुरुडु व को सावगाव व मौजे उचगाव १ व को करवीरची चौथाई १ व पेठ केसापुरची चौथाई १ व टंकसाल १ व पानसाल १ व टोकरा १ व खोती १ व जकायेत १ व येथील चाथाई येंणेप्रमाणे अैवज करुन राजशके ५० सन ई॥ १७२३ साली सनदा करुन दिल्या त्यास वर्षे १२२ जाहाली. हल्ली वहिवाटीस अमल चालतो तपशील—

१ मौजे कुरुड तो हवेली हा गाव श्रीकडे चालत आहे.
१ का करवीरची चौथाई
१ पेठ केसापुरची चौथाई
१ जकायत कटा येथील चौथाई
२ खोती तपकीर १ व कोती पानसाल १ येथील पानें दररोज ५० प्रो ऐनजिनसी

येणेप्रमाणें वहिवाट चालत आहे.

१ शिवाजी महाराज यासी आमचे आजे आप्पाभट यानी श्रीकडे चौघडा वगैरे खर्चास ऐवज करून देणेची आज्ञा जाहाली पाहिजे म्हणोन विदित केलेवरुन यशवंतराव शिंदे सुभेदार यासी आज्ञा जाहाली त्याजवरुन गाव व नक्ती ऐवज करार करून दिला त्याचा तपशील—

१ मौजे गोकुळ शिरगाव तो हवेली येथील सनद आमचे आजे आप्पा भट याचे नावे करून देऊन वहिवाटीस गाव श्रीकडे चालत आहे. सनद आमचे कागदपत्र सदाशिवभट याजकडे दिले त्याबरोबर गेली सबब गैरविल्हेस.

१ मौजे पाचगाव व ता हवेली हा गाव श्रीकडे करार करून राजशके १०४ सन ई॥ १७७७ साली सनदा करून दिल्या यासी वर्षे ६८ जाहाली.

१ मौजे गोकुळ शिरगांव व मौजे पाचगाव व मौजे कुरुड येथील बाबती मना करून घेऊन बाबतीवाले यासी आमचे आजे आप्पाभट यानी सुा ईहिदे मयातेन व आलफ सन १८०२ ई॥ साली आज्ञापत्रे करून घेतली त्यास वर्षे ४४ जाहाली.

१ बाळकृष्ण पागा नी॥ मौजे गोकुळ शिरगांव येथील रुपये ३५ येणे त्या पो बारगीर सेत बिघे ८६॥ आहे ते श्रीकडे खर्चीस देणे म्हणोन आमचे आजे आप्पाभट यांनी आज्ञापत्र सुा मयातेन व आलफ सन १७९९ ई॥ साली करून घेतले त्यास वर्षे ४६ जाहाली श्रीकडे चालत आहे.

१ आमचे आजे आप्पाभट यानी श्रीचे आवारात दुकाने बांधून श्रीकडे उत्पन्न केले हल्ली चालत आहे. त्यास श्रीचे आवारातील सबब सनद नाही.

१ शेरी बागायतीबद्दल जमीन बिघे ८५ श्रीकडे शिवाजी महाराज यांनी देऊन आमचे पणजेचे नावे सनद करुन दिली ती आमचे कागदपत्र सदाशिवभट याजकडे दिले त्यात सनद गेली सबब गैरविल्हेस.

१ नवरात्र उत्सवाबद्दल खर्चीस शिवाजी महाराज यांनीं यशवंतराव शिंदे सुभेदार यासी आज्ञा होऊन मामलेनी व किलेनी बेहेडेस खर्ची घाळून ऐवज करुन देऊन आमचे आजे आप्पाभट याचे नावे सनद वहिवाटीस दिली त्याप्रमाणे हल्ली श्रीकडे ऐवज चालत आहे. सनद आमचे कागदपत्र सदाशिवभट याजकडे दिले त्यात गेली सबब गैरविल्हेस.

येणेप्रमाणे उत्पन्न संपादन करणार व देणार तपशील सदरी लिहिल्या-प्रमाणे आहे.

( ३ ) सदरी उत्पन्न श्रीकडे संपादन करणार आमचे निपणजे व पणजे व आजे असून आमचे आजे चौघे बंधू विभक्त जाहाले त्यावेळेस नीरव्हापत्र जाहाले त्यात संस्थानचा अधिकार वडील आमचे आजे आप्पाभट यानी करावे म्हणोन आहे. त्याप्रमाणे हल्ली वहिवाट करीत आहो.

( ४ ) सदरी पहिले कलमात लिहिले उत्पन्नाबाबत सनदापत्रे आम्हा-जवळ आहेत त्या हजर केल्या आहेत. त्याचा तपशील खाली लिहिल्याप्रमाणे—

मौजे कुरुडु ता। हवेली व का। करवीरची चौथाई व पेठ केसापुरची चौथाई व जकायत कटा व पानसाल व तपकीर खोती येथील चौथाईच्या सनदा—

१ शालिवाहन शके १६४१ विकारी नाम संवत्सरे मार्गशीर्ष शु॥ दशमी गुरुवासरे रामाजी भास्कर यांची सनद नरहरभट याचे नांवे नंबर ९५४

४ राजशके ५० शोभनकृतनाम संवत्सरे कार्तिक बहुल सप्तमी भृगुवासरे राजा शंभु छत्रपती यांनी

१ नरहरभट यांचे नावे नंबर ९४७

१ देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा कोट कोल्हापूर याचे नावे नंबर ९४८

१ नाईकवाडी व कोट कोल्हापूर याचे नांवे नंबर ९४९

१ रखमाजी साळुखा मुद्राधारी व अंताजी नारायण कोट कोल्हापूर यांचे नावे नंबर ९५०

१ खोती तपकीर पो। चौथाईचा ऐवज श्रीकडील देणे म्हणोन ताकीद शिवाजी महाराज यानी बापु तपकिरे याचे नावे सुा। मयातेन व आलफ छ २६ माहे मोहरम नंबर ९५१

१५ मौजे गोकूळ शिरगाव ता। हवेली व मौजे पाचगाव ता। हवेली देहे दोन व बाकी माफीबद्दल शिवाजी महाराज यानी श्रीचे खर्चास येशवंतराव शिंदे सुभेदार यांसी आज्ञा होऊन आमचे आजे आप्पा भट प्रधान याजकडे नेमून देऊन सनदा करून दिले.

येकूण पहिले कलमात लिहिले चालते उत्पनाबाबत सनदा येकतीस हजर केल्या आहेत.

(५) सदरी पहिले कलमात लिहिल्या उत्पन्नाशिवाय आणखी चालते उत्पन्न नाही व चवथे कलमांत लिहिल्या सनदाशिवाय आणखी चालते उत्पन्नाबद्दल आम्हाजवळ सनदपत्र काही एक नाही.

(६) सदरी पाच कलमी उत्पन्न व त्याजबाबत मजकूर लिहून दिला खरा आहे. यांत कमीजास्त जाहालेस सरकार आज्ञा करतील त्यास आम्ही कबूल असो.

येकूण सहा कलमे लिहून दिली सही तारीख छ २२ माहे जिल्हेज शके १७६८ मु॥ तारीख १२ माहे डिसेंबर सन १८४६ ईसवी

सही

रामचंद्रभट बीन सखाराम भट प्रधान दस्तुर खुद

❧

## निंबाळकर सरलष्कर घराण्याची कैफियत

कैफियत नं. १ / इ. स. १८४६

कैफीयत हणमंतराव बीन सुलतान निंबाळकर बहादूर सरलष्कर उमर वर्षे ३८ सुा सित आरबेन मयातेन व आलफे मेहरबान पोलिटिकल सुपरिंटेंडन्ट येजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून अंक ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यात इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे. याजबाबत त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावे म्हणोन मजकूर त्याखाली मुख्य कार-भारी यांचे डेरी आंक ५५० सन १८४५ चा शेरा जाहला त्याजवरून सनदा-पत्रे असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा सादर जाहालेवरून विनंती पत्रासोबत सनदापत्रे पाठविली आहेत. परंतु सनदाप्रकर्णी माहीतगारीचा मजकूर लिहून देणे म्हणोन आज्ञा त्यावरून लिहून देतो मजकूर खाली लिहिलेप्रमाणे

(१) उत्पन्नाचा आकार वगैरे कलमे खालीलप्रमाणे

१ हल्ली आम्हाकडे चालत आहेत

१ गावे

१ मौजे दानोळी काा उदगांव १ मौजे कोथळी काा उदगांव १ मौजे डिगेवाडी काा रायबाग मौजे कोगे तर्फ हवेली

येकूण देह चार ४

१ नाईकी वतने ३

१ मौजे महागाव ताा आजरे १ मौजे कोथळी ताा उदगाव १ मौजे सोलापूर १ लग,

१ जमिनी

१ मौजे उचगाव व मळा व जमीन बिघे ८१५

१ मौजे तारदाळ येथे मळा जमीन बिघे ४८

१ बाग करवीर नदीतीर जमीन बिघे ४३ अजमासे

१ कुरण मौजे दिडोर्ली डोंगर राने

१ नक्ती

१०० देव मोहरम आलावा खर्चाबद्दल

१०० दसरा उत्सवाबद्दल

५०० तोफखानेकडून नेमणूक स्वारी समागमे निघाले असता व कामावर पाठविले असतां खर्चास देणेचा मामुल आहे, व सरलष्करीचा सरंजाम ( फाटले ) मुकामीही खर्चास देत होते.

० खेरीज मोहिनी पंगतीचे....बारमाही व विड्याची पाने सुपारी व मशालीचे तेल व बंकातून न्याहारीचे सामान व मसाला व दसरेची सनगे व बकरी व बंकातुन बाकी खर्ची व बायकासुद्धां दुस्ताची सनगे व खर्ची बायकास मोहिनी चीट लुगडी वगैरे येकूण कलमे पांच उत्पन्नापैकी चालत आहेत.

१ हल्ली चालत नाहींत

१ तनखा किले वलभगड गाव व कसबे असे कोल्हापूर

१ सरलष्करी दिल्हेसमई मनोळी तालुकेत गाव दिल्हे ४

( २ ) सदर कलमी उत्पन्न लिहिले ते संपादन करणाराचा तपशील. कैलासवासी श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांनी तीारुप कैलासवासी सुलतानराव आपासाहेब निंबाळकर यासी जामात करून घेऊन त्यास दिल्हे वर्षे अजमासे ४९

१ मौजे दानोळी का। उदगांव हा गाव लग्नासमई धारादत्त दिला. इनामी गांव दिलेपासून सतत चालत आहे.

१ लग्न झालेनंतर वडिलांचे व ति॥ कैलासवासी बाळाबाई आकासाहेब यांचे इतमामा व खर्च चालवणेबद्दल दिल्हे.

१ कुरण मौजे दिडोर्ली वैरणीच्या खर्चाबद्दल

१ मोहिनी कलमे पहिले कलमात लिहिलेप्रमाणे

१ किले वलभगड तनखासुद्धा पंधरा स्वारांनी चाकरी करावी म्हणोन दिल्ही असे वर्षे अदमासे........जहाली. तनखा दिल्हे नंतर आजमासे पाच वर्षे चालला. नंतर निपाणीकर यांनी चिकोडी तालुका घेतला ते

वेळी आम्हाकडील वलभगड तनखेसुद्धा निपाणीकर यानी घेतला. पुढे कुंपणी सरकारांनी चिकोडी तालुका महाराज सरकारांत सोडून दिल्हा ते वेळी वलभगड तनखाहि महाराज सरकारात आला तो आमचा आम्हाकडे चालविला तो अजमासे वर्षे १० नंतर समान आशरीन साली चिकोडी मनोळी तालुका कुंपणी सरकारात गेले पासून चालत नाही.

१ कैलासवासी ति॥ मातुश्री बाळाबाई आकासाहेब यानी संपादन केले.

१ मौजे कोथळी कसबे उदगांव हा गांव इतमामी खर्चाबद्दल ति॥ कैलासवासी श्रीमन्महाराज राजा शिव छत्रपती यांनीं दिल्हा त्यास वर्षे सुमार ४० जाहाली त्यापासून सतत चालत आहे.

१ वतनी नाईकी मौजे महागांव तर्फ आजरे येथील नाईकी वतन महाराज शंभु छत्रपती यानी करून दिल्हा त्यास वर्षे सुमार ३२ जाहाली. पुढे सन खमास आशरीन साली कैलासवासी भगवंतराव पंडीत प्रतिनिधी यानीं आमचे नावे सनदा करून दिल्या. त्यापासून सतत चालत आहेत.

१ जमिनी दिल्हेपासून सतत चालत आहेत.

१ बाग करवीर नदीतीरी संस्थान करणेबद्दल महाराज शिव छत्रपती यानी दिल्ही. त्यास वर्षे अजमासे ४०

२ महाराज शंभु छत्रपती यांनी चालविणेबद्दल दिल्ही.

१ मळा व जमीन मौजे उचगाव खर्च चालावे म्हणून नेमणुकीबद्दल त्यास वर्षे ३३ सतत चालत आहे.

१ मळा मौजे तारदाळ जमीन बिघे ८८ त्यास वर्षे ३२

१ खुद्द आम्ही संपादन केली कैलासवासी श्रीमन्महाराज बावासाहेब छत्रपती यानी दिल्हे.

१ चालत आहे.

२ गांव दिल्हेपासून सतत चालत आहे

१ मौजे डिगेवाडी प्रत रायबाग हा गाव देऊन वर्षे १८ जाहाली. कारण किले वलभगड तनखा कुंपणी सरकारात गेला आमची वतन वगैरे खाटले सोलापूर मुक्कामी राहात होते त्यास वाटणे ठेवणेबद्दल मौजे मजकूर हा गांव देऊन आज्ञा जाहाली की वलभगड तनखा तुमचा

होईल. नच होतो असे जाहल्यास त्याचे मोबदला सरंजाम द्यावयास येईल अशी आज्ञा जाहाल्यावरून सदरहू गांव घेतला संतत चालत आहे.

१ मौजे कोगे ता। हवेली हा गांव सेवेबद्दल दिल्हा त्यास वर्षे ११ सतत चालत आहे.

१ नाईकी वतन मौजे कोथळी का। उदगाव येथील वतने चालविली-बद्दल त्यास वर्षे आजमासे ११ जाहाली. सतत चालत आहे.

१ सरलष्करचा हुद्दा सन सबा आशरीन साली दिल्हा त्यास वर्षे १९ सतत चालत आहे.

१ नक्ती श्रीमन्महाराज राजे बावासाहेब छत्रपती यानी दिले.

२०० मोहरम अलावा खर्चाबद्दल व दसरा खर्च कैलासवासी शिव छत्रपती यानी मौजे दानोळी व मौजे कोथळी गाव दिल्हे तेथे दोन्ही गावची तोफखानाबाव रुपये २७६ होती ती तोफखाने कडील मना करून सदरी खर्चाबद्दल आम्हाकडे देविली ती सन खमास आशरिन मयातेन पर्यंत आम्हाकडे दोन्ही गाव सतत चालत आली. पुढे शित आशरीन मयातेन साली सदर बाब तोफखानेकडे देविली ते समई आम्ही अर्ज केलेनंतर

१०० मोहरम अलावा खर्चाबद्दल

१०० दसरे खर्चाबद्दल

५०० तोफखानेकडील नेमणुक होऊन अदमास वर्षे ९ जाहाली. दिल्हे नंतर दोन वर्षे चालली. पुढे गाईकवाड व वाकनीस यांनी आपले कारभारात चालविली नाही. अलीकडे दोन वर्ष चालली.

(३) तिसरे कलम

१ तीर्थस्वरुप कैलासवासी सुलतानराव आप्पासाहेब निंबाळकर हे आमचे तीर्थरुप व ती। मातुश्री श्री बाळाबाई आकासाहेब ही कैलासवासी महाराज शिवछत्रपती यांची कन्या. किले वलभगड तनखासुद्धा पंधरा स्वारानिशी चाकरी करावी म्हणोन दिली त्यास वर्षे सुमारे....जाली. तनखा दिल्हेनंतर आजमासे पांच वर्षे चाललेनंतर निपाणीकर यांनीं चिकोडी तालुका घेतला ते वेळीं आम्हाकडील

वलभगड तनखेसुद्धा निपाणीकर यानी घेतला. पुढे कुंपणी सरकारानी चिकोडी तालुका महाराज सरकारांत सोडून दिल्हा ते वेळी वलभगड तनखाही महाराज सरकारांत आला तो आमचा आम्हांकडे चालविला तो आजमासे वर्षे १० नंतर सा। आशरीन सालची चिकोडी मनोळी तालुका कुंपणी सरकारात गेलेपासून चालत नाहीं.

१ तीर्थस्वरुप कैलासवासी सुलतानराव आप्पासाहेब निंबाळकर हे आमचे तीर्थरुप व सौावती मातुश्री बाळाबाई आकासाहेब हे कैलासवासी महाराज शिवछत्रपती यांची कन्या ती आमची मातुश्री होय.

१ पहिले कलमी उत्पन्न लिहिले यांस आम्हास दुसरा हिश्येदार कोणी नाही.

१ आमची चाकरी किले वलभगड तनखा दिल्हेबद्दल पंधरा स्वारानिशी चाकरी करणेचा सांप्रदाय आहे. त्याम्र वलभगड तनखा गेलेपासून स्वारीची चाकरी आम्हाकडे नाही. वलभ तनखा गेल्यापासून जातीनिशी आम्ही करीत आलो. खेरीज आमचे इतमाम ( फाटले आहे ) चाकरी आम्हाकडे कांहीं नाहीं. असें असतां सन तीसा सलासीन साली गाईकवाड व बाकनीस हे उभयता कारभारी जहाले त्यांनीं घाटाचे रखवालीची पायचे लोक ध्यावे म्हणोन आम्हांस सांगितले तेव्हां त्यास आम्ही आमचे पायेचे लोकांची चाकरी करणेचा आजतागायत मामुल नसता तुम्ही सांगता हे काय म्हणत असता त्यानी कुंपणी सरकारांत येजंट साहेब याजकडे आमची आदावत केली. नंतर मेहेरबान लौसन साहेब बहादूर पोलिटिकल येजंट हे करवीर मुकामी आले ते समई कारभारी यांनीं आम्ही घाटची चाकरी कबूल करत नाहीं हे आणखी समजावून दिल्हे. ते समई येजंट साहेब यांनीं आम्हांस समक्ष विचारीता आम्ही आपला होता तसा मजकूर समजाविला. त्यांनीं आम्हांस समजूत दिली कीं, चाकरी करणेचा हुकूम सांगतात तुम्ही करीत नाहीं म्हणल्याने बारनीर केले असे होते. करितां आज तुम्ही हुकूमास दिगर करु नये. कबूल करून नंतर आपला मजकूर असेल तसा समजावून द्यावा म्हणजे पूर्वीपासून मामुल असेल तसे होईल अशी समजूत दिल्हे वरून नकार देऊन

चाकरी घाटची पायेचे लोकाची चालली आहे. घाटचे सरदीचे सरंजामी वगैरे आहेत व आणखी येथें सरंजामी खुद्द गाईकवाड सुद्धां होते परंतु आम्हाकडे चाकरीचा रिवाज कधीच नसतां अदावतीने आम्हाकडे चाकरी लाविली आहे. ये विसी सरकारांत अर्ज करीत आलो व करणेचा आहे.

( ४ ) पहिले कलमात लिहिले आहे त्याबद्दल सनदापत्रें १६ हल्ली हजर होती ती दिल्ही आहेत.

( ५ ) पहिल्या कलमांत लिहिल्याप्रमाणे उत्पन्नाशिवाय चालते उत्पन्न आणखी कांहीयेक नाही. चौथे कलमांत लिहिलेल्या सनदापत्राखेरीज चालते उत्पन्नाबाबत सनदापत्रें कांहीं आम्हापासी नाहीत.

( ६ ) सदर कलमात मजकूर व उत्पन्न लिहून दिल्हे हा मजकूर खरा आहे. त्यांत काही गांवचे उत्पन्नात लावणीमुळे कमजास्ती होते त्या शिवाय उत्पन्नांत तफावत नाही.

एकूण सहा कलमे लिहून दिल्ही.

## संस्थान मठ करवीर
## यांची कैफियत

कैफियत नं. २६० / इ. स. १८४८

कैफियत बाबाजी रामचंद्र नि।। श्री संस्थान मठ करवीर हल्ली वास्तव्य करवीर सु।। तीसा आरबेन मयातेन व अलफ मेहेरबान पोलिटिकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक यांजकडून डेरी अंक ६६ सन १८४६ इसवीची यादी आली त्यांत इनाम सरंजामी व धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकांजवळच्या सनदापत्रे पाहून कळवावें वगैरे मजकूर त्या खाली मुख्य कारभारी रावबहादूर याचे नांव डेरी अंक ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहाला त्याजवरुन सनदापत्रें असतील ती दाखवणें म्हणोन आज्ञा त्याजवरून

( १ ) श्री संस्थानाकडील इनामगांव व जमिनी व वर्षासनें वगैरे हल्ली चालत आहे.

( २ ) यातील हकिगत : मागील माहिती अशी आहे की प्राचीनकाली बौद्ध व जीनमत्त अशी अनेक प्रबल होऊन श्रुतीस्मृती पुराणोक्त मार्ग वैदिकी विच्छेद जाहला. तंनिमित्त सर्व देशी ब्राह्मणास तनमतानुसारी इतर जनास बहुत उपद्रव जाहला. तेणेकरून सर्व ब्राह्मकर्मास उपाधी येऊन वेद-प्रतिपाद्य ईश्वरास करुणा येऊन व महासाधु नारदादी ऋषींच्या प्रार्थनेने श्री शंकरानी वेदमात्रास संरक्षणार्थ सकल जनाचे कल्याण करावयाकारणें भूतली चिदंबरक्षेत्री सर्वज्ञ नामा ब्राह्मण त्याची स्त्री कामाक्षीबाई यांनीं आकाशलिंग चिदं-बरेश्वर याची आराधना बहुत केली होती तेव्हां चिदंबरेश्वर प्रसन्न होऊन त्यास विशिष्टा नामक कन्या उत्पन्न जाहली. ती विश्वजितनामा ब्राह्मण द्रवीड यांस विवाह करून दिली. तिचा पती वेदांत दशाभ्यासी होऊन निष्प्रपंच सर्वसंगपरित्याग करून वनवासास गेला. सदरी विशिष्टाबाई चीरकाल चिदंबराराधना करीत असतां

भाग्योदयकाल प्राप्त होऊन देवसंनिध रात्री ब्रह्मवृंद या समक्ष इश्वरी तेज बाईच्या वदन कमळी प्रवेश करिते जाहाले. नंतर तो प्रसादिक अवतार गर्भ पूर्णमास जाहाल्यावर श्री चिदंबरेश्वर शंकराचार्य नामें करून बाईचे उदरी अवतीर्ण जाहाले ते समई युधिष्ठिर शके २७२३ सर्वधारीनाम संवत्सर होता. त्या जन्मकाली आकाशामध्यें दुंदुभी झाल्याचा घोष व पुष्पवर्षाव झाला. याप्रमाणें श्री आचार्य स्वामीचा अवतार होऊन बौद्धादी नाना मते निरास सरस्वतीसह मंडणमिश्रास सुरेश्वराचार्य भारतीय असे नाम देऊन सरस्वती स्थापना कर्नाटकदेशी तुंगभद्रातीर शृंगेरी क्षेत्री स्थापनेची आज्ञा केली ती शिव–विष्णू–शक्ती––गणपती –सूर्य-भैरव अशी सहा लिंग बांधणे–तप्तमुद्रा घेणे–सुरा–मौंस–उच्छिष्ट–रक्त–जटा वाढविणें–नरक पात–यावांचून शुद्ध अहिंसामार्ग आराधना स्थापिली. नंतर चार शिष्य त्रोटकाचार्य१ हस्तामलकाचार्य२–पादपद्माचार्य३–विश्वरुपाचार्य४ असे चारी शिष्य चोहोदेशी चार मठ करून धर्मसंरक्षणार्थ स्थापना आपल्या नांवे करते जाहाले. श्री शृंगेरीमठ येथे किंचित काल वास्तव्य करून सरस्वती वचन सत्य करावयाकरितां श्री करवीर क्षेत्र दक्षिण काशीस आगमन होऊन अवतार विमल निर्मल क्षेत्रास जाऊन श्रीमत् शंकराचार्य समाधिस्त राहाते जाहाले. आचार्य स्थापित शिष्य परंपरा पुढें चालत आल्यानंतर शृंगेरी मठस्थ श्री विद्या नरसिंह भारती यांस महायात्रेस जाणेची उत्कंठा होऊन श्री व्यासप्रत चंद्रमौळेश्वर याची आराधना चालविण्याकरितां विद्याशंकर भारती या नामें शिष्य स्थापना करून यात्रेस गेले. ते यात्रा सांग करून शृंगेरी मठास परावृत्त जाहाले. असें असतां आपला स्थापित शिष्य स्वतः शंगेरी मठाचा विचार पाहूं लागला म्हणून स्वामी याही तेथून कुडलगीस येऊन समस्त ब्रह्मवृंद व राज्याचे संमतीने व्यवस्थापूर्वक कुडलगी क्षेत्रीं मठ निर्माण करून वास करिते जाहाले. तेथेही संस्थानचे सांप्रदायेनुरुप शिष्यपरंपरा मठांत चालत आली. पुढें सोमवंशी श्री कृष्णराजस्वामीचा पट्टशिष्य त्यानें अत्यादरे करून करवीरक्षेत्र दक्षिणकाशी येथें यावें म्हणोन अती भक्तिपूर्वक शुश्रुषा करीत घेऊन आला. आणि ग्रामादिक देऊन धर्मकृत्य चालवून करवीरी मठ निर्माण करून स्थापिला. इकडे श्री गुरुस्वामींनी कुडलगीस शिष्यस्वामी स्थापिले होते ते समाधिस्त जाहाले त्या जाग्यास येथून शिष्य स्वामीस रवाना केले. परंतु कुडलगी येथील मठाचे कारभारी वगैरेनी गुरुपदेश वाचून संन्यासी त्या मठास केला म्हणून गेले. स्वामी परत आले

ते करवीरी श्री गुरुस्वामी पासी राहिले. तशीच पुढें शिष्यपरंपरा शंकरभारती व नरसिंहभारती यांना चालत आली परंतु किती वर्षें कोणी संस्थानचा अधिकार चालविला याचे शके तारीख लिहिण्यास करवीरचा मूळ मठ दग्ध जाहाल्यामुळे त्यांत होते ते कागदपत्र दग्ध जाहाले. त्यावरुन तो दाखला बरोबर सांगावयास येत नाही. त्यावाचून बाहेर राहिलेले सनदापत्रावरुन उत्पन्नाचे दाखले लिहितो.

( ३ ) पहिले कलमी लिहिले उत्पन्न श्री जगद्गुरु शंकराचार्य याही श्रुती-स्मृत्योक्त धर्मविहित चालावे म्हणोन आपले शिष्य स्थापून मठ निर्माण केले. त्या शिष्यपरंपरेने करवीर येथें सदरी २ कलमीं लिहिलेप्रमाणें श्री गुरुस्वामींनी मठ स्थापन करून आचार व्यवहार प्रायश्चित्तानुशासन चालविल्याप्रमाणे शिष्यपरंपरेने चालत आले त्यास शिष्यादि जे मठास कोणी गुरुस्वामी होतील त्यास जगद्गुरु म्हणोन मठाचे धर्मकृत्य खर्च चालण्याबद्दल राजे व संस्थानिक यांनी आपआपल्या भक्ति शक्तीनुसार गांव व जमिनी वगैरे दिल्या आहेत. ते एकंदर उत्पन्न श्रीमत् शंकराचार्य प्रभृति गुरुंच्या पुण्यतिथी व मठातील छत्रे व मासोछव व रथोछव अन्न संतर्पण वगैरे धर्मकृत्यास खर्च होतो यांस विभागी कोणीच नाहीं. ज्यास गुरुस्वामी यांचा उपदेश होऊं नसल्यास घेऊन संस्थानचा अधिकार ज्यास मिळेल ते संस्थानचे मालक त्याचे आज्ञेनें संस्थानची कामें व सदरी लिहिलेले सर्व खर्च चालावयाचे अशी वहिवाट चालत आल्याप्रमाणें हल्लीं चालत आहे व गुरुपरं-परेची मालिका मठ दग्ध जाहाल्यामुळें लागत नाहीं हे सदरी लिहिलेच आहे. हल्लीं श्रीमत् नरसिंहभारती स्वामी संस्थान अधिकारी आहेत.

( ४ ) सदरहूं पहिले कलमीं चालले उत्पन्नाबद्दल सनदा मिळालेल्या दाखल्यास दिल्या.

३ मौजे हेलेवाडी का। नेसरी या गावाबा। नरसिंगराव शिंदे नेसरीकर यांनीं दिल्या त्या व श्रीमन्महाराज छत्रपती बावासाहेब महाराज यांजकडून मिळाल्या त्या—

१ संस्थानचे नावे शिंदे यांनी ता. छ १५ शावान सन खमस आशरीन शके १७४७ पारथिवनाम संवत्सरे

१ गांवचे नांवे शिंदे यांनीं सदर छ १५ सावान सन खमस आशरीन शके १७४७ पार्थिवनाम संवत्सरेची

१ येकूण दोन सनदा दिल्यानंतर श्रीमन्महाराज छत्रपती बावासाहेब महाराजानी मौजे मजकुरास कांहीं उपद्रव न करणें म्हणोन सुबराव शिंदे साहेबाचे नांवे छ २३ रजबा सन खमस सलासिन साली दिली त्याची नक्कल

१ मौजे सवंदुत्ती को। रायबाग येथे जमीन बिघे ४१५ अनंदगिरी गोसावी महंतमठ सवंदुत्ती यानीं प्रमाथीनाम संवत्सरेची

१ मौजे बलावड येथील जमीन बिघे ८५ आबाजी भिमराव नाडगौडा यांनीं त्यापले कमतापैकीं जमीन बिघे ८५ देऊन सनद शके १७३४ अंगिरानाम संवत्सरे वैशाख व।। ११ भृगुवासरे

१ लक्ष्मीबाई घोरपडे नागनूर यांनीं मौजे मजकूरी जमीन बिघे ८५ देऊन सनद छ १६ मोहरम सन सित सलासिन मयातेन व आलफ शके १७५८ सतराशे अठ्ठावन्न दुरमुखनाम संवत्सरे वै।। शु।। ६ रोजीं दिली.

(५) येकूण गाव व कमतसुद्धां नकला दिल्या त्या सदरीं पहिले कलमीं लिहिले उत्पन्नाशिवाय करवीर इलाख्यात दुसरे उत्पन्न बाबद छत्रपती सरकारच्या दुसऱ्या सनदा नाहींत.

(६) सदरहू पांच कलमी मजकूर लिहून दिला खरा आहे. पुढे चौकशीत अधिक उणे सरकारच्या नजरेस आल्यास आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तू.

येणेंप्रमाणें सहा कलमी मजकूर लिहून दिला सही तारीख छ माहे साबान शके १७७० किलकनाम संवत्सरे तारीख २५ माहे जुलई सन १८४८ इसवी

दस्तुर विठ्ठल विनायक रानडे हल्ली व।। करवीर

साक्ष

१ गोपाळ धोंडो उचगांवकर
नि।। सांगलीकर द. खुद्द

सई बाबाजी रामचंद्र नि।।
श्री संस्थान मठ करवीर
दस्तुर खुद्द

## जोशीराव
## घराण्याची कैफियत

कैफियत नं. ९९ / इ. स. १८४७

कैफियत रघुनाथराव बिन बाळ जोशीराव उपनांव सवदागर संगमेश्वरकर जोशी उमर वर्षे ६५ जात ब्राह्मण राहाणार मुक्काम क॥ करवीर सु॥ सब आर-बेन मयातेन व अलफ मेहेरबान पोलटकयाल एजंट साहेब बहादूर प्रांत कर्नाटक याजकडून आंख ६६ सन १८४५ इसवीची याद आली त्यांत इनाम सरंजाम देवस्थान धर्मादाय चालत आहे त्याजबद्दल त्या त्या लोकाजवळची सनदापत्रें पाहून कळवावे म्हणोन वगैरे मजकूर त्या खालीं मुख्य कारभारी याचे नावे डेरी अरव ५५० सन १८४५ इसवीचा शेरा जाहला त्याजवरुन सनदापत्र असतील ती दाखवावी म्हणोन आज्ञा. त्यास आम्हाकडे वतनी इनाम धर्मादाय वगैरे चालत आहे त्याजबाबतची सनदपत्रें मिळाली ती हजर करून माहितगारीचा मजकूर लिहून देतो तो खाली लिहिल्याप्रमाणे—

( १ ) आम्हाकडे हली इनाम गांव धर्मादाय व नाइकी व सरजोतिषे-पणाची वृत्ती व इनाम जमिनी व श्री गणपतीचे उछावाब॥ नक्ती नेमणूक व वाड्यांतील धर्मादाय ग्रहणाबद्दल व किरकोळ वगैरे चालत आहे त्याचा तपशील

४५६।≡॥ मंजूर सरकार वाड्यातून नक्ती उत्पन्न येत आहे ते तपशील नामनिसीवर गणपती उत्सव वगैरेसुद्धां

२॥ चैत्रमासाबद्दल

२ संवत्सर प्रतिपदेबद्दल उभयता महाराजांकडून पंचाग श्रवणाबद्दल

·।।· श्रीराम नवमी रामचंद्र याचे अभिषेकाब॥

·।।· वैशाखमास अक्षयतृतीया हिरण्यश्रवणाब॥

५। आषाढ मासाबद्दल

१ श्रावण २ आबासाहेब महाराज याचे राशीचा ·।।· कर

·।· आषाढी येकादशी तीन लिंगाचे अभिषेकाबद्दल

४ आषाढ वाा द्वादशी आबासाहेब महाराज यांचे श्राद्धाबद्दल

४४।।= श्रावण मासा प्रो।

३८= दुसरे सालावारी गोप्रदान महाराजाकडील दक्षिणा

१ चार सोमवारास

१ रुप्याचे लिंग १ पार्थिव लिंग

१ काशीविश्वेश्वर लिंग

कित्ता दर लिंगासमोर .।. खर्च व तीन लींगाचे .।।.

१ श्रावणी पौर्णिमेस यज्ञोपविते २

दक्षिणा दर .।. प्रमाणे एक रुपया

१८ श्रावणीची गोप्रदान सुमारे ६ दर गाईस तीन रुपये प्रमाणें येकूण

.।. ऋत्विजासी दक्षिणेबद्दल रुपये

.।।. गोकुळअष्टमीचे श्रीकृष्णाचे जन्मकाळ समई दक्षिणेबद्दल

२०।। अनुष्ठानाबद्दल आसामी सुमारे ७

३ श्री भवानीचे अभिषेकाबद्दल आसामी सुमारे १

१२ ग्रह जपाबद्दल आसामी ४

३ शिवाजी महाराजाचे लिंगाचे अभिषेकाबद्दल आसामी सुमारे १

२।। संभाजी महाराजांचे देवालयात लिंग लावणार आसामी १

८ भाद्रपद मासापैकीं

४ आवासाहेब महाराज यांचे पक्षाबद्दल

४ बावासाहेब महाराज यांचे पक्षाबद्दल

।४८=।। आश्विन मासापैकीं

२ नवरात्राचे अनुष्ठानाबद्दल

१ शेते छेडीबद्दल (?)

१ ग्रह जपाबद्दल
८=।। होमादिवशीं दक्षिणेस ऋत्विज यासी रुपये ·।।·
१ विजयादशमीचे रात्री
.।।. अश्विनी पूजणेबद्दल दक्षिणा

१। कार्तिकमास पो
.।. कार्तिक शुद्ध येकादशी अभिशेकाबद्दल अभिशेक सुमारे ३ दर .।. प्रमाणें
.।।. कार्तिक पौर्णिमेबद्दल दिवेलावणी दक्षिणासुद्धां
.।।. वठारकर बाईचे याज........ब।।

४ मार्गशीर्ष साला पो
बावासाहेब महाराजांचे श्राद्धाबद्दल शुा वद्य ३ दिवशी

३ पौष मासापैकी
१ बाबईसाहेब महाराज यांचे श्राद्धाबद्दल दर .।।. रु प्रो येक रुपया पनाळी
१।। संक्रात पटाबद्दल तीन रु. पो निमा खर्च
.।।. संक्रांती दिवशी हिरण्य श्राद्धाबद्दल दक्षिणा

१९ ग्रहणाबद्दल
१० गोप्रदानाचे किंमत व दक्षिणासुद्धां
३ ग्रह जपाबद्दल दक्षिणा
४।।= सुवर्णदानाबद्दल येकूण रुपये
.।।।= तीळ पात्राबद्दल
.।।. हिरण्यश्राद्धाबद्दल दक्षिणा

२८।। कित्ता शिवाय
१२।। वर्षफळाबद्दल २५ पो निम्मे रुपये
६।। अतिताबद्दल रु. १३ पो निम्मा
६।। कोट करवीरच्या ग्रह जपाबद्दल १३ पो निम्मे रुपये
३ दुसरा श्रावण सोमवार गाईबद्दल किंमत रुपये ६ पो निम्मे रुपये

२३ सरजोतिषपणाचे किलेकडून येणेचे ते. ते हुजूर खजिना पोताकडून पोचतात

११॥ किले भुदरगड नेमणूक गांवगन्ना पो २३ रु. पो निम्मे खर्च

११॥ किले पावनगड गावगन्ना पो २३ निम्मे रु.

२५५८≡ श्री गणपतीचे उत्सवाबद्दल

( २ ) सदरहू उत्पन्न संपादन कोणी केले व कशाकरितां कोणी कधी दिले व दिलेपासून कशी वहिवाट चालत आली त्याचा तपशील—सनदा आहेत ती कलमे व तपशील

१ मौजे पाटण प्रांत शिराळे हा गाव चिंतामणराव बिन दशरथ जोशीराव आमचे आजे याशी कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी यानी कूळबाब कूळ कानून सर्वमान्य इनाम करून राजशके ६९ दुंदूभीनाम संवत्सरे म्हणजे सन १७७२ इसवी सालीं सनदा करून दिल्या त्यास वर्षे १०४ येकशेचार जाहाली.

१ मौजे पाटण मागोली तो तारळे हा गाव ।चिंतामण जोतिष व मोरेश्वर जोतिष भास्कर जोतिष व बाळ जोतिष बिन दशरथ जोतिष हे आमचे आजे यासी कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी यांनीं विकारी संवत्सरी पौष वा। ३० अमावास्या सूर्यपराग पर्वकाळीं धारादत्त सह हिरण्योदक धर्मादाय इनाम करून राजशके ४७ शारवरीनाम संवत्सर म्हणजे सन १७२० इसवी साली सनदा करून दिल्या त्यास

१ मौजे पटणकोडोली कसबे इचलकरंजी या गांवी नायकी व अर्जी इनाम येकूण वतने २

(०) बाळ जोशीराव बिन चिंतामण जोशीराव आमचे वडील यासी कुलावतंस श्री शिवछत्रपती स्वामी यांनीं दोन्ही वतनें वंशपरंपरा व पुत्रपौत्रादी करून देऊन राजशके ११८ विरोधकृतनाम संवत्सरे म्हणजे सन १७९१ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे १०४ येकशेचार जाहाली.

१ सरजोतिषपणाचे वरून देहाय गांवगन्ना ती बाळ जोशी बिन दशरथ जोशी हे आमचे चुलत आजे याशी कुलावतंस श्री शंभू छत्रपती स्वामी यांनीं सरजोतिषपणाचे वतन श्रीकृपेती उदक घाळून धारादत्त करून या वतनास कानू कायदेची मोईनी करून गावगन्नानी महालानीहाय राजशक ६९ दुंदुभीनाम

संवत्सरे म्हणजे सन १७४२ इसवीस सनदा करून दिल्या त्यास वर्षे १०४ एकशेचार जाहाली.

१ मौजे नरतवडे तो तारळे या गावी इनाम जमीन चिंतामण जोशी बिन दशरथ जोशीराव आमचे आजे यांसी कुलावतंस श्री शंभू छत्रपती स्वामी यांनीं धर्मादाय इनाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने अनुभवणे म्हणोन विसा पांडाचे जमीन बिघेने जमीन बिघे ८५ इनाम करून राजशके ७२ क्रोधीनाम संवत्सरे म्हणजे सन १७४५ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे एकशेएक जाहाली.

१ मौजे गुडाळ तो तारळे या गावी जमीन बिघे ८५ भातरोपाची चिंतामण जोशीराव आजाचे आजे यासी श्री मन्महाराज मातोश्री जिजाआईसाहेब यांनी इनाम करून देऊन आज्ञापत्र करून दिल्हे त्यास राजशके ८८ सन १७६१ इसवी सालीं आज्ञापत्र जाहाले त्यास ८५ पंचाऐशीं वर्षे जाहाली.

१ मौजे मळेवाडी तो तारळे या गांवीं इनाम जमीन बिघे ४२ चिंतामण जोशीराव बिन दशरथ जोशीराव आमचे आजे यांसी कुळावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी यांनीं पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने अनुभवणे म्हणोन राजशक ८४ ईश्वरनाम संवत्सरे म्हणजे सन १७५७ इसवी साली सनदा करून दिल्या त्यास वर्षे ८९ जाहाली.

१ मौजे मुडशिंगी तो. हवेली या गांवीं इनामी जमीन बिघे ४६ विहिरी-सुद्धां बाळ जोशीराव आमचे वडील यांसीं श्री राजा शिवछत्रपती स्वामी यांनी पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने इनाम करुन देऊन आज्ञापत्र धर्मादाय संस्थान यांसी करून दिले ते सन अर्बा खमस तिसेन मया व अलफ यांसी राजशके ११९ म्हणजे सन इसवी १७९२ स इनाम करून दिले त्यास वर्षे ५४ चौपन्न झाली.

१ कसबे रुकडी मोकदमान याचे नांवे आज्ञापत्र जमीन बिघे ४१५ वेदशास्त्रसंपन्न जीवन जोशीराव आमचे वडील बंधू यांसी राजा शिवछत्रपती स्वामी यांनीं आज्ञापत्र पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने इनाम जमीन चालवणे म्हणोन आर्बा सन खमस मयातेन व अलफ राजशके १३१ सन १८०४ सालीं इनाम करून दिले त्यास वर्षे ४२ बेचाळीस जाहाली.

१ कसबे आळते यांसी मोकदमानीचे नांवे आज्ञापत्र इनाम जमीन बिघे ८६ धर्मादाय रामचंद्र जोशीराव हे आमचे वडील बंधू यांसी राजश्री शिवछत्रपती स्वामी यांनी इनाम जमीन पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने अनुभवणे म्हणोन अर्बा सन

तिसा समानीन मयातेन व अलफ राजशके ११५ किलकनाम संवत्सरे म्हणजे सन १७८८ इसवी साली इनाम करून दिले त्यास वर्षे ५८ अठावन्न आहाली.

१ मौजे पटणकुडी कसबे लाट या गावी इनाम धर्मादाय जमीन बिघे ८२० पहिले पासून चालत होती. ती राजशकाची सनद गहाळ जाहाली. त्याजवर रामचंद्र जोशीराव आमचे वडील बंधू यांनीं अर्ज करून पुन्हा भोगवटी यास आज्ञापत्र श्री मन्महाराज आबासाहेब छत्रपती स्वामी यांनी सन तिसा आशर मयातेन व अलफेचे मोकदमानचे नावे करून दिले तो राजशके १४५ म्हणजे सन १८१८ इसवी साली आज्ञापत्र मिळाले व गावास दाखल करून आम्ही भोगवटी यास ठेवून घेतले त्याजला वर्षे २८ जाहाली.

१ कसबे करवीर येथील जमीन धर्मादाय इनाम बिघे ८१२।। साडेबारा तपशील

१ गणेश बागेबद्दल जमीन ८२।। बिघे चिंतामण जोशी बिन दशरथ जोशीराव आमचे आजे यांसी श्रीमंत सकल सौभाग्यादी संपन्न मातोश्री जिजा आईसाहेब महाराज यांनी आज्ञापत्र सन सबा खमसेन राजशके ८३ म्हणजे सन १७५६ इसवी सालीं आज्ञापत्र दिले त्याजला वर्षे नव्वद जाहाली.

१ पदमाळेचे पाण्याखाली जमिन बिघे ८५ बाळ जोशीराव बिन चिंतामण जोशीराव आमचे वडील यांसी क्षत्रीय कुलावतंस राजाराम शिवछत्रपती स्वामी यांनी गणेश चतुर्थीचे उत्सवाचे बेगमीस भूमीदानपत्र सनद राजशके १११ म्हणजे सन १७८४ इसवी सालीं मिळाली त्यांस वर्षे ६२ बासष्ट जाहली.

१ मिराबागेबद्दल जमीन इनाम बिघे ८५ बाळ जोशीराव बिन चिंतामण जोशीराव आमचे वडील यांसी क्षत्रीय कुलावतंस श्री शिवछत्रपती स्वामी यांनी श्रीगणेश चतुर्थीचे उत्सवाबद्दल भूमीदान इनाम करून देऊन सनद राजशके ११२ विश्ववसूनाम संवत्सर म्हणजे सन १७८५ इसवी साली मिळाली त्याजला वर्षे ६१ एकसष्ट जाहली.

१ मौजे टेकोली तो मलकापूर या गावी इनाम जमीन बिघे ८३ भोपजोशी उर्फ भास्कर जोशी बिन दशरथ जोशी हे आमचे आजे यासी क्षत्रीय कुलावतंस राजा शंभू छत्रपती स्वामी यांनी इनाम करून देऊन सनद राजशके ८५ प्रमाथी-नाम संवत्सर म्हणजे सन १७५८ इसवी साली मिळाली त्याजला वर्षे ८८ जाहली.

सनदा गैरविलेस पडून गहाळ जाहाल्या त्याच्या तपशील—

१ मौजे उचगांव तो हवेली या गांवी जमीन २० बिघे आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसी श्रीमन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनी धर्मादाय इनाम करून दिली त्यास अदमास वर्षे पन्नास जाहाली. सन व शके लागत नाही.

१ मौजे कोगे तो हवेली या गावी जमीन बिघे ८१० आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यासी श्रीमन्महाराज शिवछत्रपती स्वामी यानी इनाम धर्मादाय करून दिली त्याजला वर्षे पंचेचाळीस ४५ पासून पन्नास पर्यंत जाहाली असतील. सन शके मितीचे स्मरण लागत नाहीं.

१ मौजे वडणगे तो ठाणें येथे जमीन बिघे ८५ धर्मादाय आमचे बंधू रामचंद्र जोशीराव यासी श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं इनाम करून दिली त्यास वर्षें पंचेचाळीस पासून पन्नास जाहाली असतील. सन शकाचे स्मरण लागत नाहीं.

१ मौजे हातकणंगले या गांवीं जमीन बिघे ८६ सहा धर्मादाय आमचे वडील बाळ जोशीराव यासी श्रीमन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं इनाम करून दिली त्यास वर्षें ५० अदमास पन्नास पंचावन्न जाहाली असतील सन शकेचे स्मरण लागत नाही.

१ मौजे जांबळी प्रांत रायबाग या गांवीं जमीन बिघे ८१० आमचे बंधू रामचंद्र जोशीराव श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं धर्मादाय इनाम करून दिली त्याजला वर्षे शेचाळीस पासून पन्नास अदमासे जाहाली असतील. सन शकाचे स्मरण नाही.

१ मौजे दानवड प्रांत रायबाग या गांवीं जमीन बिघे ८१० धर्मादाय आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसी श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी यानीं इनाम करून दिली त्याजला वर्षे अदमासे पन्नास ५० जाहाली सन शकाचे स्मरण लागत नाहीं.

१ मौजे तुरव तो तारळ या गांवीं इनाम जमीन बिघे ८५ आमचे वडील बाळ जोशीराव यांसी श्रीमन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं धर्मादाय इनाम करून दिले त्याजला वर्षे अदमासे त्रेपन्न अथवा चौपन्न जाहाली असतील सन शकाचे स्मरण लागत नाही.

१ मौजे सावर्डे तर्फ तारळे या गांवीं जमीन बिघे ८५ धर्मादाय इनाम आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसीं श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी

यांनीं इनाम करून दिली त्याजला वर्षे ५० पन्नास अदमासे जाहाली असतील. त्याचे सन शकाचे स्मरण लागत नाही.

१ मौजे शिंगणापूर तर्फ हवेली या गांवीं जमीन बिघे ८५ इनाम धर्मादाय करून दिली. आमचे वडील बाळ जोशीराव यासी श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं इनाम करून दिली त्याजला वर्षे अदमासे पंचावन्न छप्पन्न जाहाली. सन शकाचे स्मरण लागत नाही.

१ कुरणे इनाम करून दिली आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसी. डागवार तपशील

१ मौजे कागल तो हवेली या गांवीं

१ मौजे मुडशिंगी तो हवेली या गांवीं

येकूण दोन डाग श्री मन्महाराज शिवछत्रपती स्वामी यांनीं इनाम करून दिली त्यांस वर्षे अदमासे पंचेचाळीस जाहली सन शकाचे स्मरण लागत नाही.

हुजूर वाड्यातील नक्ती उत्पन्न येते ते आमचे आजे चिंतामण जोशीराव यांसी श्री मन्महाराज शंभू छत्रपती स्वामी यांनीं इनाम धर्मादाय करून दिले त्याजला अदमासे चौऱ्याऐंशी वर्षे होतील. सन शकाचे स्मरण लागत नाहीं.

श्री गणपतीचे उत्सवाबद्दल नेमणूक नक्ती येती ती आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसी श्री मन्महाराज शिवछत्रपती यांनीं इनाम धर्मादाय करून दिली त्याजला अदमासे वर्षे ५० होतील. सन शकाचे स्मरण लागत नाही.

१ पेटा पनाळा येथील नागनाथ सबनिसीचे धंदेबद्दल आज्ञापत्र आमचे आजे चिंतामण जोशीराव यांसी श्री मन्महाराज शंभू शिवछत्रपती स्वामी यांनीं सन सब खमसेन मया अलफेचे राजशके ८३ धाता संवत्सर म्हणजे सन १७५६ इसवी सालीं आज्ञापत्र वहिवाटीस व भोगवटी यांस करून दिले त्याजला नव्वद वर्षे जाहली.

१ मौजे सागवड कसबे सावगांव या गांवाकडून नक्ती नेमणूक आमचे वडील बंधू रामचंद्र जोशीराव यांसी पेसजी वहिवाटीची सनद दिली होती ती गहाळ जाहली. सबब घोरपडे हिंदुराव यांसीं श्री मन्महाराज आबासाहेब छत्रपती स्वामी यांनीं हली भोगिवटेस आज्ञापत्र सन खमस असेर मयातेन व अलफे राजशके १४१ भाव संवत्सर म्हणजे सन ११८१ इसवी सालीं आज्ञापत्र दिले त्याजला वर्षे ३२ जाहली.

( ३ ) सदरी लिहिले उत्पन्न खुद्द आमचे आजे चिंतामण जोशी व मोरेश्वर जोशी व भोप जोशी उर्फ भास्कर जोशी व बाळ जोशीराव याजपैकी तीन आसामीस पुत्र नाहींत. चिंतामण जोशीराव यासी पुत्र बाळजोशीराव यासी पुत्र पाच रामचंद्र जोशीराव व नाना जोशीराव व जिवराव जोशीराव व आम्ही खुद्द व दाजीबा जोशीराव त्यापैंकी रामचंद्र जोशीराव यासी पुत्र बाबाजी जोशीराव त्यास पुत्र भास्करराव व विठ्ठलराव हे दोघे आहेत. व नाना जोशीराव यासी पुत्र नाहीं. जिवराव जोशीराव यासी पुत्र रावजी जोशीराव व खुद्द आम्हासी पुत्र कृष्णराव आहेत व कनिष्ठ बंधू दाजीबा जोशीराव आहेत. याजप्रमाणे आम्ही एकंदर आहो. विभक्त जाहलो नाही. सदरहू उत्पन्न वतनी गावे इनाम २ व नाइकी व सरजोतिषेपणा गावगन्ना धर्मादाय जमिनी व नक्ती वाड्यातील वगैरे नेमणूक येणेप्रमाणे उत्पन्न आहे. याजबद्दल आम्हाकडे हुजूर सरकारात काम करावयाचे ते श्री मन्महाराज छत्रपती स्वामी याचे सन्निध राहून पंचांगश्रवण मुगधे प्रश्न व प्रतिवर्षी वर्षफळ करून राज्याचे कल्याण इच्छित असावे याप्रमाणें आम्ही आसामीचे काम चालवीत आहो.

( ४ ) सदरी पहिलें कलमात लिहिले उत्पन्नाबाबत सनदा हजर केल्या आहेत.

( ५ ) सदरी लिहिले उत्पन्न पहिले कलमीं लिहिले त्याशिवाय करवीर इलाखेत उत्पन्न नाहीं व चवथे कलमात लिहिलेल्या सनदपत्रांशिवाय आम्हापासी सनदपत्र नाहीं.

( ६ ) सदरी पाच कलमीं उत्पन्न व मजकूर लिहून दिला तो खरा आहे यात काहीं कमपेश जाहलेस सरकार आज्ञा करतील ते आम्हास मान्य.

येकूण सहा कलम लिहून दिली सही ता. छ १३ माहे संफर सन १८४७ ता. ३१ जानेवारी शके १७६८ पराभवनाम संवत्सर दस्तूर रामचंद्र बापूजी आळास्कर निं।। जोशीराव मु।। करवीर

सही रघुनाथ जोशीराव बिन बाळ जोशीराव मु।। करवीर द. खु.

साक्ष १ सदाशिवराव जोती दिवाण व नरसिंगराव व्यंकटेश

दस्तुर खुद्द भिरडीकर दस्तुर खुद्द

रुजू विनायक रघुनाथ काळे काम पाहाणार इनाम कमेटी

## राव विश्वासराव गायकवाड घराण्याची कैफियत

(१) राज्याभिषेक शके ८० (१७५४) महाराजानी शिराळेचे ठाणे घेतले ते वेळी गुमुटास सुरूंग लाविले यास बत्ती देणेस कोणी धजेना. तेव्हा यशवंतराव बिन म्हाळोजी गायकवाड याणी प्राणाचा निश्चय करून सुरूंगास बत्ती दिली. त्यांचे अंग जळाले परंतु प्राण वाचून पुनर्जन्म जहाला. ते वेळी किल्ले पन्हाळेच्या सरनाईकीच्या सनदा दिल्हा. यापूर्वी मौजे आरळे हा गांव व शिराळे तरफेची नाडगोंडी व गावगन्ना इनाम जमीन दिले आहेत........ कलम

(२) सन १७७८–७९ सन आल्फे तिसा सबैन मैया व आलफ यासाली मल्हारजी सरखवास, सिताराम यादव, नेरलीकर व आप्पाजीपंत परखंबले-कर यासी राज्याचे कामावर ध्यावे अशी मसलत करून येसाजी शिंदे सुभेदार याजवर गलबला करावी असा विचार चालविला. हा मजकर आमचे आजे म्हणजे हैबतराव गायकवाड यांचे वडील गुजाजीराव गायकवाड यासी समजला. नंतर त्यानी सुभेदार यांचे कानावर घातला, तेव्हा सुभेदार यांनी त्या मसलतीत जे होते त्यांस कैद करून सिताराम यादव याचे व नेरलीकर याचे व सौंदत्तीकर गोसावी याचे व आप्पाजीपंत परखामलेकर याचे डोळे काढून मल्हारजी भोसले यासी कैदेत ठेविले ते समई सरखासीचा किताब आमचे आजे गुजाजीराव गायकवाड याजवर सरफराजी होऊन तेचवेळी शिवाजीमहाराजांनी सरखवासी दिली.......... कमल

(३) वडगांवचे मुक्कामी परशराम पटवर्धन व कराडकर पंत वगैरे या लढाईत होते.

शके १७१५ राजशक १२० (इ. स. १७९४) सन आर्बा तीसेन साली परशरामभाऊ यांनी स्वारी करुन करवीरावर मोहीम केली तेवेळी

टेंबलाईनजीक लढाई होत होती. तेव्हा महाराजानी खंडणी करून बोलीस दिले. यांत आमचे वडील दौलतराव गायकवाड व नारायणराव पंडित, उदाजीराव आबासाहेब चव्हाण व गोपाळराव जाधव सरनोबत यांचे चिरंजीव जीवराव, लिंबाजी यादव यांचे चिरंजीव व भाऊ जोशी यांचे चिरंजीव यासी दिले होते. ते तिकडून सुटून आलेवर पुन्हा महाराज स्वारी जाऊन तासगावचे ठाणे घेतले. ते समयी आमचे वडिल चुलते हैबतराव व आमचे वडील दौलतराव व धाकटे चुलते विश्वासराव असे त्रिवर्ग बंधू यांनी बहुत मेहनत केली........ कलम.

(४) सन........ साली परशरामभाऊ यांचे चिरंजीव आप्पासाहेब फौज घेऊन राज्यात आले. ते समयी महाराजांनी करवीराहून फौज देऊन हैबतराव गायकवाड यासी पाठविले. सरकारची फौज निघेपर्यंत आघाडीस हैबतराव गायकवाड, आमचे वडिल दौलतराव गायकवाड व विश्वासराव गायकवाड हे त्रिवर्ग बंधू आपले घरची पागा व हुजूरून आम्हाकडे दिले ती दिवाणपागा व जमाव घेऊन गेले ते आळतेचे रानात त्याची यांची लढाई होऊन त्याजवर गर्दी करुन आप्पासाहेब पटवर्धन यासी जरिपटकेच्या हात्तीसुद्धा धरून करवीरास आणिला. कलम.

(५) १७१८ राजशक १२३ (इ. स. १७९७) सन सब्बा तिसेन साली भुदरगड किल्ला परशरामभाऊ यांनी घेतला होता. तो परत घेणेकरीता महाराजांनी हैबतराव गायकवाड याजबरोबर उदाजीराव घाटगे सर्जेराव व मानाजी घोरपडे वाघापूरकर व खासबारदार व जमाव देऊन पाठविले तेथे जाऊन किल्ला बहुत शरतीने सर केला ते वेळी हैबतराव गायकवाड व उभयता बंधू यांनी बहुत मेहनत केली. नंतर महाराज सरकारची स्वारी किले मजकुरास आली: ते वेळी विश्वासराव हा किताब गुजाजीराव गायकवाड यासी देऊन हैबतराव गायकवाड हे सरखवास व दौलतराव गायकवाड हे नाईक असे किताब जाहले.... ... कलम.

(६) शके १७१९ राजशक १२४ (इ. स. १७९८) सन समान तिसेना साली अखेरीस महाराजांची स्वारी कऱ्हाडचे मोहिमेस काले मुक्कामी गेली त्यावेळी गुजाजी गायकवाड यासी फार स्वास्थ नव्हते. सबब हेरले मुक्कामी राहिले होते. म्हणून स्वारी समागमे, (हैबतराव गायकवाड) व बंधू त्रिवर्ग कोणी गेले नव्हते. लष्कर जाताना 'आनंदी' तोफ पंचगंगेचे उतारास गाळात

रुतली ती निघेना. तेव्हा महाराजानी त्रिवर्ग गायकवाड यासी येणे विषयी हुकूम (आज्ञापत्र) आला. त्रिवर्ग बंधूसुद्धा जाऊन जातीने कसरत करून तोफ काढून लष्करबरोबर काले मुक्कामापर्यंत जाऊन तेथून वडीलाचे दुखणेबद्दल निरोप घेऊन माघारी आले नंतर हेरलेहून येऊन करवीर मुक्कामी आषाढमासी वडिलांचा काळ जाहला. कराड मुक्कामी लढाईचा प्रसंग आला. समयी वडिलांचे उत्तरकर्म करून निघुन येणेविषयी महाराजांचा हुकूम आलेवरून त्रिवर्ग बंधू निघून गेलेवर लढाई जाहली त्यात हे त्रिवर्ग बंधू पुढे आघाडीस होऊन शत्रूकडील मानकरी रणनवरा घोडेस व आपले कपाळास बाशिंग बांधून आलेला त्यास ठार करुन पुढे चालून घेतले आणि शहरात जाऊन किल्लेचे तटाजवळ गेले आणि महाराजाचा जरिपटका पेशजी नेलेला परत घेऊन किल्ला घेणेचा प्रयत्न चालविला. हे वर्तमान लष्करांत महाराजास समजले. तेव्हा महाराजांनी आपले पदरची अशी मनुष्ये खर्च होतील म्हणून माघारी येणेविसी आपले पायाची शपत घालुन नारायणराव घोरपडे सेनापती यासी पाठवून परत आणविले. महाराजांची सरफराजी होऊन बक्षीस आपले गळ्यातील कंठी व तुरा व शिरपेच त्रिवर्गास दिले व तेच वेळी किताब हैबतराव गायकवाड यासी विश्वासराव, दौलतराव गायकवाड यासी सरखवास व विश्वासराव गायकवाड यासी नाईक असे होऊन वस्त्रे दिली.

(७) शके १७२१ राजशक १२६ (इ. स. १७९९) सन मैया तैन व अल्फे साली भाद्रपद मासी परशरामभाऊ यासी हैबतराव गायकवाड व उभयताबंधू यांनी धरुन आणून महाराजांचे स्वाधीन केले.

(८) सन मजकुरी माघमासी परशुरामभाऊ यांचे चिरंजीव अप्पासाहेब यांनी पलटण आणून करवीरास वेढा दिल्हे व करवीरी लढाई जाहल्या. पुढे रत्नाकरपंत राजाज्ञा व प्रीतिराव चव्हाण हिंमतबहादर करवीरात राखणेबद्दल करवीरी राहिले. महाराजांची स्वारी किले पनाळेचे माचीस राक्षीचे वाडीवर होती. तेथे दररोज लढाई होत होती. त्यात शिवरात्रीचे दिवशी मातब्बर लढाई जाहली. आघाडीस हैबतराव गायकवाड व बंधू उभयता दौलतराव व विश्वासराव असे— (अपूर्ण).१

---

(१) राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास : पृ. ७३

## घोरपडे अमीरुल उमराव घराण्याची कैफियत

दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती / इ. स. १८५१

यादी घोरपडे अमिरुल उमराव व त्याचा इतिहास वडील वृद्ध सांगत आल्या माहितीवरून वर्णन केला आहे. तो येणेप्रमाणे—

घोरपडे हे उपनाम पडण्याचे पूर्वीचे उपनाम सिसोदे भोसले होते. नंतर अवरंगजेब बादशाहाचे समक्ष हापशी लोकांचे राज्यात स्वारी करून किल्ल्यावर हल्ला चढवले. तें हल्ला असे की, किल्ल्याच्या जंगीत घोरपड म्हणून जंगली जनावर राहते, ते बसले होते. त्यास धरून पूर्वजाने हल्ला करून किल्ला हस्तगत झाला. त्या दिवसापासून घोरपडे असे उपनाम व निशाण बंडी म्हणजे काळी पांढरी मिश्रित वागणेस पादशाहाचा हुकूम होऊन त्याप्रमाणे आजपावेतो वहिवाट चालली आहे. त्या मूळ पुरुषाचे व कोणत्या पादशाहाचे कारकीर्दीत कोणते सालात त्याचा दाखला आता लागत नाही. परंतु याप्रमाणे मजकूर जगप्रसिद्ध आहे. पुढे नावाची वगैरे माहिती लागती ती तपशीलवार लिहिली जातात.

१ मूळ पुरुष माहाळोजीबावा घोरपडे हे हिंदुस्थानातून या प्रांती दक्षण देशांत येऊन पाटिलकी वगैरे वतन संपादन करून होते. त्यास दोघे पुत्र. एकांचे नाव भवानबावा, दुसरे संताजीबावा.

२ भवानबावा सदरी पाटिलकी वगैरे संपादन केले वृत्तीवर हल्ली पुणे प्रांती जांब वगैरे ठिकाणी आहेत. त्याणे वर्णन केले नाही.

३ संताजीबावा शूर व पराक्रमी. हे दिल्लीचे पातशाईजवळ मानकरी होते. त्याचे पुत्र माहाळोजीबावा.

४ माहाळोजीबावा हेही सदर पादशाहाजवळ मानकरी याचे इरादेनीं पादशाहाचे पदरी असतां त्यास तिघे पुत्र, संताजीबावा, बहिरजीबावा,

मालोजीबावा एकूण ३.

५ सदर संताजीबावा व बहिरजीबावा व मालोजीबावा हे तिन्ही पुत्र अव्वल आमचे संपादक महान पराक्रमी व शूर आणि बुद्धिमान होत्साते करवीर व सातारेकर महाराजांचा उत्कर्ष झाला तो या पुरुषाचे बळानें. हे पातशाहास जाहीर असून करवीर व सातारकर महाराज यास पट्टाअभिषेक झाला, त्यावेळीं सदरहू आमचे हे त्रिवर्ग पुरुषाचीही बढती झाली. येणेप्रमाणें—

संताजीबावा यास सेनापती हे किताब आणि पाच गाव इनाम व गजेंद्र-गड परगणा पनाळे प्रांती देशमुखी दिली. त्याचे वंशाचे वर्णन यांत केलेलें नाही.

मालोजीबावा हे आमचे मूळ पुरुष, हे आम्हास निपणजेचे आजे होत. यासी अमिरुल उमराव हे किताब आणि पाच गाव इनाम व आजरे परगणा आणि बेळगाव प्रांतची देशमुखी दिली. हे आमचे अव्वल संपादक याचे वंशाचे वर्णन.

येणेप्रमाणे पादशाहाचे हुकुमावरून करवीर व सातारकर महाराज यांनी आमचे वंशास उत्तेजने देऊन आपलेजवळ ठेवून घेतले. नंतर सदरहू पुरुष आपआपले संस्थानावर राहून महाराजाबरोबर स्वारी मोहिमा वगैरे करून महाराज सरकारची फारच बढती केली. यापैकी आमचे पूर्वज मालोजीबावा या प्रांतीच मृत्यु पावले. यास पुत्र शिवजीबावा.

६ शिवजीबावा मोठे राजकारणी पुरुष, आमचे निपणजे, यास पुत्र यशवंतराव १ एक, माद्याळकर रामचंद्रराव १ एक, मालोजीराव १ एक असे त्रिवर्ग आमचे पणजे. याजपैकी संस्थानावर चुलत पणजे यशवंतराव यास ठेवून (माद्याळकर याचे वंशाचे वर्णन केले नाही.) त्यास महाराज सरकारचे स्वारीबरोबर नेमून शिवजीबावा निपणजे हे आमचे सख्ये पणजे यानी मालोजीराव आपला पुत्र बराबर घेऊन कर्नाटकप्रांती मोहीम करण्यास गेले. बरोबर दुसरे घराणेचे व त्यांचे वे कलमात सांगितलेले संस्थान राजकारणामुळे अफरातफरी झाल्याचे वर्तमान ऐकून या प्रांती शिवजीबावा निपणजे येणार, इतक्यात त्याच प्रांती मृत्यु पावले. त्याचे पुत्र आमचे पणजे मालोजीराव बरोबर होतेच.

७ पणजे मालोजीराव यानी दुसरे घराणेचे शिदोजी हिंदुराव बरोबर निपणजानी नेला होता त्यास गुत्ती संस्थानात ठेवून तिकडील कामाची बंदोबस्ती त्याजकडे सांगून पणजे मालोजीराव या प्रांती इकडील बंदोबस्ताकरिता

आले, आणि येथील संस्थान चुलते-पणजे यशवंतराव होते त्याची रवानगी गुत्ती संस्थानाकडे करून दिली. नंतर चुलते-पणजे तिकडे जाऊन पोहोचल्यावर गुत्ती संस्थानावर शिदोजी हिंदुराव दुसरे घराणेचे पुरुष निपणजे यांनी स्थापना करून आले होते, ते त्यानी तिकडील किल्ले वगैरे दुरुस्त करून होते, आबादी केली आणि इरादाही मोठा ठेविला. इतक्यात ते मृत्यु पावले. त्यास पुत्र मुराराव आणि आमचे चुलते-पणजे यशवंतराव, मिळून गुत्ती संस्थानचे काम चालवून त्या प्रांतीं देवालय, तलाव, धर्मशाळा वगैरे कित्येक धर्मकृत्याचे काम केले; आणि श्रीमंत पंतप्रधान यासी दोस्ती ठेवून तिकडील पाळेगार वगैरेचा बंदोबस्त राखिला हैदर याजबरोबर लढाया केल्या. शेवट हैदर यानी गुत्ती किल्ला घेऊन धरून कपाळगडावर ठेविला. तेथें मृत्यु पावले. मुरारराव यास पुत्रसंतान नाहीसा झाला. चुलते-पणजे यशवंतराव यास दोघे पुत्र शिवराव १ एक व व्यंकटराव १ एक हे आमचे चुलते-आजे. त्यातून शिवराव यास मुरारराव यास दत्तक देऊन व्यंकटराव यानी पहिलें संपादन केले संस्थानावर व गुत्ती संस्थानावर नजर ठेवून जात येत होते. नंतर चुलते-पणजे यशवंतराव मृत्यु पावले, आणि चुलत-आजे व्यंकटराव या प्रांती आले असता कर्नाटक प्रांती टिपूचा दंगा होऊन गुत्ती संस्थान टिपूने हस्तगत करून घेतले, आणि तेथील पुरुषास अटकाव केला. ते पुरुष मुरारराव हिंदुराव चुलत आजे शिवराव १ आणि पणजे मालोजीराव याचेही कुटुंब तिकडे होते. त्याचे पुत्र यशवंतराव हे आमचे सख्ये आजे, दुसरे खंडेराव हे आमचे चुलत आजे. हेही टिपूच्या हस्तगत होऊन पाडावात सापडले. टिपूने दुसरीकडे जाण्यास अटकाव करून चार खासे टिपूच्या स्वाधीन झाले. त्यांतून आपले शूर-त्वाने चुलत आजे याचे पुत्र शिदोजीराव आमचे चुलत चुलते हे टिपूने हस्तगत न होता या प्रांती येऊन सदर व्यंकटराव दोनी संस्थानावर नजर ठेवून होते यास व पणजे मालोजीराव यास गुत्तीकडील व्यवस्था सारी निवेदन करून टिपूच्या हस्तगत खासे झाल्याचे सांगितले. नंतर विचार पडून सख्ये आजे यश-वंतराव व चुलते आजे खंडेराव हे लहान वयाने, याची पहिल्याने श्रीमंत पंत-प्रधान याचे कानावर घालून चुलत चुलत आजे व्यंकटराव यानी मोकळीक करून घेऊन या प्रांती श्रीमंताच्या भेटीकरिता घेऊन आले. या दंग्यात मालोजीराव पणजे याचा काळ झाला.

८ सख्ये आजे यशवंतराव व चुलत आजे व्यंकटराव व चुलत चुलते

शिदोजीराव एकूण चार खासे श्रीमंताकडे मुराररराव साहेब व चुलत आजे शिवराव याचे मोकळीकीविशी वगैरे बंदोबस्ताकरिता येऊन मोकळिकी विचार चालविले असता टिपूचे बंदोबस्ताबद्दल परशरामपंत भाऊ पटवर्धन याची रवानगी कर्नाटक प्रांती फौजेसुद्धा होण्याचें मसलत होऊन पटवर्धन कर्नाटकच्या मोहिमेस निघाले. त्या वेळेस श्रीमंतानी आमचे सदरहू खाशेस समजूत करून भाऊबरोबर याची रवानगी करून दिली. त्याप्रमाणे भाऊबरोबर कर्नाटकप्रांती जाऊन मुरारराव व चुलत चुलत आजे शिवराव याची मोकळीक करून घेऊन गुत्ती संस्थानाविशी खटपट चालविली असता श्रीमंताचा व टिपूचा तह झाला. मुराररावसाहेब टिपूच्या बंदात वारले. गुत्ती संस्थान तहामध्ये गुंतले. तूर्त सांडूर संस्थान सदर खाशेस देऊन खाशेयाची समजूत करून घेऊन हरिपंत तात्या फडकेबरोबर पुण्यास येऊन श्रीमंत प्रधान यासी भेटून आणखी बेळवती, रोळी, कंकणवाडी वगैरे तालुके देऊन तूर्त समजूत करून जवळ श्रीमंतानी ठेऊन घेतले. इतक्यात चुलत आजे शिवराव आणि शिदोजीराव व चुलत चुलते यासी सोंडूर संस्थानावर पाठवून सख्ये आजे यशवंतराव व चुलत आजे खंडेराव आणि चुलत चुलत आजे व्यंकटराव श्रीमंतासंनिधानी राहिले. नंतर सदर व्यंकटराव यासी देशी रवाना करून तेही सावनूर वगैरे लडाईत खर्च झाले. त्यास दत्तक नाहीं. खर्डेची स्वांरीची मोहीम येऊन श्रीमंत पंतप्रधान सवाई माधवरावसाहेब यानीं फौजबंदी करून निजाममुलुकावर चालले. त्यावेळी माधवरावसाहेब यांची कृपा असून त्या स्वारीत आमचे सरदार खाशेनीं मर्दुमी व पराक्रम दाखविले. तेणेकडून श्रीमंत खुशाल होऊन बक्षिसा वगैरे दिल्या. खरड्याची मोहीम फत्त करून श्रीमंताचे स्वारीसमागमे उभयता आजे यशवंतराव खंडेराव पुण्यांस आले. त्यावेळी श्रीमंताचे मनातून तालुके वगैरे संस्थान देऊन गुत्तीबद्दल समजूत काढावी असे बोलणे लागले. त्यावेळी उभयता आजे याचे म्हणणे गुत्ती संस्थान प्राचीन वडिलार्जित संपादन केलेले, टिपूकडे तहनामेत सरकारने सामील केले ते आमचे आम्हांस मिळाले पाहिजे. त्यावाचून दुसरे घेणार नाहीत. म्हणून निग्रह धरिल्यावरून नाना फडणीस व हरिपंततात्यांनी वगैरे तेच संस्थानाचें देणे होईल म्हणून आश्वासन देऊन जवळ ठेवून घेतले. पुढे काही दिवसानी श्रीमंत सवाई माधवराव साहेब यांचा काल झाला. श्रीमंत बाजीरावसाहेब गादीवर आले. राज्यकारण मोठेच मांडिले. यांत कोणी मागील बाकबगार नाना फडणीस वगैरे कारभारी राहिले

नाहीत. नाना फडणीस यांना बाजीरावसाहेब यांनी कोंडले, माहाडास अटकाव केला. तेथून सख्ये आजे यशवंतराव यांनी खटपट चालवून मुक्त करून आणून शिंदे अलिजाबहादर यांची व नानाची दोस्ती करून राज्यकारभार चालविणे व मनसुबीत सख्ये आजे यशवंतराव असून नाना फडणीस याशी शिंदेची भेट करविली. शिंदे यांनीं बाजीरावसाहेब यांचे सुचनेवरून कैद करून यशवंतरावास अलिजाबहादराजवळ ठेवून घेतले. नंतर श्रीमंत बाजीराव साहेब पंतप्रधान व शिंदे या दोन्हीकडील धोरण राखून असता शिंदे सरकारशी व इंग्रजी सरकारशी बिघाडा येऊन अजंठ्याच्या घाटावर लडाई झाली. त्यावेळेस सख्ये आजे यशवंतराव यानी शिंदे अलिज्याबहादर यासी समजून सांगून दोन्ही सरकारशी सल्ला करावा हे नीट म्हणोन दरम्यान दोन्हीकडील इरादा राखोन इंग्रजसरकारच्या चित्तानुरुप तह करविला. तो तहनामा झाला त्यावेळी आजे यशवंतराव यास बसली साहेबबहादूर इंग्रजसरकारकडील होते. त्यानी सख्ये आजे यशवंतराव यास दरमहा एक हजार रुपये जरनेली पेनशन करून दिली, आणि यशवंतराव हे मसलतबहादर असे समजून इंग्रजबहादरांनी पेशवाईवर राजकारण चालविणे-करिता सख्ये आजे यशवंतराव यास आपलेकडे शिंदेकडून बोलावून घेतले. त्या वैषम्याने बाजीरावसाहेब यांनी पेशजी दिले ते, वेळवती, रोळी, कंकणवाडी वगैरे जप्त केले. त्या दिवसापासून इंग्रजसरकारशी दोस्ती ठेवून सख्ये आजे यशवंतराव यांनी पेशवाई सर होणेविशीच्या चांगल्या मसलती इंग्रजसरकारशी देऊन त्याप्रमाणे सिद्धीस नेल्या व पेशवाई इंग्रज सरकारशी प्राप्त झाली. त्या योग्यतेवर सख्ये आजे यशवंतराव सरकारची खैरखा समजून पंचवीस हजार रुपयेची इनाम गांव पुत्रपौत्रादि वंशपरंपरा दिली. आणि पन्नास हजार रुपयांचा इनाम देणेचा संकेत होता त्यास हे पंचवीस हजार व पेशजी बसलीसाहेबांनी जरनेली पेनशीन दिली ती बारा हजार जमेस धरून एकूण सदतीस हजार रुपये जाले. बाकी तेरा हजार मिळतील म्हणून अश्वासन देऊन ठेवून घेतले, आणि सरकारी कामकाजात आजे यशवंतराव वागत होते. चुलत आजे खंडेराव पेशव्याचे व इंग्रजसरकारचे लढाईत बाजीरावसाहेब यांचे कारकीर्दीत स्वामीकार्यावर खच झाले. सख्ये आजे यशवंतराव यानी पेशवाईत व शिंदे अलिजाबहादर व इंग्रज-सरकार यांचे कामात अदमासे चाळीस वर्षे कामकाज करून सन १८२१ इसवी शके १७४३ चैत्र शुद्ध १५ पोर्णिमा रोजीं पुणे मुक्कामी मृत्यु पावले, व चुलत

आजे खंडेराव यासी शिवराव व भुजंगराव ऐसे दोन पुत्र. हे आमचे चुलत चुलते. सख्ये आजे यशवंतराव यास आमचे तीर्थरुप मालोजीराव व नरसिंगराव हे आमचे सख्ये चुलते असे दोन पुत्र.

९ चुलत आजेचे पुत्र शिवराव व भुजंगराव वर आठ कलमात सांगितलेले हे आमचे चुलत चुलते. यांजपैकी शिवराव यास सोंडूर संस्थानाकडील शिदोजीराव चुलत चुलते याचा काळ होतांच सख्ये आजेनी पाठविला होता. ते त्या संस्थानाच्या गादीवर असून तीस वर्षे कारभार करून सन १२४९ फसली वैशाख शुद्ध १ प्रतिपदा शनिवार रोजी मृत्यु पावले. त्याचे बंधू भुजंगराव हेही आमचे चुलत चुलते त्याचे संन्निध होते. ते शिवराव यांचे पूर्वीच सन १२४१ फसली माघ वद्य त्रितिया शनिवार रोजी सोंडुरास मृत्यु पावले. शिवराव यास पुत्रसंतान नाही. भुजंगराव यास एक पुत्र—व्यंकटराव. ते आमचे चुलत चुलत बंधु.

१० व्यंकटराव चुलत चुलत बंधू हे सदर शिवराव चुलत चुलते कैलासवास जाल्यावर सोंडूर संस्थानाचे गादीवर असून हल्ली तेथील काम चालवीत आहेत.

११ सख्ये आजे यशवंतराव याचे पुत्र आमचे तीर्थरुप मालोजीराव व चुलते नरसिंगराव वर आठ कलमात सांगितले ते वर्णन.

तीर्थरुप मालोजीराव यांनी पहिले पांचवे कलमांतील अवल करवीर व सातारा महाराजाकडील राहिले. संपादन मौजे दत्तवाडी इनामगाव आणि आठवे कलमात सांगितलेली जरनेली पेनशीन बारा हजार व पंचवीस हजार रुपयांची इनामेंची वहिवाट करून तीर्थरुप वारल्यावर तेवीस वर्षे अजमासे कारभार करून शके १७६५ सन १२५४ फसली फाल्गुन शुद्ध पंचमी रोजी कैलासवासी झाले. हे पुरुष लौकिकवान या प्रांती गौरनरसाहेब सरदार लोकांच्या भेटीवरती याजकडूनही सल्ला घेऊन, त्याचे मरातबाप्रमाणे सरदार लोकांच्या मुलाकती घेणेचा इंग्रज सरकारांनी पाठ ठेविला होता. त्यास पुत्र आम्ही वडील नारायणराव व आमचे सख्ये बंधु यशवंतराव, व सापत्न बंधू खंडेराव असे त्रिवर्ग.

चुलते नरसिंगराव आठ कलमात सांगितले. त्यास आमचे तीर्थरुपांनी इंग्रजाकडील संपादन केले इनामपैकी तीन गावे दिले. उपभोग करुन होते. ते तारीख ४ सप्टेंबर सन १८३७ इसवी रोजी जेजोरीस श्री देवास गेले वेळी पुणें मुक्कामी मृत्यु पावले. त्यास पुत्र व्यंकटराव हे आमचे चुलत बंधू.

१२ चुलत बंधू व्यंकटराव यास बडोदेकर गायकवाड सेना खासकेल समशेरबहादूर यांनी आपली कन्या देऊन लग्न फार समारंभाने करून पन्नास हजार रुपयांचा स्वास्था देऊन आपले सन्निध ठेवून घेतले. ते हल्ली बडोदे मुक्कामी मानपानाने आहेत.

१३ आम्ही नारायणराव दहावे कलमात सांगितल्याप्रमाणे त्रिवर्ग बंधू हे करवीरकर महाराजांचे व सातारे महाराजांचे उत्कर्षावेळेस मिळालेले पांच कलमात लिहिल्याप्रमाणे राहिला इनामगांव मौजे दत्तवाड येथे राहून इंग्रजसरकारांनी इनाम दिले ते उपभोग करून सख्ये बंधू व सापत्न बंधू लहान हे सन्निध ठेवून घेऊन इंग्रजबहादर सरदार लोकांची मर्जीनुरुप दोस्ती ठेवून आहोत.

येणेप्रमाणे इतिहासातील अभिप्राय पाचवे कलमात सांगितला. मूळ पुरुषानी करवीर व सातारे महाराजाकडून पातशाहाचे हुकूमावरून अमिरुल उमराव ही किताब मिळविली आहे. त्याचप्रमाणे श्रीमंत पंतप्रधान यानी थोरवी देऊन आमचे पुरुषांची बढती करून सरकार कामकाजात घेऊन लौकिक वाढविला. त्यांनी कर्नाटक प्रांती केलेल्या सुकीर्ती अद्यापि महशूर आहेत. तसेच आठ कलमात सांगितले ते आमचे सख्ये आजे महान प्रतापी, त्यांचा लौकिक हिंदुस्थान व दखन भरून सर्वत्रास प्रसिद्ध आहे, आणि पुणें मुक्कामी करनेल कुल्ड्स साहेब यांनी पेशवाई सर झाले वेळी होते, आणि अलफिस्टन साहेब होते त्यास सर्व आमची पदवीची पक्की वाकबगारी झाली असून त्या वाकबगारीवर अलीकडील सरदार गौरनेर एजंट आदिकरून आमचे खानदानीची थोरवी जाणून त्याप्रमाणे मेहेरबानी करून दोस्तीची बढती ठेविली आहे. शिवाय आमचे इरादेचे सरकार शिंदे अलिजाबहादर व होळकर, भोसले, गायकवाड, सरलष्कर, निपाणीकर, पटवर्धन, रास्ते आदिकरून या लोकाशी थोरवी व किताब प्रसिद्ध असून वडिलार्जित तसेच लिहिण्याचा पाठ आजपर्यंत चालला आहे.

येणेप्रमाणे घोरपडे अमिरुल उमराव याचे इतिहासाचे वर्णन असे. तारीख २० माहे नवंबर सन १८५१ इसवी छ मोहरम शके १७७३ विरोधीकृतनाम संवत्सरे सन १२६१ फसली कार्तिक वद्य १२ गुरुवार सुरुसन इसन्ने खमसेन मयातैन व अलफ

एजंट दप्तरपैकी रुमाल नंबर २५ यांत घोरपडे यांची वंशावळ असून

त्याखालीं कैफियतीदाखल टिपा आहेत त्यापैकी उतारा :—

१ संभाजी राजे यास दिल्ली पादशाहा रामराजे यास विजापूर पादशाहा यांनी कैद केले, तेव्हा संताजी घोरपडे यानी मुलुखात बंडाई केले, बहिरजी घोरपडे विजापुरात हिकमत करून मालोजी घोरपडे यास रामराजे याचे बिछानेवर निजवून राजे यास घेऊन कर्नाटकात चंदीचंदावरास दाखल झाले. पुढे शाहूराजे यास दिल्ली पादशहानी चौथाई व सरदेशमुखी वतन देऊन पाठविलेवरून स्थळास येऊन पावले. ते खबर ऐकून चंदीहून रामराजे व बहिरजी घोरपडे येऊन पावले व मालोजीही येऊन पावले.

२ उभयता महाराज स्थलास येऊन पावलेवरी बहुत खुषी होऊन महालोजीचे मुलगे संताजी, बहिरजी व मालोजी यांची मेहनत खातीरेत आणून-

संताजी—यास पाच गाव इनाम व करवीर हवेलीचे, सरदेशमुखी वतन व इसाफत गांव व मलप्रभापासून तुंगभद्रेपावेतो मुल्ख देऊन सेनापती किताब दिले. बहिरजी यास पाच गाव इनाम, करवीर हवेलीचे सरदेशमुखी व इसाफत गाव व तुंगभद्रेपासून रामेश्वरपावेतो मुलुख देऊन हिंदुराव ममलकतमदार किताब दिले. मालोजी यास पाच गाव इनाम व अजरे व बेळगावप्रांतचे व सरदेशमुखी व इसाफत गाव देऊन कृष्णापासून मलप्रभापावेतो मुल्ख देऊन अमिरुल उमराव किताब दिले. सदरी तिघास मुल्ख दिले म्हणोन लिहिले आहे, परंतु दाखले पाहता सदरी मुलखाचे चौथाई दिले असतील असे दिसत आहे.

## घोरपडे गजेंद्रगडकर घराण्याची कैफियत

दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती / इ. स. १८३२

यादी घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडकर यांची कैफियत· घोरपडे हे पादशाही पैवस्तीत वजीर मूळ पुरुष मालोजीराव घोरपडे पादशाहाकडे होते. त्याचे पुत्र माहाळोजीराव घोरपडे हेही पादशाहीत वागले. नंतर त्याचे पुत्र बहिरजीराव घोरपडे हिंदुराव ममलकतमदार सेनापती हे श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपती शककर्ते याजकडे बहुत मेहनत करून, गजेंद्रगड व गुत्ती दौलत मिळविली. त्यास वर्षे सुमार २५०. श्रीसुब्रह्मण्य प्रसन्न झाला. त्याचे पुत्र मुरारराव हिंदुराव ममलकतमदार सेनापती हे विजापुरचे फौजेबरोबर लढाई करून उमर २२ वर्षामध्ये लढाईत मेले. याचा वंश नाही. त्याचे धाकटे बंधू शिदोजीराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सेनापती राजऋषी याप्रमाणे किताब मिळविला. त्याचे पुत्र मुरारराव हिंदुराव सेनापती गुत्तीकर· यांचे धाकटे बंधू दौलतराव हिंदुराव यांचे धाकटे बंधू भुजंगराव घोरपडे लढाईत पडले. उमर वर्षे २०. त्यांचा वंश नाही. दौलतराव घोरपडे हिंदुराव यांचे पुत्र थोरले बहिरजीराव, धाकटे पुत्र संभाजीराव. नानासाहेब ज्येष्ठ बहिरजीराव साहेबाचे पुत्र. हल्ली राजश्री भुजंगराव आप्पासाहेब घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडात आहेत.

मूळ पुरुष मालोजीराव व माहाळोजीराव हे दोघे पादशाहीसेवेत या वेळेस दौलत बहुतच होती· त्या काळची कागपत्रे हरयेक गर्दीत तसनस झाली. दाखला राहिला नाही. बहिरजीराव हे मूळ पुरुषाचे नातू. यांनी छत्रपती सरकारात सेवा करून, गजेंद्रगड व गुत्ती वगैरे तालुका चाळीस लक्षांचा अनभवीत आले. त्यास अडीचशे वर्षे झाली. पुढे मुरारराव गुत्तीकडे, यांचे व हैदरचे वैमनस्य पडून तमाम मुराररायाकडील तालुका टिपूने घेतला. याजवर मुराररायाचे बंधु दौलतराव

यांजकडीलही गजेंद्रगडेसुद्धा कितेक तालुका दहा वर्षे टिपूने अंमल केला. तो परतून पेशवे यांचे कुमकेने दौलतरावसाहेब याने घेऊन आपला तालुका आपण अनुभवित होते. त्याचा तपशील वगैरे :—

एकंदर आहवाल असा आहे की, सदरी गजेंद्रगड किल्ल्याखाली सरंजाम बेरीजने लिहिल्याप्रमाणे बहुत वर्षे चालून दरम्यान हरिपंत फडके यांनी आदावतीने नवाब निजाम अल्लीखा बहादूर याचे व टिपूचे व पेशवे पंतप्रधतान या तिघांचे तहाचे संधीत, आमचे खुद्द जातीचाच खर्चापुरता तालुका मामूल जाहागिर समजून, सदरहू जातीपुरते ठेवून, हे ठेवल्याचे मोबदला पेशव्याने नबाबास आणखी सरकारी तालुका वेगळा देऊन आमचा तालुका आम्हाकडे ठेविला. त्यांची बेरीज हल्ली चालती ती आजमासे:— भुजंगराव आप्पासाहेब व भाऊबंद वगैरे मिळून चालत आहे रुपये १३०००. गजेंद्रगडात हल्ली वहिवाट चालतच आहे. आणि मामूल दौलतीचा दाखला तमाम पेशवेकडील नानाफडणीस यांच्या दप्तरास वार आहे. हल्ली गजेंद्रगड तालुकेत धर्मादाय ब्राह्मणास दिल्याची सनद व शेटे महाजन यांस पेठ वसाहत करणेस सनद दौलतराव घोरपडे यांनी दिली ती अजमासे शंभर वर्षाच्या सनदा हजर आहेत. पूर्वील कागदपत्र टिपू याचे गर्दीत तसनस झाली. परंपरा चालत आलेला मजकूर असा आहे : घोरपडे हे पेशवाई सरदार त्या दिवसापासून दौलतराव, पुढे छत्रपती सरकारकडे राज्यकारभार आला, त्याजकडे वागले. नंतर पेशवे हे कृपा करीत होते. त्याजवर कुंपणी सरकार सरफराज होऊन परामृष करीत आहेत. तारीख छ २१ माहे जमादिलावल उर्फ भाद्रपद वद्य ८ मन्मथ संवत्सरे शके १७५१ सन १८३५ इसवी.

( ब )

यादी घोरपडे हिंदुराव गजेंद्रगडकर कैफियत तपशील सुरुसन सलासीन मयातैन व अलफ.

पूर्वी दक्षणचे पादशाहा तीन, निजामशाहा व आदिलशाहा व कुतुबशाहा त्यांमध्ये निजामशाही पादशाही बुडाली. घोरपडे हे वजीर दोन पिढीचे. विजापूर पादशाही आदलशाहाचे कारकीर्दीत पादशाहाची पैवस्ती तीन पिढी. घोरपडे याची पिढी दोन पादशाहींत गुजरल्यानंतर आदिलशाहा पादशाहा धाकटा त्यास लालखान पठाणाने कैद करून त्या मुलाचे नावे आपण मुखत्यार फौजबंद होऊन

मराठे सरदारास बुडवावे हा इरादा केला. त्यावेळी शिवाजीमहाराजाचे बाप, इभ्राम आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दीत महाराजाचे वडील निजामशाहीतून इकडे भागानगरास आले, आणि शिवाजीमहाराज यांनी घोरपडे वजीर यास भागानगरचे मुक्कामी कुतुबशाहा पादशाहाचे हुजूर येणे म्हणून हुजूरचा कौलफरमाना पाठविला, आणि लिहिले की, तक्त व छत्र विजापुरचा कोट पठाणानी कबज केला, पादशाईस पठाण जाला ही गोष्ट बरी नव्हे. कुली दक्षिणी यांची घरे बुडवील सबब कुतुबशाहाचे हुजूर तुम्ही आले असता तुम्हास दौलत मिळेल. पठाणास सामील न होता इकडे येणे असे. मालोजी घोरपडे मुधोळकर हल्ली होते याचे आजे मालोजी व आमचे मुरारराव साहेबाचे निपणजे बहिरजी घोरपडे गजेंद्रगडकर हे उभयता बंधूवर्ग आणखी एक बंधू दतवाडकर व कापशीकर हे एकंदर गोत्र पुरुष मूळ घराणे एक पातशाहीत दोन पिढ्या या त्रिवर्गाचे आजे वजीरी अनभवीत आले. पुढे कुतुबशाहाचे फर्माने बमोजीब शिवाजीमहाराज यांचे लिहिल्याअन्वये लालखान पठाणाची संगत सोडून सदरहु मालोजी घोरपडे त्रिवर्गबंधूसुद्धा कूच करून भागानगरचे मुक्कामी जाऊन, राजे याचे विद्यमाने कुतुबशाहा पादशाहाचे भेटी घेऊन, पादशाहास व राजेस विजापुराकडे मजल दरमजल येऊन पठाणाचे पारिपत्य केले. हिंदु पदवी जुमामर्दीने घोरपडे वजीर त्रिवर्गानी राखली सबब मालोजी घोरपडे यास राजे हा किताब व बहिरजी घोरपडे यास हिंदुराव म्हणोन किताब, दतवाडकर यास अमिरुल उमराव म्हणून मरातब, कुतुबशाही पादशाहा सरकारातून तिनी किताब घोरपडे यास मिळाले. त्याकाळी दवलतही पादशाहाचे वेळी बहुत चालत आली. पुढे पादशाहाचे व महाराजाचे कारणपरत्वे वैर पडून विजापुरात महाराजास पादशाहाने कैद केले.

करवीरप्रांत पनाळगड वगैरे राजधानी किल्ले पादशाहाकडून ठाणी वसत चालली ! त्यासमयी घोरपडे दोघेचौघे बंधू एकदिल होऊन जातीचा अभिमान धरून, फौज जमावानिशी हरएक प्रांतात फिरत होते. तेथून संताजी घोरपडे दोघेतिघे बंधूनिशी दरकूच फौजबंद आणि तोफेचे कूच व्हावयाजोगी फौज बहुत होती. ते थोरले संताजी कापशीकर विजापूरनजीक येऊन दाखल झाले. दोघे बंधूवर्ग घोरपडे बायकांचे सोंग घेऊन पाण्याच्या घागरी डोक्यावर घेऊन कैदखान्यात बायकांचे मिषें जाऊन राजे पलंगावर निजले होते. तेथून बायकांचे सोंग राजास घालून एक घोरपडे, राजाचे पलंगावर राजेच निजले असे बहाणा

करून गुप्त निजले. एकजण घोरपडे स्त्रियाचे वेषाने राजेसुद्धा कैदखानेतून संताजी घोरपडे याचे फौजेत राजेस घेऊन दाखल जाहले. पलंगावर निजले घोरपडे त्यांनी बेआराम तबेत म्हणून अंगावरील पांघुरणाची मुसकट न काढिता जेवायास उठेनात. राजे भोजनास न आले म्हणून वरदी हुजूर पोहचली, नंतर चौकशी झाली. मुसकट पाहताच शत्रु गेला असे समजून यास मारुन तरी उप-योग नाही म्हणून पोशाख देऊन सोडून दिले. नंतर एकंदर घोरपडे दरकूच करून करवीरप्रांती येऊन राजधानी हस्तगत करून करवीरकर संभाजीराजे छत्रपती यास तख्तावर अभिषेक करून तमाम ठाणी घेतली. तेव्हा हिंदु पदवी राखली, सबब संताजी घोरपडे हे वडील घराणे यास सेनापती पदवी देऊन छत्रपतीने वस्त्रे दिली.

उपरांतिक श्रीमहालक्ष्मीची मूर्ति यवनाचे योगे बहुत काल गुप्त होती. ती थोरले बहिरजीचे पणतू शिदोजी घोरपडे हिंदुराव याचे स्वप्नी येऊन देवळात स्थापना करावी म्हणून आज्ञा झाली. गुप्त स्थळही स्वप्नी सांगितलेले, त्या ठिकाणास जाऊन ती मूर्ति पालखीत दाखल करिताच पालखी भोयास उचलेना. तव घोरपडे हिंदुराव यांनी श्रीमहालक्ष्मी देवीस अर्ज केला की, आमचे स्वप्नात सांगितलेलें खरे असे आहे, तर आम्ही खांदा पालखीस लाविताक्षणी स्वारी उठावी. म्हणून खांदा देताच पालखी उठली. तव देवळात स्थापना होऊन देवीची प्रधानकीची वस्त्रे घोरपडे हिंदुराव यास होऊन पांच गांव व सरदेशमुखी वतन इनाम छत्रपतीने करून दिल्हे, ते हिंदुराव यांनी सरदेशमुखी व सांगवड गांव आपलेकडे ठेवून बाकीचा चार गांव गुमास्ते ब्राह्मण यास इनाम देऊन श्रीची अर्चा चालविली.

पुढे महाराजाचे कृपे पेशवे प्रबल झाले. तेव्हा त्यासही घोरपडे अनसरुन होते. शिदोजीराव याचे पुत्र मुरारराव थोरले, धाकटे दौलतराव गजेंद्रगडकर हे दोघे बंधू, त्यात मुरारराव महापराक्रमी दैवशाली होऊन मोगलाईत चौथाई घेऊन छत्रपतीचे बंधू चंदीचंदावराकडे गेले त्याचे आज्ञेरुप पेशवेचेही दोस्ती राखून गुत्ती वगैरे चाळीस लक्षांची दवलत अनभवीत होते. पादशाही व शिवशाही व पेशवाई वगैरे राजकारणे अनेक तऱ्हेची त्या धांदलीत कितेक दवलती गेल्या आल्या. कागदपत्रे दप्तर तसनस झाले. असो.

दरम्यान टिपूस देखील मुरारराव शत्रू प्रबल होते. उपर हैदरअल्लीखान

हे त्रिचनापल्लीवर दावा पेशजी करीत असतांना इंग्रजबहादूर यांनी आपले कुमकेस मुराररावसाहेब यांस त्रिचनापल्ली मुक्कामी काही दिवस घेऊन गेले होते. श्रीमंताचे वकील मुरारराव याजकडे हमेशा रहात होते. तदनंतर थोरले श्रीमंतानी स्वारी कर्नाटकात आली, त्यावेळे सातारे इलाख्यातील दाभाडे सेनापती याची पदवी तगैरी करून कर्नाटकाचे स्वारीत मुरारराव यास सातारे राजधानीतील सेनापती पदवीची वस्त्रें देऊन जहागीर जी बहुत वेलवती, सिधनाथ, रोली, निडगुंद वगैरे देऊन, मुरारराव यांचे बंधू दवलतराव घोरपडे गजेंद्रगडकर याजवरही श्रीमंतांनी बहाल मर्जी करून गजेंद्रगड तालुका तीन लक्षांचा किल्लेखर्चाकडे करून दिले. त्याजवर टिपूचे हैदरअल्लीखान वगैरे लढाई होऊन फितुराने पुढे मुरारराव हैदरचे हस्तगत झाले. तदनंतर गजेंद्रगडही टिपूने घेतला. दौलतरावसाहेब यांनी श्रीमंताची मर्जी रक्षून इकडे कर्नाटकात श्रीमंताचे स्वारीसह हरिपंत फडके वगैरे येताच गजेंद्रगडास मोर्चा देऊन, हर युक्तने श्रीमंताचे आज्ञेप्रमाणे किल्ले गजेंद्रगड दवलतरावसाहेब यांनी घेऊन, अमल सुरु करून तीन लक्षांचा मुलुख किल्लेखर्चाकडे अनभवीत आले. त्याजवर परशुरामपंत भाऊ पटवर्धन यांची फार दोस्ती दवलतराव घोरपडे करीत होते. भाऊचे व हरिपंत फडक्यांचे वैमनस्य, घोरपडे भाऊचे दोस्त, आपले मर्जीने वागत नाहीत, या आकशकोशीने मोगलाई तह करते वेळी किल्ले गजेंद्रगड वगैरे पंचवीस हजाराची जहागीर जातीचे खर्चास ठेवून, पावणेतीन लक्षांचा तालुका मोंगलाईकडे तहाचे संधीत त्यास दिला. त्याजवर अलीकडे इस्तकबिलापासून श्रीमंताचे देणे कैलासवासी थोरले माधवराव याने गलगल, निडगुंदे, इंगल वगैरे गांव पन्नास साठ हजाराचे चाळीस पन्नास वर्षे घोरपडे गजेंद्रगडकर यांजकडे गड किल्ले खेरीजकरून गांव चालत आले. ते हल्ली श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान यांनी जप्त करून जुने सरदार मोडून नवीन केले. टिपूचे लढाईमुळे कागदपत्र गजेंद्रगड वगैरेचे तसनस झाले. राजक्रांत बहुतेक गर्दी हर पैवस्तीत हर सैनाचे होऊन घोरपडेचे वंश व वहिवाट दाखला एवढेच राहिले. बाकीचे कागदपत्रे शत्रूचे प्रबलात गेली. सारांश, घोरपडे हे पादशाहीपासून वजिरी घराणे व सुब्रह्मण्य नागसर्प प्रत्यक्ष मूळ पुरुषापासून प्रसन्नवरदी त्या कृपेने पादशाईचे हुकुमाने पराक्रमशाली होऊन दौलत करीत आले. पादशाही पुण्य सरल्यावर शिवशाही छत्रपती सरकार कृपे त्याचे आज्ञेप्रमाणे बहुत दवलत जाऊन थोडक्या दौलतीत गुजारा करीत आले.

राजधानी पुणें पेशवे राजेचे योग प्रबल जाहले. याचे मर्जीनुरुप मुरारराव व दवलतराव जुरतीने श्रीमंताचे निरोपे कोते दौलत अनभवून चालले. श्रीमंताचे पुण्य सरून कुंपणीसरकार सार्वभौम पृथ्वीपती शककर्ते सरकार इंग्रजबहादूर दयाळू, मामुल सरदारास वाढविणार, दीन दुनयाचे पादशाहा, त्याचे हुकमानुसार मुरारराव व दौलतराव यांचे नातू राजश्री भुजंगराव घोरपडे हिंदुराव हे किल्ले गजेंद्रगड मुक्कामी गरीफदारी दवलतीत श्रमून कर्जाचे पेची येऊन सदरहू तालुकेत भोगवटा करीत आहेत. श्रम परिहार करणार खावंद समर्थ आहा. तारीख छ २४ माहे मोहरम मुकाबल २४ जून सुरुसन फसली १२४२ सन १८३२ इसवी. जेष्ठ वद्य ११ नंदन संवत्सरे शके १७५४.

(१) थोरले माधवराव

## श्री हरीहर पंडित
## यांचे घराण्याची कैफियत

निवडी : ११०३ / ता. १६ मे १८५०

यादी श्री हरीहर पंडित उर्फ ताल्या महाराज यांचे घराण्याची एकंदर माहिती समजणे करिता लिहिली ती सु॥ खमसेन मया तेन व आलफ शके १७७२ साधारणनाम सवंत्सरे

१. मूळ पुरुष आमचे आजे सिधेश्वरबोवा महाराज हे औरंगाबाद प्रांती ....गावी राहून विद्याआंभ्यास आपण करून त्याप्रमाणे लोकाकडूनही करवीत होते व ब्राह्मण आदीकरून सर्व लोकांस अन्नमुदक देत होते. नंतर श्रीक्षेत्र काशीस जाऊन आणखी विद्याआभ्यास करून तीर्थयात्रा करीतकरीत कराड प्रांती श्रीकृष्णातिरी क्षेत्र नरसिंहपुर येथे येऊन तपश्चर्या बहुत केली. जे बोलावे ते व्हावे, असाध्य रोगी दर्शनास आले त्याचे रोग व संमंधादीक उपद्रव वगैरे कोणतीही संकटे आशिरवादे करून परिहार झाली.

असे बहुत प्रकारे चमत्कार सिधी होत होत्या. साक्षात ईश्वरी स्वरूप, मोठे अवलिया ब्रह्मरूप होते. हा लौकीक तमाम मुलकात प्रसिद्ध झाला. हे ऐकून श्रीमन्महाराज छत्रपती व पेशवेपर्यंत व प्रतिनिधी व शिंदे वगैरे लोक थोर थोर दर्शनास येऊन आज्ञेने वागून सत्कार करू लागले व श्रीमन्महाराज शिवाजी महाराज छत्रपती यानी क्षेत्र करवीरास श्री देवीचे दर्शनास यावे म्हणून विनंती करून मोठ्या समारंभाने क्षेत्रास आणोन आपल्या वाड्यात ठेवून घेतले आणि बहुत प्रकारे सेवा करून अनुग्रह घेतला. पुढे इनामगावे व जमीनी व हक्क व वतने व घर जागा वगैरे इनाम धर्मादाय करून दिले. नंतर छत्रपती महाराज यांचे दौलतीस सिलसिले लागून मोठी संकटे पडली. तेव्हा श्री बोवा महाराज याजपासी येऊन विनंती केली. त्याजवरून संकटे निवारण होतील अशी आज्ञा

केल्यावरून संकटे निवारण झाली. पुढे तमाम मुलुखात इंग्रजी राज्य होणार आहे तुम्ही यासी स्नेह करावा, म्हणजे तुमचे चांगले होईल, असे पंचवीस तीस वर्षे आज्ञा झाली होती. त्याजवरून छत्रपती यांनी आज्ञेप्रमाणे स्नेह करितो, अशी विनंती केली. पुढे छत्रपती यानी पुत्र संतती व्हावी म्हणून विनंती केली. त्याज वरून दोन पुत्र होतील म्हणोन सांगितले, त्याप्रमाणे दोन पुत्र झाले. त्या वेळेस शिवाजी महाराज यासी मोठा आनंद होवून आमचे आजे श्री सिधयेश्वर बोवा महाराज हे गुरूस्थान जाणोन त्यांची मोटी सत्कारपूर्वक पूजा करून चौघडा व मोरचले व आणखी इनाम गावे व जमीनी इनाम धर्मादाय करून दिल्हे. आणि नित्य प्रात काळी दर्शनास येवून नंतर भोजन करीत होते व बहुत सेवा करून आज्ञेत वागत होते.

पुढे आमचे आजे श्रीसिधेश्वरबोवा महाराज यांनी शके १७२३ साली वती नाम संवत्सरे वैशाख वा॥ ६ सोमवारी परधामवास करून समाधीस्त झाले. त्यांची समाधी क्षेत्र करवीर पंचगंगा तीरी बांधून पादुका स्थापन करून त्यांची पुजा अर्च्या व नैवेद्य, नंदादीप व सालाबाद रथोत्साह व छबिनाची पालखी वगैरे मोठा समारंभ छत्रपती महाराज आपण खुद्द येऊन करीत होते हल्लीही त्याप्रमाणे चालले आहे. त्यासी पुत्र त्रिवर्ग बंधु आमचे तीर्थरूप श्री............ पंडित उर्फ भाऊमहाराज व आमचे चुलते श्री रामचंद्र पंडित उर्फ बाबामहाराज व श्री नारायण पंडित उर्फ नाना महाराज असे त्रिवर्ग मोठे विद्वान लौकिकवान होते.

पुढे शिवाजी महाराज यानी आपले पुत्र आबासाहेब महाराज छत्रपती यासी आमचे चुलते श्री बाबा महाराज याजकडून अनुग्रह देविला. त्यावेळेस ईनाम गावे दिल्ही आणि नित्य त्यांचे व आमचे तीर्थरूप यांचे दर्शनास पेशजी प्रमाणे आबासाहेब महाराज छत्रपती व बावासाहेब महाराज छत्रपती असे उभयताही येत होते. पुढे निपाणीकर यांनी महाराजांचे मुलुखात सिलसिला लावून दौलत बहुत खराब जाहली तेव्हा आमचे आजे श्री बोवामहाज यांनी शिवाजी महाराज यासी ‘ इंग्रजी सरकारचा स्नेह करावा म्हणजे बंदोबस्त होईल ’ म्हणून आज्ञा केली होती. ते छत्रपती यानी मनात धरून आमचे तीर्थरूप श्री-भाऊ महाराज याजकडे येवून मजकूर सांगून विनंती केली की, मीच साहेबा-कडे जावे, परंतू आमचा वृद्धापकाळ, प्रकृतीही नीट नाही आणि सर्व भरंवसा आपल्यावर आहे. दौलतीचे संरक्षण झाले पाहिजे. याजकरिता माझे ठिकाणी

आपण साहेबाकडे जाऊन दौलतीचा बंदोबस्त करावा. असे बोलून मालवण किल्ला इंग्रजी सरकारात दिल्हा, नंतर मेहेरबान एलफिंस्तन साहेब बहादुर यासी थैली " माझे ठिकाणी श्री भाऊसाहेब महाराज आले आहेत ", अशी दिल्ही. ते समई महाराज छत्रपती यासी संकट जाणोन आमचे तीर्थरूप साहेबाकडे गेले. साहेबानी सर्वांपेक्षा मानमरातब चांगला राखून बंदोबस्त करून देतो म्हणोन बोलोन ठेवून घेतले व महाराज छत्रपती यांचा व इंग्रजी सरकारचा तहनामा आमचे तीर्थरूप यांचे विद्यमाने झाला.

पुढे साहेबानी पेशवे सरकारात बोलुन निपाणकराचा सिलसिला दूर करून काही मुलुकही वसुल सुद्धा निपाणकर यांजकडून माघारे देविला. पुढे चिकोडी मनोळी तालुके पेशवाई अखेर झाल्यावर आमचे तीर्थरूप यांचे विद्यमाने महाराज छत्रपती यासी दिल्हे ते वेळेस आम्हांस इंग्रजी सरकारातून ईनाम गावे करून दिल्ही. आबासाहेब महाराज छत्रपती यानीही आणखी ईनाम गावे व जमीनी व वतने व हक्क व घर जागा व वाडे वगैरे ईनाम करून दिल्हे. त्यांच्या सनदापत्रे पुत्र-पौत्रादी वंशपरंपरेने ईनाम धर्मादाय चालले म्हणोन करून दिले आहेत व आमचा मानमरातब आम्ही अगर आमचे घराण्यातील खासी मंडळी कोणी करवीरी गेली असता महाराज छत्रपती समारंभाने सामोरे येवून ठिकाणास पोचऊन जात असतात व आमचा मरातब सर्व प्रकारे वडिलाप्रमाणे करितात व पत्रेही वडिलाप्रमाणेच लिहितात व आमचे ईनाम गावचे हरएक खटले इनसाफ आमचा आम्ही पाहतो व हल्लीही पाहात आहो व आम्हांस स्वास्थ महाराज सरकारातून व कंपनी सरकारातून आहे. त्याशिवाय पंतप्रतिनिधी व पंत अमात्य व सेनापती यानी ईनाम गावे व जमिनी व हक्क वगैरे ईनाम करून देवून सनदा करून दिल्या. त्यास छत्रपती महाराज यानीही दुमाल राजपत्रे करून दिली आहेत. व देशमुख व देसाई व देशपांडे वगैरे वतनदार यानीही ईनाम जमीनी व हक्क व घर जागा वगैरे ईनाम करून दिल्हे आहे व कराड प्रांती क्षेत्र नरसिंहपूर येथे शेवेकरी याणी वाडा बांधून देवून गावगन्ना ईनाम जमीनी मळे वगैरे करून दिले. श्री कृष्णेस घाट बांधून दिला व वाड्यात श्रीच्या पादुका आहेत तेथेही पूजाअर्चा नैवेद्य नंदादीप वगैरे हल्ली चालले आहे. याप्रमाणे आम्हांस ईनाम गावे जमीनी व हक्क वगैरे ईनाम धर्मादाय पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने स्वास्थ चालत आहे. त्याचा अनुभव आम्ही करीत आहो. त्याची यादी तारीखवार सनदा

पत्रे पेशजी धारवाड मुक्कामी सर कलेक्टर पोलीटिकल एजंट बेबरसाहेब बहादुर यांनी मेहरबान गव्हरनर ईलफिंस्टन साहेब बहादुर यांचे हुकमावरून पाहून सनदावर सही करून, सनदा बरहुकूम करून आपले सही सुद्रा थैली बरोबर इकडे पाठविली व त्याप्रमाणे रजिस्तर यादीचा दाखला कंपनी सरकारात मुंबईत व बेळगावात ठेवून छत्रपती महाराज सरकारातही दिला आहे. यादीबरहुकूम इंग्रजी सरकारची बहादारी पुस्तदरपुस्त ईनाम धर्मदाय चालवावे असे श्रीमन्महाराज बावासाहेब महाराज छत्रपती व कंपनी सरकारचा तहनामा अलीकडे झाला त्यात आहे व सरकारातून इकडील नावे अव्वल दरजात दाखल आहे.

मेहेरबान एलिफस्तन साहेब बहादर गव्हरनर यांनी आमचे तीर्थरूप यासी पुण्यास आगत्याने बोलावुन नेऊन घेतले आणि तेथे बंगल्याचा बाग वगैरे बक्षीस ईनाम धर्मादाय करून देऊन सनदा करून दिल्या आहेत व मानमरातब सालाबाद अखेरची रोजी पोषाख शालजोडी वगैरे साडेतीन सणगे देऊन हरएक प्रकारे चांगला राखीत होते. त्याप्रमाणे आजतागायत हल्ली सरकारातून चालले आहे. याप्रमाणे आमचे आजे श्री सिद्धेश्वर बावामहाराज याजपासून बडती व लौकिक महशूर होऊन आजतागायत सरकारातून मानमरातब व मुखत्यारी वगैरे सर्व यथास्थीत चालले आहे. पुढेही वंशपरंपरेने चालवणे सरकारकडे आहे. मिती वैशाख शु।। ५ रोज गुरुवार मोर्तब खुद

सही मोडी

श्री तात्या महाराज

## करवीर सरदारांचे किताब

पत्रक—किताब दिले लोकांबद्दल बुकातील उतारा

मुख्य कारभारी दप्तर : फेरीस्त नंबर १४

किताबवाल्याचे नांव, हुद्दा मिळण्याचे कारण व जो किताब मिळाला असेल तो आणि त्याची सत्ता कोणत्या प्रकारची व हक्क कसा व त्याचे स्वास्थ किती व कोणत्या प्रकारचे, तो येकादे सरकारचे किंवा राज्याचे ईलाख्यात आहे किंवा कसें, असल्यास कोणाचे ईलाख्यात वगैरे राहातात त्या सुद्धां—

### १ श्री स्वामी जगद्‌गुरू मठ करवीर

यांचा मठ अनादि सिद्ध असून शिष्य परंपरा स्वामी होत आले. याजकडे महाराज सरकारांतून गांव वगैरे स्वास्थ ईनाम धर्मादाय वगैरे असून हे करवीरास व संकेश्वर तो चिकोडी येथे राहात असोन संचारास देशावरास ही होत आहे. व यांनीं हिंदु लोकांकडून ज्ञातीत गैरवर्तणूक जाहालेस प्रायाश्चित्त वगैरे शास्त्राप्रमाणें देण्याचा अधिकार करावयाचा.

### २ सदाशिवराव राज्यउपाध्ये

उपाध्ये बाबा यांचे निपणजे सदाशिव भट बीन लक्ष्मण भट यासी महाराज सरकारांतून गांव वतने वगैरे स्वास्थ ईनाम धर्मादाय वगैरे पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे चालत असोन यांनीं महाराज सरकारांत उपाध्येपणाचा अधिकार करावा हे राज्य उपाध्ये सबब याजकडे हल्ली स्वास्थ चालत असून याचे राहणेही करवीरी आहे.

३ १ श्री रावजीमहाराज व आबा महाराजे वगैरे

४ २ श्री ताई महाराज

५ ३ श्री तात्या महाराज

कैलासवासी शिवछत्रपती यांनीं श्री सिद्धेश्वरबाबा म्हणजे श्री रावजी महाराज यांचे पणजे याजपासून अनुग्रह घेऊन पुढे स्वास्थ करून दिल्यापैकीं हल्ली इकडे ईनाम धर्मादाय वगैरे पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे चालत असोन रावजी महाराज व ताईमहाराज यांचे राहाणें या ईलाख्यांत असून तात्यामहाराज कुन्नुर तालुके चिकोडी येथे व आबामहाराज वगैरे नरसीपूर ईलाखा सातारा येथे राहात असतात.

## ६ जोशीराव

श्री मन्महाराज शंभु छत्रपती यांसी जोशीराव यांचे पूर्वज बाळ जोशी यांनी मुहूर्त सांगितल्याप्रमाणें कार्य जाहालेवरून महाराज सरकारची मर्जी सुप्रसन्न होऊन जोशीराव हा किताब देऊन त्याजकडे ईनाम धर्मादाय वगैरे पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे चालत असोन हल्ली हे करवीरास राहातात.

## ७ कृष्णराव पंडित प्रतिनिधी विशाळगड

श्री मन्महाराज शिवछत्रपती यांही प्रतिनिधी यांचे मूळपुरुष यानीं कामें चांगली केली बाा समशेर बहाद्दर हा किताब दिला त्यावर यानीं परशराम त्रिंबक यानीं आज्ञेप्रमाणें मुल्क काबीज केला सबब प्रतिनिधीपदाचा अधिकार दिला. नंतर समशेर बाहाद्दर हा किताब रहीत होऊन प्रतिनिधी हाच किताब चालला. नंतर ते साताऱ्याकडे गेल्यावर त्याचे पुत्र कृष्णाजी परशराम यांसी प्रतिनिधी-पदाचा अधिकार देऊन किल्ले विशाळगडास पाठविले त्या दिवसापासून त्याचे वंशात पदाधिकार आजपावेतो चालत आहे. पदाधिकाराबद्दल स्वास्थ ईनाम सरंजाम वगैरे त्याजकडे वंशपरंपरा चालत आसोन त्याचे राहाणें या ईलाख्यातच किले विशाळगड अथवा मलकापूर येथे जाऊन येऊन आहेत. यांनीं सरकारचे

राज्यपत्रावर म्हणजे कोणास कांहीं दिले असतां स्वस्ति श्री म्हणोन शिक्केची पत्रें होतात त्याजवर प्रतिनिधीकडील मुतालिक यांजकडून एक शिका प्रतिनिधीचे नांवचा होता व प्रतिनिधी यांनीं युवराजपणाचे काम चालवणें व अष्टप्रधान प्रमाणें जमावानिशी महाराज सरकारांत आज्ञेप्रमाणें कामकाज करावे.

## ८ पंत अमात्य संस्थान बावडा

श्री मन्महाराज छत्रपतीसाहेब शककर्ते यांचे कारकिर्दीत रामचंद्र निलकंठ हे इनामी सेवक जाणोन त्यास अमात्य पदाधिकार दिला. पुढें श्री मन्महाराज राजारामसाहेब छत्रपती यांची स्वारी चंदीस गेल्यावर सर्व राज्याचे बंदोबस्तास फौजा जमा करून राज्य संरक्षण करणेची चांगली तजवीज यांनीं राखली यास्तव त्याजकडे ईनाम सरंजाम चालत असून यानीं सर्व राजधानीतील दौलतीचा कारभार करावा व जमाबंदीचे लिहिणे वगैरे जमाखर्चाचे लिहिणें झाडेनिशी लिहिणें व राज्यपत्रें चार ४ पो नांवचे येक वीन नावचे येक एकूण दोन पत्रें मुजमी कडून म्हणजे अमात्य पंत यांचे मुतालिकाकडून लिहावयाची व वर्तमान भावी देशमुख देशपांडे ही दोन पत्रें चिटणीसाकडून लिहावयाची या शिवाय राज्य-पत्रावर निशाण मुजुमदार यानीं करावे कारणपरत्वें अमात्यानीं फौज घेऊन जाऊन राज्य स्थापन करावे. हे बावडा किल्ला येथें रहातात.

## ९ रामचंद्रराव घोरपडे सेनापती

श्री मन्महाराज राजाराम साहेब छत्रपती यांनीं संताजीराव घोरपडे यासी सेनापतीचा किताब दिला. यानीं फौज घेऊन राज्य कावीज करण्याचे काम येक-निष्ठने केले सबब ईनाम सरंजाम वगैरे चालत असून याचे राहाणें या ईलाख्यात कापशी येथें असून यानीं स्वारीस जाऊन राज्य काबीज करावे व सर्व फौजेचा अधिकार करून अष्ट प्रधानांबरोबर फौज होईल त्याजवर देखरेख ठेवावी.

## १० गणपतराव पंडीत सुमंत

श्री मन्महाराज शककर्ते शिवाजी महाराज याही याचे मूळ पुरुष जना-र्दनपंत हणमंते यांस सुमंतपणाचा अधिकार देऊन ईनाम सरंजाम वगैरे दिले पो

चालत असोन त्याचे काम पर दौलतीत वकील नेहमी ठेवणे व कारणपरत्वें पाठविणें व पर दरबारातील वकील राज्यधानीत नेहमीं राहाणार व कारणपरत्वें येणार याचा मजकूर हुजूर निवेदन करावा व हल्लीं करवीरी राहातात.

## ११ गोपाळाचार्य पंडीतराव

श्री मन्महाराज राजाराम साहेब छत्रपती याही चंदीचे मुक्कामीं श्रीकराचार्य कालेगांवकर हे सरकार कामकाजाचे उपयोगी पडले कारणाने यांस पंडीतराव हा किताब देऊन ईनाम सरंजाम वगैरे दिले पो हल्लीं यांचे वंशात चालत असून यानीं धर्मशास्त्रांतील प्रायश्चितादी व्यवहार सांगावे आणि दानाध्यक्षसंबंधी ब्राह्मणाचा पात्रापात्री विचार सांगावा व प्रायश्चित्तसंबंधीं अन्य स्थळीं पत्रें लिहिणें ती पंडीतराव यानीं लिहावी. हे कांहीं दिवस करवीरी राहातात व कांहीं दिवस साताऱ्याकडे मांगल्य गांवीं असतात.

## १२ जयसिंगराव घाटगे उर्फ हिंदुराव घाटगे सर्ज्याराव वजारतमाब

## १३ रमाबाई साहेब घाटगे, हल्लीं वाळव्यात आहेत

कैलासवासी शाहाजी महाराज म्हणजे शककर्ते श्री मन्महाराज शिवछत्रपती यांचे वडील याजपासी भानजी घाटगे देशमुख कागलकर नोकरीस होते त्यानीं निजामशाहाचे फौजेवर चालून जाऊन दुम्धा ( ? ) सर्ज्याराव रजपूत यासी लढून त्याचा घोडा सर्ज्यासहीत पाडाव करून आणिला. सबब शाहाजी महाराज यांनीं घाटगे यांस सर्ज्याराव किताब दिला. पुढें पुढें कांहीं सरंजाम गांव वतनें वगैरे दिले. त्या अलीकडे श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांचे कारकिर्दीत रामचंद्र परशराम पटवर्धन यांनीं फौजेचा वेढा कोल्हापुरास दिला तेव्हां त्यावेळी जयसिंग सखारामराव घाटगे हे पुणें मुक्कामीं बाजीराव पंडीत प्रधान याजवळ दौलतराव शिंदे आलिजा बाहाद्दर यांजकडून कामांत वागत होते ते समई दौलतराव शिंदे यांस सर्व मजकूर समजून देऊन वेढा उठविला व दौलतराव शिंदे यांचे विद्यमाने पेशवेचा तह करुन आणिला सबब पूर्वी कागल वगैरे गांव वतनें होती व त्याशिवाय आणखी गांवे ३६ सरकारांतून ईनाम सरंजाम वगैरे दिले नंतर निपाणी-

कर यांचा दंगा जाहला त्या साली महाराज सरकारची स्वारी बेडकीहाळ मुक्कामीं होती ते समई लढाईत जयसिंगराव उर्फ हिंदुराव घाटगे सर्ज्याराव यानीं मर्दुमी केली असतां वजारतमाब म्हणोन किताब दिला तो खुद्द यांस असोन वरकडास नाहीं. हल्लीं हिंदुराव दिल्लीस राहातात. यांचे कुटुंब सौभाग्यवती पार्वतीबाईसाहेब चिखली मुक्कामीं या ईलाख्यातच आहेत. महाराज सरकारचा हुकूम होईल त्या काळीं जमावानिशी येऊन आज्ञा आन्वयें कामकाज करावयाचे.

## १४ नारायणराव घाटगे सर्ज्याराव

यांची हकीगत वरती जयसिंगराव याचे नांवास लागलीच असून नारायणराव त्यांचे तीर्थरुप येशवंतराव घाटगे यांस कैलासवासी सिवाजी महाराज यानीं आपली कन्या दिली व हल्लीही नारायणराव साहेब सौभाग्यवती बाळाबाई आक्कासाहेब दिल्या आहेत. आतां सरकारचे जावई असून कागलास राहातात.

## १५ केशवराव नारायणराव घोरपडे ईचलकरंजी

महाराज सरकारचे नोकर पुस्त दर पुस्त कापशीकर घोरपडे सेनापती याजपासी केशवराव नारायण यांचे मूळपुरुष नारो महादेव चाकरीस राहून सेनापतीची येकनिष्ठपणें सेवा केल्यावरून त्यानीही आपले पुत्राप्रमाणें समजून त्यास घोरपडे असा किताब देऊन त्याचे चालवणेबद्दल त्यानीं आपलें सरंजाम पो गांव वगैरे दिले तसेंच सेनापती यानीं श्री मन्महाराज शिवछत्रपती यासी अर्ज करून सनदा करून देऊन सरंजाम देवीला व हिंदुराव घोरपडे गजेंद्रगडकर यानीं सरदेशमुखीचे वतन दिले व श्रीमन्महाराज शंभु छत्रपती यानीं व्यंकटराव नारायण यानीं येकनिष्ठेनें सेवा केली त्या कारणावरून चार ४ गांव देऊन सनद करुन दिली सबब यानीं महाराज सरकार ज्यावेळीं चाकरीस हुकूम करतील त्यावेळेस त्यानीं सरंजामसुद्धां येऊन कामकाज करावे व हे या ईलाख्यातच ईचलकरंजी येथें राहातात.

## १६ लक्ष्मणराव शिंदे सेना खासकील

श्री मन्महाराज शककर्ते शिवछत्रपती यांचे कारकीर्दीत मुरारराव शिंदे याचे पुत्र नरसोजी शिंदे व दुसरे जीवराव व तिसरे सुलतानराव हे नोकरीस असोन

लढाईचे कामांत बहुत उपयोगी पडले जाणोन त्यांस ईनाम सरंजाम तोरगल वगैरे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें वगैरे दिले.

## १७ रताजीराव चव्हाण हिंमतबहाद्दर

शककर्ते श्री मन्महाराज शिवछत्रपती याजपासी राणुजीराव चव्हाण यांनीं सेवा येकनिष्ठेनें केली नंतर त्याचे चिरंजीव विठोजीराव नोकरीवर होते त्यांनीं युद्धप्रसंगाचे कामकाज चांगले केले त्यांस श्रीमन्महाराज राजाराम साहेब छत्रपती यांचे कारकीर्दीत हिंमत बहाद्दरीचा किताब दिला. त्यानंतर श्री मन्महाराज शंभु छत्रपती यांचे कारकीर्दीत विठोजीराव यांचे पुत्र उदाजीराव चव्हाण हिंमत बहाद्दर यांनीं कामकाज केले म्हणोन सरंजाम दिला व पुढें मिळत गेला. मिळोन ईनाम व सरंजाम वगैरे पुत्र प्रीतीराव चव्हाण यासी वरले दोन्ही किताब चालत असून श्री मन्महाराज शिवछत्रपती यानी उमदेतुल उमराव हा किताब दिला. अलीकडे श्री मन्महाराज बावासाहेब महाराज छत्रपती यांचे कारकीर्दीत प्रीतीराण चव्हाण यांचे नातु रताजीराव चव्हाण यास हिंमद बहाद्दरीचा किताब दिला. तसा रताजी-राव यांचे बंधू जोत्याजीराव यास ममलकतमदार व तिसरे जीवनराव यास उमदेतुल उमराव असे ते आपसात लिहितात परंतु त्याजकडून सरकारात नजर वगैरे घेऊन किताब दिलेबद्दल वगैरेची आज्ञापत्रे त्यास मिळाली नाहीत.

## १८ हणमंतराव निंबाळकर बहाद्दुर सरलष्कर

हणमंतराव निंबाळकर यांस बाळाबाई आक्कासाहेब यांनीं दत्तक घेतले असून पुढें श्री मन्महाराज बावासाहेब छत्रपती याही सरलष्करीचा किताब देऊन सरंजाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने वगैरे दिला याचे कारण पूर्वी यांचे पूर्वज सुल-तानराव निंबाळकर यांसी श्री मन्महाराज शंभु छत्रपती याही सरलष्करीचा किताब दिला होता तो दाखला पाहून हल्लीं देण्यात आला असून सरलष्करीचे यानीं सर्व फौजेचे काम पहाणेचे व हल्लीं करवीरी राहात असून लाल डगल्याचे रिसाल्याचे कामाबद्दल दरमहा १५० रुपये प्रमाणें पावत आहेत.

## १९ दौलतराव घोरपडे हिंदुराव

श्रीमन्महाराज राजारामसाहेब छत्रपती याही दौलतराव यांचे पूर्वज बहीरजीराव घोरपडे यासी हिंदुराव हा किताब देऊन यानीं लढाईत मर्दुमी केली या कारणानें पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरेचा त्याजकडे ईनाम सरंजाम वगैरे करून दिला त्यापो। ईकडे गांव व वतनें वगैरे चालत असून हे हल्लीं गजेंद्रगडास राहातात यानीं सरकार हुकूम करतील त्यावेळेस सरंजामसुद्धां हुजूर हजर होऊन आज्ञा होईल त्याप्रमाणें काम करावयाचे.

## २० नारायणराव व्यंकटराव घोरपडे अमीरुल उमराव

श्रीमन्महाराज राजाराम साहेब छत्रपती याही नारायणराव यांचे पूर्वज घोरपडे यासी आमीरुल उमराव हा किताब त्यांनीं लढाईत मर्दुमी केल्यामुळे देऊन सरंजाम गांव वगैरे पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे दिला त्यापैकीं ईकडे हल्लीं स्वास्थ चालत असून याचे राहाणे या ईलाख्यात दत्तवाड येथें आहे. यानीं सरकारी हुकूम होईल तेव्हां सरंजामसुद्धां नोकरीस हुजूर हजर राहून हुकूम होईल त्याअन्वयें कामकाज करावयाचे.

## २१ खंडेराव निंबाळकर धारराव

श्रीमन्महाराज शंभु छत्रपती यांचे कारकीर्दीत निंबाळकर यांचे पूर्वजांनी सेवा इमानाने केली सबब धारराव हा किताब दिला व वतन वगैरे दिले पुढें खंडेराव याचे तीर्थरुपास येक गांव मिळाला. तो व अलीकडे कैलासवासी बावासाहेब महाराज यांनीं दोन गाव व जमीन देऊन सरंजाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे कराराने दिला तो चालत असून खंडेराव हे हल्लीं करवीरी राहातात. यानीं हजर राहून सरकार आज्ञा होईल तेव्हां हजर होऊन आज्ञेप्रमाणें काम करणेचे.

## २२ दत्ताजीराव गायकवाड विश्वासराव

कैलासवासी श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांचे कारकीर्दींत दत्ताजीराव यांचे आजे गुजाजीराव यानीं सेवा एकनिष्ठेने केली सबब सरखवास हा किताब दिला

व कांहीं सरंजामही दिला व भुदरगड किल्ला पटवर्धन याजकडून घेण्याची मसलत गुजाजीराव यांचे पहिले चिरंजीव हैबतराव यानीं करून किल्ला हस्तगत करून घेतला. या कारणाने गुजाजीराव यास आणखी विश्वासराव हा किताब दिला. पुढें गुजाजीराव मयत जाहाले असतां सरखवास ही किताबत गुजाजीराव यांचे दुसरे चिरंजीव दौलतराव गायकवाड व त्याचे पुत्र हिंदुराव गायकवाड याजकडे चालू होती. हल्लीं ते मयत जाहाले सबब सरंजाम जप्त असून हैबतराव यांस विश्वासराव हा किताब दिला. पुढें ते मयत झाले. पोटी पुत्रसंतान नव्हते सबब दिनकरराव गायकवाड यांचे नातू दत्ताजीराव यास दत्तक देऊन विश्वासराव किताब देऊन त्याजकडे पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे चालले ते स्वास्थही चालू असून हल्लीं ते करवीरी आहेत. हे सरकारचे सरदार यांनीं हुकूम होईल त्याप्रमाणें हजर राहून नोकरी करावयाची तोच किताब याजकडे चालत आहे.

## २३ यशवंतराव माने भीमबहाद्दर

श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांचे कारकीर्दीत हल्लीचे यशवंतराव यांचे पणजे यास नायकीचे वतन सेवेबद्दल कृपाळू होऊन दिले. नंतर त्यांचे चिरंजीव रघुनाथराव माने यांनीं परशराम रामचंद्र पटवर्धन यांचे दंग्यात लढाईत मर्दुमी चांगली केली हे स्वामींनीं पाहून भीमबहाद्दर हा किताब देऊन सरंजाम दिला. नंतर रघुनाथराव याजला सावगांव मुक्कामीं निपाणकराचे लढाईत तोफेचा गोळा लागून मयत झाले. सबब तो किताब त्याचे चिरंजीव सखारामराव यांस देऊन सरंजाम चालविला. नंतर सखारामराव यांस औरस पुत्र नसल्यानें हे यशवंतराव दत्तक जाहाले आहेत. त्याजकडे तो किताब व स्वास्थ चालले आहे व सरंजाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरेचा असून हे करवीरी राहातात. यांनीं सरकार आज्ञेप्रमाणें हजर राहून नोकरी करणेची आहे.

## २४ नीळकंठराव जाधव जप्तन मुलुक

श्रीमन्महाराज शंभु छत्रपती यांचे कारकीर्दीत नीलकंठराव याचे सहावे पुरुष रेखोजी बीन नरसोजीराव जाधव यांनीं सेवा चांगली केल्यामुळें सरंजाम

देणेत आला. नंतर त्यांचे पणतू रायाजीराव जाधव यासी सरनोबतीचा व जप्तन मुलुकीचा किताब यानीं लढाईत वगैरे चाकरी चांगली निष्ठापूर्वक केली सबब कैलासवासी श्रीमन्महाराज शिवछत्रपती यानीं देऊन सरंजामही दिला. त्यानंतर रायाजीराव यांचे दुसरे चिरंजीव आप्पाजीराव यांस कैलासवासी बावासाहेब महाराज यांनीं आणखी सरंजाम दिला मिळोन एकंदर उत्पन्न, पुत्रपौत्रादी वंशपरंपरा वगैरे चालत आहे त्याची बेरीज हल्लीं हिशेबी खर्च पडत आहे ती—

१ खुद्द नीळकंठराव जाधव यांचे नांवाने ५६१२।३९

१ रायाजीराव जाधव म्हणजे नीळकंठराव याचे चुलत २ पुतणे यांचे नांवाने ४२४२।≈३

येणेंप्रमाणें उत्पन्न असून हे उभयतां करवीरीच राहातात. सदरहु किताब-पैकीं रायाजीराव यांचे पुत्र गोपाळराव यांस कैलासवासी श्री मन्महाराज शिवछत्र-पती यांनीं सरनोबत हा किताब दिला तोच किताब गोपाळराव यांचे चिरंजीव सयाजीराव याजकडे कैलासवासी बावासाहेब महाराज यानीं चालविला तो हल्ली सयाजीराव यांचे पुत्र रायाजीराव यांजकडे चालत आहे व जप्तन मुलकीचा किताब रायाजीराव जाधव मयत जाहालेवर त्यांचे दुसरे चिरंजीव आप्पाजीराव याजकडे कैलासवासी बावासाहेब महाराज यांनीं जप्तन मुलुक हा किताब चाल-विला. नंतर आप्पाजीराव वारलेवर तोच किताब नीळकंठराव याजकडे चालत आहे. यांनीं सरकार हुकूम करतील त्याअन्वयें नोकरीस हजर असून कामकाज करावयाचे.

## २५ बहीरवराव रामचंद्र राजाज्ञा

श्री मन्महाराज शिवछत्रपती यांचे कारकीर्दीत रत्नाकर पंडीत यानीं सरकार नोकरी करुन लढाया वगैरेचे प्रसंगीं बहुत उपयोगी पडले. जाणोन त्यास राजाज्ञा हा किताब दिला व यांचे वंशात जमीन वगैरेचे उत्पन्न चालत होते ते कैलासवासी बावासाहेब यांनीं जप्त केलेले हल्लीं त्यांचे निर्वाहास सरकारातून लिहून दिल्याप्रमाणें जमीन चालत आहे. त्याची बेरीज हुजूरचा हुकूम होईल त्याप्रमाणें हुकूम चालवावा. राज्य पत्रावर बार म्हणोन निशाण करणेचे काम.

❧

## शिक्के व मोर्तब

तक्ता-शिक्के व मोर्तबाचे ठसे पाठविल्या प्रकर्णी सु॥ सन तीसा आर्बेन मयातेंन व आलफ सन १२५८ फसली.

मुख्य कारभारी दप्तर । ता. १६ आक्टोबर १८४८.

| नंबर | | ठसे मोर्तब व शिक्याचे कागदा वरील | मेणा वरील | लाखे वरील | येकूण ठसे |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री मन्महाराज छत्रपती सो॥ सरकार करवीर | ५ | ५ | ० | १० |
| २ | श्री स्वामी जगद्गुरु | २ | ० | २ | ४ |
| ३ | श्री रावजी महाराज | २ | २ | ० | ४ |
| ४ | श्री तात्या महाराज | २ | ० | २ | ४ |
| ५ | सदाशिवराव राजोपाध्येबाबा | १ | १ | ० | २ |
| ६ | संस्थान विशाळगड | ३ | ३ | ० | ६ |
| ७ | संस्थान बावडा | ४ | ० | ४ | ८ |
| ८ | सेनापती कापशीकर | २ | २ | ० | ४ |
| ९ | डबीर पंत | १ | १ | ० | २ |
| १० | गोपाळाचार्य पंडीतराव | २ | २ | ० | ४ |
| ११ | सेना खासकील तोरगलकर | २ | २ | ० | ४ |
| १२ | रताजीराव चव्हाण हिंमत बहादर | ४ | ४ | ० | ८ |
| १३ | हणमंतराव निंबाळकर बाहाद्दुर सरलष्कर | २ | २ | ० | ४ |
| १४ | जोत्याजीराव नाईक निंबाळकर वठारकर | २ | २ | ० | ४ |
| १५ | निळकंठराव जाधव जप्तन मुल्क | १ | ० | १ | २ |
| १६ | दत्ताजीराव गायकवाड विश्वासराव | ३ | ३ | ० | ६ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १७ | नारायणराव घोरपडे अमीरुल उमराव | २ | २ | ० | ४ |
| १८ | हिंदुराव गायकवाड सरखवास | १ | १ | ० | २ |
| १९ | रामचंद्रराव पाटणकर | १ | १ | ० | २ |
| २० | नरसिंगराव शिंदे नेसरीकर | १ | १ | ० | २ |
| २१ | खंडेराव निंबाळकर धारराव | ३ | ३ | ० | ६ |
| २२ | नारायणराव भोसले खानवटकर | १ | १ | ० | २ |
| २३ | शहाजी भोसले खानवटकर | १ | १ | ० | २ |
| २४ | रघुनाथ जोशीराव | १ | १ | ० | २ |
| २५ | भवानराव बाजी घाटगे | १ | १ | ० | २ |
| | | ५० | ४१ | ९ | १०० |
| २६ | जीऊबाई ताई महाराज | ० | ० | ० | ० |
| २७ | दौलतराव घोरपडे | ० | ० | ० | ० |
| २८ | रामचंद्रराव पंडीत | ० | ० | ० | ० |
| २९ | माणकोजी भोसले खानवटकर | ० | ० | ० | ० |
| ३० | जिजाजीराव खानवेलकर | ० | ० | ० | ० |
| ३१ | यशवंतराव माने भीमबाहाद्दर | ० | ० | ० | ० |

हा तक्ता अलाहिदा यादी बराबर मेहेरबान पोलिटिकल सुपरिंटेंडेंट साहेब बहादुर यांचे हुजूर रवाना केला आहे

तारीख १६ माहे आक्टोबर सन १८४८ छ १८ जीलकाद १७७०

गोवद अमृत जवाबनीस  दाजी कृष्ण पंडीत मुख्य कारभारी

## करवीर सरदारांचे सरंजाम

लिस्ट–सरंजामी लोकांबद्दल पाठवावे म्हणून मेहेरबान पोलिटिकल एजंट साहेब बहादुर प्रांत कोल्हापूर यांजकडून माजिस्ट्रेट नंबर ३८ सन १८४९ ईसवी पो यादी आल्यावरून सुा खमसेन मयातेन व आलफ सन १२५९ फसली.

इ. स. १८४९

मुख्य कारभारी दप्तर।

| नंबर | इसमाचें नांव | चाकरीचा तपशील खुद्द | स्वार | पायदळ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | पंतप्रतिनिधी | १ | ४९ | १५० | २०० |
| २ | पंत अमात्य | १ | २४ | ७५ | १०० |
| ३ | जयशिंगराव घाटगे सर्ज्यैराव वजारतमाब रमाबाई | १ | ४९ | १२५ | १७५ |
| ४ | केशवराव नारायणराव घोरपडे | १ | २५ | ५० | ७५ |
| ५ | लक्ष्मणराव शिंदे सेना खासकील | १ | २४ | १०० | १२५ |
| ६ | रताजीराव चव्हाण हिंमतबहादर | १ | १० | ० | ११ |
| ७ | हणमंतराव निंबाळकर सरलष्कर बहाद्दूर | १ | १४ | ० | १५ |
| ८ | रामचंद्रराव पाटणकर | १ | ९ | ० | १० |
| ९ | रामचंद्रराव घोरपडे सेनापती | १ | ९ | ३० | ४० |
| १० | दौलतराव घोरपडे हिंदुराव | १ | ४ | ० | ५ |
| ११ | दत्ताजीराव गाईकवाड विश्वासराव | १ | ९ | ० | १० |
| १२ | नारायणराव घाटगे सर्ज्याराव | १ | ४ | ० | ५ |
| १३ | श्रीनिवास नारायण भिर्डीकर | १ | १ | ० | २ |
| १४ | निळकंठराव जाधव जप्तन मुलुक | १ | ० | ० | १ |
| १५ | देसाई भडगांवकर | १ | ० | ० | १ |
| १६ | आमृतराव भोपे कदम | १ | ० | ० | १ |
| १७ | आप्पाजीराव नाईक निंबाळकर वठारकर | १ | ० | ० | १ |
| १८ | माधवराव सावगांवकर | १ | ० | ० | १ |

वैदिक ब्राह्मण मंडळी

दत्तक विधानासंबंधी होमहवन झालेली जागा



श्री आंबाबाई देवघर



● श्रीनिवास पंडीत उर्फ रावजी महाराज ● कृष्णराव राजोपाध्ये ● रामचंद्रराव जोशीराव ● बहिरवराव रामचंद्र राजाज्ञा

मातोश्री ताराबाईसाहेब महाराज यांनी दौलतीस दत्तक घेतलेली जागा



रावबहाद्दुर रावसाहेब माधवराव वासुदेव बर्वे नि ।। कारभारी




दौलतराव इंगळे

विश्वनाथ कृष्ण नि ।। पोलि. एजंट

भिकाजी विठ्ठल हुजरे चिटणीस

- सदाशिवराव दिवाण
- नारायणराव जाधव मंगसोळीकर
- नरसिंगराव मुळीक तीळवणीकर
- धोंडजीराव निंबाळकर वाठारकर
- एकोजीराव पाटणकर
- यशवंतराव भोसले खानवटकर
- आप्पाजीराव जाधव सावगावकर
- बापूजीराव भोसले आदमापूरकर
- रावजीराव सूर्यवंशी
- रहिमानखान तबीब

- नारायणराव जाधव हवलदार
- आप्पाजीराव गायकवाड
- खंडेराव निंबाळकर धारराव
- हिंदुराव घाटगे सर्जेराव
- हिंमतबहादर यांचे चि. राणोजी चव्हाण
- शंकरराव शिंदे हवलदार
- केशवराव गायकवाड
- भवानराव घाटगे
- बळवंतराव रघुनाथ देशपांडे इंगळीकर

- माधवराव पंडीत अमात्य, बावडा
- संताजीराव घोरपडे सेनापती कापशीकर
- गोविंदराव घोरपडे, इचलकरंजीकर
- नारायणराव घोरपडे
- अमीर उल उमराव दत्तवाडकर
- दत्ताजीराव गायकवाड विश्वासराव
- रघुनाथराव माने मीमबहादुर
- सुलतानराव जाधव जसन मुलुख
- रायाजीराव जाधव, सरनौबत
- आनंदराव कदम भोपे

छत्रपती शिवाजी महाराज (चौथे) यांच्या दत्तविधानाच्या वेळी (२३ ऑक्टोबर १८७१) भरलेल्या दरबारात सरदार आणि प्रमुख व्यक्ति यांच्या बसण्याच्या जागा दाखविणारा तक्ता

उजवीकडील पहिल्या रकान्यातील नांवात न्या. मू. माधव गोविंद रानडे यांचा उल्लेख आहे.

- गणपतराव मिरजकर
- रामराव अखबरनविस
- गोपाळराव गोविंद फाटक न्यायाधीश इ. करवीर
- माधवराव गोविंद रानडे एलएल. बी.
- माधवराव कुंटे हेडमास्तर हायस्कूल
- बाळशास्त्री डेप्युटी इन्स्पेक्टर
- पुरुषोत्तमराव सबइंजिनियर
- कृष्णराव इचलकरंजीकर

- रामचंद्रराव पंडीत नंदगावकर
- फौजदार शहर करवीर नारायण लक्ष्मण
- फौजदार पेटा करवीर गोविंद चिमणाजी
- बाबाजी बाजी शहर करवीर
- बापूजी अनंत नाझरे शहर करवीर

- गोविंद बघेराव मुनशी नि।। पो. ए. हपीस प्रांत कर्नाटक
- सदाशिवराव अप्पा ट्रान्सलेटर नि।। पोलि. ए.
- केसो भास्कर कारभारी खा. विशाळगडकर नि।। पोल. प्रतिनिधी
- विठ्ठल रघुनाथ काळे सदर आमीन
- भीमराव दत्तात्रय मुनसफ कोर्ट कडगांव
- भगवंतराव चिटणीस नि. पोल. ए.
- गणेश विठ्ठल मामलेदार पेटा करवीर
- अंताजी बल्लाळ टिकेकर मामलेदार पेटा पन्हाळा
- बाळकृष्ण अनंत मामलेदार पेटा भुदरगड
- पंढरीनाथ विठ्ठल मामलेदार पेटा गडहिंग्लज
- मोरो भास्कर मामलेदार पेटा शिरोळ
- गणेश हरी कीर्तने मामलेदार पेटा आळते
- गणेश विठ्ठल मुनसफ इचलकरंजी कोर्ट
- चिंतो कृष्ण वकील खा. विशाळगड
- केसो निळकंठ गद्रे मॅजिस्ट्रेट वर्ग २
- गोपाळ केशव कारभारी नि।। हिंमतबहादर

## वंशावळी

### घोरपडे अमिर–उल्–उमराव, दत्तवाडकर



## शिंदे सेनाखासखेल, तोरगलकर




* कोल्हापूरचे संभाजी महाराज यांची राणी

## पंत प्रतिनिधी, विशाळगडकर



## पंत अमात्य बावडेकर



( पुढील पानावर चालू )

* गोविंदराव ( १८२६ ते १८३४ )

|

रघुनाथराव ( द. ) ( १८३५ ते १८४५ )

|

रामराव ( द. ) ( १८४७ ते १८४९ )

|

मोरेश्वरराव ( द. ) ( १८५० ते १८६७ )

|

माधवराव उर्फ बाळासाहेब ( द. ) ( १८६८ ते १९२३ )

|

परशुरामराव उर्फ भाऊसाहेब ( १९०७ ते १९४२ )

|

रामचंद्रराव उर्फ भय्यासाहेब ( द. ) विद्यमान

|

माधवराव ( ज. १९६२ )    निळकंठराव ( ज. १९६८ )

## हिंमत बहादर चव्हाण घराणे



## राव विश्वासराव व सरखवास गायकवाड घराणे

संताजी

|

कृष्णाजी

|

म्हाळोजी

|

यशवंतराव

|

संताजी

|

गुजाजीराव सरखवास



## पंत राजाज्ञे, करवीर

( मूळ उपनाम सरवळे वास्तव्य ( मूळगाव ) ऐतवडे ( खुर्द )
क॥ कोडोली, प्र॥ पन्हाळा )



## छत्रपतींचे राजोपाध्ये




( पुढील पानावर चालू )

* मल्हारभट ( छ. शिवाजीबरोबर आग्रा येथे )
|
मुद्गलभट उर्फ गदाधर
| ( शाहूचे पंडितराव )
यांचा पुढील वंश
सातारा येथे चालू आहे.

* श्यामभट ( करवीर शाखा )
|
लक्ष्मणभट
|
सदाशिव भट
|
श्यामभट उर्फ अप्पाजीराव
|
सदाशिव भट
|
नारायणराव उर्फ आप्पासाहेब
|
सदाशिव उर्फ बापूसाहेब
| मृ. १८।३।१८६७
नारायणराव उर्फ आप्पासाहेब
| मृ. २१।७।१९४०

गणपतराव उर्फ अण्णासाहेब
| मृ. ३।९।१९४०
|
श्रीकांत उर्फ दादासाहेब
|
अभिजीत

भवानराव उर्फ
बाबासाहेब
मृ. १६।५।१९४३
|
वंश चालू

श्यामराव उर्फ दादासाहेब
मृ. पौष शु. ५
शा. श. १८३०

## खर्डेकर सरलष्कर

बापूजीराव निंबाळकर
|
हणमंतराव
|
हैबतराव ( सरलष्कर बहादूर )
|
सटवोजीराव
|
सुलतानराव
|
व्यंकटराव
|
हैबतराव
|
सुलतानराव ( सरलष्कर करवीर )
|
हणमंतराव ( मृ. १८५६ )
|
गोपाळराव उर्फ नानासाहेब
|
हणमंतराव उर्फ आप्पासाहेब
|

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सुलतानराव उर्फ रावसाहेब | नानासाहेब उर्फ गोपाळराव | रामचंद्रराव उर्फ आबासाहेब | गणपतराव उर्फ दादासाहेब | पिराजीराव उर्फ बाबासाहेब | भवानराव उर्फ बाळासाहेब |

सुलतानराव उर्फ रावसाहेब
|
आप्पासाहेब उर्फ बाबाराजे
|

| | | |
|---|---|---|
| सुलतानराव उर्फ यशवंतसिंह राजे | राजसिंह राजे | शिवाजी राजे |

सुलतानराव उर्फ यशवंतसिंह राजे
|
शिवराव राजे

## श्रीसिद्धेश्वर बावा गुरु महाराज

श्रीसिद्धेश्वर बावा महाराज

- श्री रामचंद्र पंडित बाबा महाराज
  - श्री कृष्ण पंडीत बापू महाराज
    - श्रीनिवास पंडीत रावजी महाराज
      - श्री रामचंद्र पंडीत बाबा महाराज
        - श्रीरघुपती पंडीत पंडीत महाराज
        - श्री श्रीनिवास पंडीत बाळामहाराज
          - श्री यशवंत पंडित ( दत्तक ) बाबा महाराज विद्यमान
            - श्री कृष्ण पंडीत बापू महाराज
            - श्री रावजी महाराज
            - श्री वासुदेव पंडीत पंडीत महाराज
        - श्री नरहरी पंडीत तात्या महाराज
  - आण्णा महाराज
  - आबा महाराज
- श्री नारायण पंडीत नाना महाराज
- श्री वासुदेव पंडीत भाऊ महाराज

## मीराखान हकीम यांचे घराणे

- महंमद खान
  - मीराखान
  - साधुखान
    - पठाण खान
      - रहिमतखान
        - कबीरखान उर्फ बापूसाहेब
        - भोरेखान बाबासाहेब
          - कबीरखान उर्फ बापूसाहेब ( विद्यमान )
            - मुस्तफाखान
              - युनुसखान
              - मजीदखान
            - रशीदखान
              - वहीदखान
            - फयाजखान
        - हसनखान
        - दादखान
        - साधुखान
      - महमदखान
      - चांदखान
      - इमामखान
      - शमनखान
  - बावाखान

## कागलकर घाटगे ( सर्जेराव ) घराण्याची वंशावळ




* आबाजी
राणोजी ( कागल )
सखोजी ( वंदुरकर )
यशवंतराव
रावजीराव
नारायणराव ( ज्युनिअर शाखा )
दत्ताजीराव उर्फ आबासाहेब
( कागल सिनिअरकडे दत्तक गेले )
दत्ताजीराव उर्फ बाळासाहेब
यशवंतराव आप्पासाहेब
नानासाहेब
( दत्तक ) इंगळी
फत्तेसिंगराव
अजितसिंह
मृगेंद्रसिह
हिंमतसिंह
जितेंद्रसिंह
विक्रमसिंह
प्रविणसिंह
* तुळजोजी
जयसिंगराव
विश्वासराव
( वाळवे )
सखारामदेव उर्फ तुळोजी
कागल ( सिनिअर शाखा )
रघोजी
जयसिंगराव उर्फ हिंदुराव
सखाराम बापू
जयसिंगराव आबासाहेब दत्तक ( ज्युनिअर शाखेकडून )
यशवंतराव बाबासाहेब
( दत्तक कोल्हापूर छ. शाहू महाराज )
पिराजीराव उर्फ बापूसाहेब
जयसिंगराव
हिंदुराव
सत्यजित
सखारामराव
( दत्तक केनवडे )
यशवंतराव
राजेंद्रसिंह
विजयसिंह
जयेंद्रसिंह

## सेनापती घोरपडे कापशीकर



- ७ रामचंद्रराव *
  - ८ संताजी
  - लक्ष्मणराव
    - ९ जयसिंग
      - १० संताजी
        - जयसिंगराव (विद्यामान)
          - राणोजी
          - पिराजी
      - लक्ष्मणराव
      - रामचंद्रराव

## नेसरीकर शिंदे घराणे


मुरारराव
नरसोजी
जीवराव ( मनोळी )
सुभानराव ( तोरगल )
सुलतानराव ( नेसरी )
राणोजी ( लढाईत पडले )
सिधोजी ( लढाईत पडले )
जिवराज
नरसिंगराव
राणोजीराव ( पाटीलकी वतन )
मानसिंगराव
नारायणराव
दुर्गोजीराव ( मुंगळीकर )
गोविंदराव
सुबराव
जिवराव
दाजीराव
सुलतानराव ( सांबरे )
अमृतराव (सरोळी)
नरसिंगराव ( दत्तक )
जिवराव
विठ्ठलराव ( दत्तक ) तळसंदेकडून
* नारायणराव
रावसाहेब
नरसिंगराव
* शंकरराव
( पुढील पनावर चालू )


* शंकरराव
विठ्ठलराव
उदयसिंहराव
शिवाजीराव
दीपक
संजय
संग्राम


* नारायणराव
दाजिराव उर्फ दौलतराव
सुलतानराव उर्फ भय्यासाहेब
विजयसिंह
अजितसिंह
रणजितसिंह
मुरारराव

## जाधव जत्तनमुलुक

- रेखोजी बिन नरसोजी
  - आप्पाजी
    - नरसाजी
    - सुलतानजी
      - रायाजी सरनोबत
        - गोपाळराव (सरनोबत)
        - आप्पाजी (जत्तन मुलुक)
          - नीळकंठराव
            - सुलतानराव
              - आप्पाजीराव (द.)
                - सुलतानराव (द.)
                  - नीळकंठराव
                    - उर्जीतसिंग
                    - हेमंत
                  - आप्पासाहेब
                  - कृष्णराव
                    - प्रताप
        - दौलतराव
    - नरोजी
    - जानराव
  - संताजी
  - सुलतानजी
  - कृष्णाजी
  - नरोजी

## आप्पाजीराव गायकवाड यांचे घराणे

- म्हाळोजीराव
  - बहिर्जीराव
    - भवानराव
      - आप्पाजीराव
        - खंडेराव
          - नानासाहेब
            - जयसिंगराव
              - अमरसिंग
                - शिवराज
              - सुजय
            - धैर्यशीलराव
              - संजय
              - संग्राम
            - उदयसिंग
              - मानसिंग
          - भाऊसाहेब (दत्तक गेले निकम)
            - विजयसिंह
              - उदयसिंग
              - अमरसिंग
          - बाबासाहेब (दत्तक गेले घोटवडेकर यादव)
            - प्रतापसिंग
              - उदयसिंग
            - दिलीपसिंग
              - राजेश
              - महेश
        - विठ्ठलराव
          - आण्णासाहेब
            - विश्वासराव ( इंदोर )
          - रावसाहेब ( दत्तक गेले आंग्रे, बंगलोर )
            - जयसिंगराव
              - अनिल
              - तुषार
            - विजयसिंगराव
              - विवेक
            - सुजयसिंग
              - समीर

# नाम - सूची

( सूचीतील नांवापुढील आंकडे पृष्ठांचे आहेत )

## पाठशुद्धि

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७ | १२ | राज्याधी वृद्धीस | राज्याभिवृद्धीस |
| १७ | १७ | १७७४ | १६७४ |
| १८ | ३ | महाराज किल्लेवर | महाराज पनाळे किल्लेवर |
| १८ | ६ | पुढे मलकापुरास आले तेथून | कोल्हापूरास येऊन |
| १९ | ११ | फौजेच्या मारा होऊन | फौजेचा नाश होऊन |
| २१ | ९ | यमगरणी भवसी | यमगरणी भिवशी |
| २१ | २२ | करुन असेन | करुन असणे |
| २३ | १ | लिंबाजी भांडवल | लिंबाजी भांडवलकर |
| २५ | १९ | रामचंद्र याले-सेनापती | रामचंद्र यास सेनापती |
| २६ | २५ | भाऊबंदास मूळ संस्थानातील | भाऊबंदास संस्थानातील |
| २७ | २ | फेगर | पांगीरे |
| २७ | ११ | लिहून आलेस सबब | लिहून आले सबब |
| २७ | २२ | कापशी संस्थान...... | कापशी संस्थान बुनादी |
| २७ | २७ | तिकडे असून...... | तिकडे असून आज इकडील |
| ३१ | ३ | काटे करवीर | कोट करवीर |
| ३१ | २६ | क्षेत्र वसांबद्दल | क्षेत्रवासाबद्दल |
| ३२ | ९ | वडीलकी संबंध | वडीलकी संबंधे |
| ३२ | १५ | बाईनाबाई | बहिणाबाई |
| ४० | २ | नगदी व्हान करून जिल्हे | नगदी व दान करून दिल्हे |
| ४३ | ७ | मराबता प्रमाणे | मरातबा प्रमाणे |
| ४४ | २२ | वतन वरुण व तर्फचे करून देऊन उमळीस | वतन वरुण तर्फचे करून देऊन ऊमळीसह |
| ४६ | ९ | तेच सालीम हाराज | तेच साली महाराज |
| ४८ | १८ | त्या वेळेस आदम शाल जामेचा रुमाल | त्याच वेळेस आपला शालनामेचा रुमाल |
| ४९ | २० | दसकाकडील | देसकाकडील |
| ५१ | ३ | लस्कर घेऊत जाऊन | लस्कर घेऊन जाऊन |

| | | | |
|---|---|---|---|
| ५१ | २२ | दसकतकुरण | देसकत कुरण |
| ५२ | ७ | साबेब | साहेब |
| ५४ | १२ | सबब मागणेचा नाही. पेक्षा तुम्हाकडे | सबब मागणेचा, नाहीपेक्षा तुम्हाकडे |
| ५८ | ९ | मोकास दावेचा अमल | मोकासबाबेचा अमल |
| ५९ | १५ | हुजूर येऊन घेतले बक्षीस व इनामेचे याज बहुमाने देतो | हुजूर ठेऊन घेतले बक्षीस व इनामे व मान बहुमान देतो |
| ६१ | ३ | विश्वासनिधी म्हणोन घेऊन | विश्वासनिधी म्हणोन ( किताब ) देऊन |
| ६१ | ९ | मशारनिले यांचे स्वामीसेवा करून दाखवून | मशारनिले यांचे ( सह ) स्वामी-सेवा करून दाखवून |
| ६२ | २९ | सरकारची फौजसुद्धा होऊन | सरकारची फौजसुद्धा येऊन |
| ६४ | २ | मनाई वगैरे लोकांनी | मनाई ( १ ) |
| ६४ | १५ | भाऊबंदी खटला आलाने | भाउबंदी खटला आलाजे |
| ६६ | २९ | शवलनाम | शोभननाम |
| ६९ | ७ | तुबंळगड किल्ले | कुबलगड किल्ले |
| ७० | ४ | त्यास पराक्रमाची विच्या | पराक्रमाचा विचार |
| ७१ | ९ | दप्तरात असणेचे असतील | दप्तरात असणेचे ( तेथे ) असतील. |
| ७१ | २५ | सनदापत्रे करून देहता | सनदापत्रे करून देहत ( देत. ) |
| ७२ | २८ | याहीपर कीर्ती असे जाणविले | इहपर कीर्ती असे जाणविले. |
| ७५ | १ | सुमा इहिदे | सुरु इहिदे |
| ७५ | १४ | दर बोली यक पैसा | दरबैली यक पैसा |
| ७५ | १५ | ५७ साली जरूर | ५७ साली नक्त व गल्ला व |
| ७५ | १९ | अजमास १३० | अजमासे वर्ष एकशेतीस |
| ७६ | ६ | पहिले आबाजीराव | पहिले आप्पाजीराव |
| ७६ | ९ | ,, ,, ,, | ,, ,, ,, |
| ७६ | १८ | वापीत केलेवरून | विदीत केलेवरून |
| ८० | १६ | गोपाळराव म्हणजे लिहिले | गोपाळराव म्हणोन लिहिले |
| ८० | १९ | अरब सलासीन | अरबा सलासीन |
| ८२ | २ | सुमा सबा | सुरु सबा |
| ८३ | १४ | रूो | सुमारे |
| ८· | १८ | स्वामी खर्च जाहले | स्वामीकार्यी खर्च जाहले |

| | | | |
|---|---|---|---|
| ८९ | १८ | मोर्तबा | मोर्तब |
| ८९ | २० | शिक्का काटेचा आहे | शिक्का कोरेचा आहे ( कोयरी शिक्का आहे. ) |
| ९० | २ | सुमा सीत | सुरु सीत |
| ९० | ११ | मौजे मोघई | मौजे मोघर्डे |
| ९० | १३ | गह्ला वगैरे | गह्ला नवसरी वगैरे |
| ९१ | १६ | पंडिताची समटकी | पंडिताची समश्या ( समस्या ) |
| ९१ | १७ | फसली समेन | पुरविली म्हणोन |
| ९१ | २२ | महाराज यानी...... | महाराज यानी आनळ |
| ९२ | १ | किले भूमीदान | करवीरी भूमीदान |
| ९२ | १३ | आम्ही पनतु सदरहू उत्पन्नात | आम्ही पनतुचे चिरंजीव सदरहू उत्पन्नाचे |
| ९२ | २० | भाऊपणाचा सहाजण | भाऊपणाचा सहावा |
| ९३ | २२ | गुरूवासरेचे हुकूमापूर्वक | गुरूवासरेचे चतुःसीमापूर्वक |
| ९५ | २ | सुमा सीत | सुरु सीत |
| ९५ | १५ | सडफोलीकर प्रांत | सडोली कर्यात प्रांत |
| ९६ | १ | उचगावकर | उचगाव कर्यात |
| ९७ | १८ | घर जे मिळाले | घर जळाले |
| १०० | १३ | मौजे तोरेवाडी | मौजे तारेवाडी |
| १०० | १४ | वगराती | वगराली |
| १०० | १७ | मौजे कलमेवाडी | मौजे मल्लेवाडी |
| १०१ | ४ | मौजे बिदरवाडी | मौजे बिदरीवाडी |
| १०१ | ५ | येके हट्टी | एमेहटी |
| १०१ | १० | मातोश्री श्री | तो श्री |
| १०४ | २१ | वडील कैलासवासी शिव-छत्रपती | वडील कैलासवासी नारायणराव बिन रघुनाथराव बाजी घाटगे यांसी कैलासवासी शिवछत्रपती |
| १०७ | ६ | डेरी आख ५५० | डैरी ( डायरी ) आख ५५० |
| १०८ | ५ | लौटवाडी | लोटेवाडी |
| ११८ | २ | तो॥ सीतव | तो॥ सातव |
| ११८ | १० | मौजे दोदवडे | मौजे देदवडे |
| १२० | ४ | सखाराम बलाळ रणोलीकर | सखाराम बल्लाळ रेणावीकर |

| | | | |
|---|---|---|---|
| १२९ | १२ | कारवे | केरवले |
| १२९ | ३० | निरवडे | निटवडे |
| १२९ | ३२ | माणगाव | भामट |
| १२९ | ३५ | कुबोला | कुंभोज |
| १३० | ८ | हवेली | कोडोली |
| १३० | ५ | चुथे | चुये |
| १३२ | ८ | वीस यकर जबीन | शिवेच्या वर जमीन |
| १३२ | १० | भिजकूरचे नांवे | मजकूर याचे |
| १३२ | १४ | मानगाव | नागाव |
| १३२ | २० | घर जमीन | घर बांधणेस जमीन |
| १४० | १९ | बेबनाळ | बोमनाळ |
| १४२ | १९ | मौजे करवी | मौजे कडबी |
| १४२ | २० | मौजे यमापूर | मौजे राजापूर |
| १४३ | १९ | सोमेण वासरची | सौम्य वासरची |
| १४३ | २३ | समस | खमस |
| १४७ | १४ | सदरी मापे | दसरी मापे |
| १५२ | २७ | होरवाड | वरवडे |
| १५४ | २० | मोरोदिनकर | मोरो दिनकर पेंढारकर |
| १५९ | १३ | जाहल्यास माफक | जाहल्यास विडे ताकद माफक |
| १६० | ८ | मीकापूर येथे | मलकापूर येथील |
| १६० | १४ | दररोजीना प्रसादिला ताट | दररोजीना प्रसादिक ताट |
| १६१ | १० | पुरातन सांदणे होती | पुरातन साधने होती |
| १६१ | २१ | त्यांजपासी द्यावे | त्यांजपासी घ्यावे |
| १६२ | ४ | आंगजे करून | आंगेज करून |
| १६५ | ५ | साहीब नजर होऊन | साहेबनजर होऊन |
| १६२ | १७ | राज्ये बे राज्ये | राजीबिराजी |
| १६२ | २३ | जग प्रत होऊन | जय प्राप्त होऊन |
| १६३ | २७ | बहुत कार्य सांगावे | बहुत काय सांगावे |
| १६५ | १० | तेथे | तेथे भुजबळाने |
| १६५ | १८ | ठाणाही कागदपत्रे | ठाणाची कागदपत्रे |
| १६५ | २१ | बताऊनही | बचाऊनही |
| १६९ | ४ | पत्र येऊन | पत्र घेऊन |
| १७२ | १३ | मानगुड | मौजे गुडे |

| | | | |
|---|---|---|---|
| १७३ | १५ | ठाणे माहेकत | ठाणे माहालात |
| १७७ | १० | त्रिंघक | त्रिंबक |
| १७७ | १८ | भेंडवाड | भेंडवडे |
| १७८ | ९ | किला जमीन | किता जमीन |
| १८० | १९ | बहीरजी रंगणेकर | बहीरजी रांगणेवर |
| १८० | २७ | दरसाबद्दल | दरखाबद्दल |
| १८२ | १५ | अणेदिव | आर्धोदये |
| १८४ | ४ | दानवड | दानवाड |
| १९४ | ६ | कौताली | कोतोली |
| १९५ | ३ | सिनोलीकर | सिरोलीकर |
| २०३ | ३ | सब अरबेन | सबा अरबैन |
| २०४ | १० | पितार खर्च | चिलर खर्च |
| २०६ | ३ | वरले वड | वलिवडे |
| २०९ | ४ | दाखला ब्रेहेडेस | सनदा नाहीत दाखला बावडेस |
| २१० | १३ | सन इसिदे | सन इहिदे |
| २१२ | १९ | त्याची आण देऊन महाराजास | त्याची आस्थी देऊन महाराजांनी |
| २२० | १६ | असे कोल्हापूर | असे सोलापूरसुद्धा |
| २२३ | २१ | लौसन | टोसन |
| २२३ | २६ | बारनीर | तुम्हास बारनीर |
| २२८ | ७ | बलावड | टाकवड |
| २३५ | २४ | तुरव | तुरंब |
| २३६ | २८ | ११८१ | १८१४ |
| २४१ | ७ | निशाण बंडी | निशाण बांडी |
| २५८ | १२ | सालाबाद अखेरची रोजी पौषास | सालाबाद अखेर चिरोंझी पोशाख |

वि. सू. ‘ लेखकाचे मनोगत ’ पृ. २ वर २६ व्या ओळीत इ. स. १७७१ असे छापले आहे. त्या ऐवजी १८७१ पाहिजे.



## वंशावळी : पाठशुद्धी

| पृ. | संदर्भ | दुरुस्ती |
|---|---|---|
| २७१ | दत्तवाडकर–वंशावळ | मुराराव उर्फ करणसिंग हे विद्यमान ( घराण्यातील सध्याचे कर्ते पुरुष ) |
| २७३ | विशाळगडकर–वंशावळ | त्र्यंबकराव अण्णासाहेब ( विद्यमान ) या ऐवजी, त्र्यंबकराव उर्फ आप्पासाहेब ( विद्यमान ) |
| २८० | राजोपाध्ये-वंशावळ | श्रीकांत उर्फ दादासाहेब हे विद्यमान |
| २८१ | खर्डेकर–वंशांवळ | आप्पासाहेब उर्फ बाबाराजे हे विद्यमान |
| २८४ | कागलकर घाटगे–वंशावळ | मूळ पुरुषापासून तिसरे नांव कृष्णाजी बिन कामजी असे नसून कृष्णाजी बिन भानजी असे हवे. याच वंशावळीतील शेवटचे अजीतसिंह ( ज्यू. ) हे विद्यमान. तसेच, जयसिंगराव ( सि. ) हे विद्यमान. |
| २८९ | नेसरीकर–वंशावळ | सुलतानराव उर्फ भय्यासाहेब व विठ्ठलराव हे विद्यमान |
| २९० | जतन मुलुख–वंशावळ | निळकंठराव व आप्पासांहेब हे विद्यमान |
| २९१ | आप्पाजीराव गायकवाड–वंशावळ | जयसिंगराव हे विद्यमान |

## महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने

या सर्व इतिहासविषयक ग्रंथांना
**छत्रपती शहाजी महाराज, कोल्हापूर**
यांचे प्रकाशन-अनुदान लाभले आहे.

*इतिहास-ग्रंथ*

**करवीर रियासत** *
स. मा. गर्गे

**हिंमतबहाद्दर**
**चव्हाण घराण्याचा इतिहास**
कै. वा. वा. खरे

**राव विश्वासराव**
**गायकवाड घराण्याचा इतिहास**
खं. आ. गायकवाड

*साधन-ग्रंथ*

**करवीर रियासतीची कागदपत्रे :**
**खंड १**
स. मा. गर्गे

**कापशीकर सेनापती**
**घोरपडे घराण्याची कागदपत्रे**
शं. ह. वर्टीकर

**करवीर सरदारांच्या कैफियती**
खं. आ. गायकवाड

* या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाने इतिहास विषयातील पहिले पारितोषिक देऊन गौरविले आहे.

